भारत-इतिहास-संशोधक-मंडळ स्वीय ग्रंथमाला क्र. ६३

# हिंगणे दफ्तर

## १ ला खंड

संपादक
श्री. गणेश हरी खरे
क्यूरेटर भा. इ. सं. मंडळ, पुणें.

किंमत ३ रुपये इ. १९४५

# अनुक्रमणिका.

# चिटणिसी निवेदन.

माळेंत या हिंगणे दप्तराच्या पहिल्या खंडानें फार मोलाची भर
धिकांना व इतिहासाच्या खोल अभ्यासकांना यांतील पत्रांवरून
त्यांचें राजकारण उलगडण्यास मोठीच मदत होणार आहे.

डील वकील महादेवभट हिंगणे व त्यांचे चौघे मुलगे, बादशाह,
रजपूत राजे यांशीं वागतांना कशी तारेवरची कसरत करीत
त्यांची खप्पा मर्जी झाली तरी कशी इमानदारी राखून होते या
प्रस्तुत पत्रांत प्रतिबिंबित झालेलें दिसेल. "पत्रामध्ये विशेष
तेने लिहावे हा मोगलाई दरबार पत्रामधें यांची वडाई लिहिलियानें
हे." असा इशारा सिंदे-होळकरास महादेवभट जो देत आहे
यच वाटेल. याउलट राणोजी शिंदे "आम्ही कोणेहेविसी चिंता
र पाईपडीची चाकरीही करणार नाही आमचा ईश्वर आम्हास
हे" असा छातीठोकपणा दाखवितो. तसेंच पेशव्यांची राज्य-
ष्टि कोणत्या प्रकारची होती हें यांतील (ले. १५) चिमाजी आप्पाच्या
सुंदर पत्रावरून ध्यानांत येतें. "तीर्थरूप कैलासवासी नाना याची
ठावी अशेष जनाची दुवा घ्यावी हेच त्याचे चितांत कायावाङ्मनसा
अरण्यवत् मुलूख जाहाला होता त्यास कौल देऊन कंटकाचा उछेद
ादविली रयेतीचा आस्वाद घेतला तन्मुले नानाची क्रीर्ति लोकोतर
ाहाली राजश्री स्वामींनी कृपा करून गौरव केले नानाच्या पदरी
व देवब्राह्मणाची स्थापना केली त्याचा आसीर्वाद पदरी विपुल ते पुण्य
ाचे पदरी बांधले व रायाचीहि बुध रयेत परिपाळणास पूर्ण देवब्राह्मणाची
करून **काश्यादीक माहास्थली विश्वेश्वराचा जीर्णोद्धार**
निरत होऊन त्याच मार्गेकरून रयेत नादविली ............... उमेचेता
ये पदरी रयेतीची दुवा व देवब्राह्मणाचा आसीर्वाद होता तो त्याणीं यांच्या
धिला सर्वा जनाचे ज्यांचे त्यापरी परिपालण करावे हेच उमेद आमची व
ाची आहे" वडिलांच्या पावलांवर पाऊल ठेवून एकामागून एक पहिले तीन पेशवे
ालले होते याचा हा दाखला आहे. हिंदूंचीं देवस्थानें मुसलमानांच्या ताब्यां-
डविण्याची खटपट पहिल्या बाजीरावापासूनची आहे. प्रस्तुत खंडांत यासंबंधीं
उल्लेख आहेत.

ण्यांच्या कारभारासंबंधीं पेशव्यांच्या मनांत अढी उत्पन्न झाली असतां,
दरबारी घटकेत इकडे घटकेत तिकडे येकाचा आश्रा करून येकासी क्षणात
ावा मागती झटक्याने फिरोन त्याकडे व्हावे ह्या तुमच्या वकिलीच्या युक्ती
रंतु त्या येथे चालणार नाहीत" असें नानासाहेब पेशव्याने जरबेनें दामोदर
िंगणे यास लिहिलें आहे (ले. ९१). पेशव्यानें दोनदां त्यांची वकिली तात्पुरती
न घेऊन त्यांना मोठा दंडहि केला आहे. दादासाहेबांच्या सांगण्यावरून तसें
े होतें. यावर हिंगण्यांचा खुलासा असा: "श्रीमंत राजश्री रघुनाथराव दादाची
री येथे आम्ही येसी केली की त्यानी आम्हास शब्दच न ठेवावा परंतु समागमे
चतुष्टय आहे त्यांनी दबकाऊन त्याच्या चितात कढू पाडोन नाना प्रकारें बोध
न त्याजला बहकाऊन समजाविले." दादासाहेबांच्या स्वभावाची परीक्षा यांत

बरोबर केली आहे याचें त्याच्या पुढील आयुष्यक्रमावरून प्रत्यंतर येतें. "रोहि
कडे बाकी फार येणे पैसे असतां तुम्ही लिहिलें कीं दोन लाखाच्या हुड्या दे
तरी हे काये दोन लाखाच्या हुड्या घेऊन चाटाव्या की काये" असे दादा हिंगण
रागानें लिहितो ( ले. २७ ). पण खंडण्या वसूल करणें फार जिकिरीचें काम हों
त्यामुळेंच हिंगण्यास नेहेमीं वाईटपणा येई.

पानपतच्या युद्धाची दाट छाया या पत्रांत दिसत असून पानपतानंतर तं
याचीं जीं खुळें निघालीं त्यांचा धागादोराहि यांत सांपडतो. "अबदाली हिंदुस्था
पातशाईचे पात्र नाहीं" पण त्याला आणण्याचा उद्योग मीर मन्नू आणि व
यांच्या बायकांनीं केला याची जाणीव नानासाहेबाला होती (ले. १८०) व त्या अन्
रोधानें आपलें राजकारण तो करीत होता. पण अनेक कारणांनीं अबदाली
जोर वाढला. भाऊसाहेबाच्या जिवंतपणाच्या आवया पानपतानंतर लागलीच
लागल्या. "श्रीमंत राजश्री भाऊसाहेब पानिपताजवळ गाव आहे तेथे गुप्त अ
प्राणेजीवे सुखरूप आहेत त्याचे हस्ता[क्षर] पत्र येईल तेच पाठवून देतो" अ
पुरुषोत्तम महादेव पेशव्यास लिहितो. त्यावर "तुम्ही वकील बद आवाई मनोरं
खबरा ल्याहाव्या हा तुमचा दंडक परंतु तहकीक पतेवार वर्तमान लिहिणे सं
चागला करणे लटके सहसा न लिहिणे" असें निषेधाचें कडक उत्तर पेशव्यानें दि
आहे ( ले. २०९ ). तसेंच जनकोजी शिंदे जिवंत आहे असें धरून त्यानें त्य
"येदा छावणीस देसी यावे" असें कळविलें आहे ( ले. २११ ).

याप्रमाणें प्रस्तुत हिंगणें दप्तराचा कितीतरी परिचय करून देतां येईल. वाङ्
दृष्टीनेंहि यांतील पत्रें अभ्यासण्याजोगीं वाटतील. यांखेरीज दोन खंड होतील इत
पत्रें अजून शिल्लक आहेत. तीं मंडळाच्या सवडीनें छापून काढूं. हल्लीची तं
नाहींशी होईल तेव्हां खरें.

बृहन्महाराष्ट्र मंडळानें दिल्ली येथें "महाराष्ट्र कीर्तिमंदिर" उभारण्याची योज
केली आहे ती फारच स्तुत्य आहे यांत शंका नाहीं. असें "कीर्तिमंदिर" उठे
याविषयीं आतां मोठी आशा वाटते. या मंदिरांत मराठ्यांचे उत्तर हिंदुस्थानचे
विशेषतः दिल्ली दरबारचे वकील हिंगणे पिता–पुत्र यांचें स्मारक अवश्य असा
हिंगण्यांचा वाडा जंतरमंतर व आजचा असेंब्ली हाल यांजवळच कोठेंतरी होता
तेव्हां हिंगणे मुत्सद्द्यांचें नांव दिल्लींत राहील अशी तरतूद यावेळींच करण्यावि
बृहन्महाराष्ट्र मंडळास आम्ही सुचवितों.

मंडळाचे आजीव संशोधक श्री. ग. ह. खरे यांनीं मोठ्या परिश्रमानें हें
मिळवून साक्षेपानें संपादिलें आहे. त्यांनीं दिलेलीं परिशिष्टें त्यांचा दीर्घ अभ्
दाखविणारीं अशींच आहेत. इतर साधनांच्या सहाय्यानें या दप्तरांतील न
माहितीची मांडणी करणें हें काम उरलें आहे तें ते करतीलच. मात्र इतिहास
आणि व्यासंगी यांनीं या पहिल्या खंडाची योग्य दखलगिरी घेऊन मंडळास व श्री.
यांस पुढील खंड काढण्यास प्रोत्साहन द्यावें अशी विनंति करून हें चिटणिसी निवे
पुरें करतों.

भाद्रपद शुद्ध ७ शक १८६७

**चिंतामण गणेश कर्वे**
चिटणीस, भा. इ. सं. मं

# प्रस्तावना

प्रस्तुत खंडांत प्रकाशिलेले कागद नाशिक जिल्ह्यांतील चांदोरी गावचे जागीरदार श्री. नीळकंठराव पांडुरंगराव उर्फ भय्यासाहेब हिंगणे यांजकडील आहेत. हे कागद मीं दोन हप्त्यांनीं त्यांजकडून आणिले. प्रथम मी १९४२ च्या मेमध्यें त्यांजकडे गेलों व तीन दिवस तेथें राहून तीन किंवा चार दफ्तरांतील १२४२ कागद निवडून घेऊन आलों. नंतर पुन्हा १९४३ च्या एप्रिलमध्यें तेथें गेलों आणि आठ दिवस तेथें राहून व सुमारें दोन गाड्या कागद तपासून अदमासें १५०० फार्सी–मराठी कागद आणि २०० पोथ्या घेऊन आलों. मी प्रथम तेथें जाण्यापूर्वी श्री. भय्यासाहेब यांचे श्वशुर कै. नानासाहेब मिरीकर यांनीं आपल्या सवडीनें श्री. भय्यासाहेब यांजकडील कांहीं कागद तपासून व तीन चार दफ्तरें बाजूस काढून ठेविलीं असल्यानें माझें पहिल्या वेळचें काम थोडक्यांत आवरलें. मोठी चाळण कै. मिरीकर यांनीं लावून ठेविलीच होती. मला फक्त बारीक चाळणच लावावयाची होती. पण दुसऱ्या वेळी दोन्ही तपासण्या मलाच करावयाच्या असल्यानें दिवस अधिक लागले येवढेंच नव्हे तर कामही अधिक पडलें. सकाळीं आठला कामास सुरवात झाली कीं तें साडेबारा वाजेतों चाले आणि दुपारीं दोनला चालू झालें म्हणजे सायंकाळीं आठला थांबे. दिवस उन्हाळ्याचे असले तरी श्रीमंत भय्यासाहेबांच्या बंगल्यांतील मोकळी हवा व त्यांचा हार्दिक पाहुणचार यामुळें १०।११ तास काम कांहींच वाटत नसे हें नमूद करणें आवश्यक आहे.

अशा तऱ्हेनें कागद येथें आणल्यानंतर पुन्हा एकाहून दुसरी अधिक सूक्ष्म अशा २।३ तपासण्या करून नकलण्याजोगे सुमारें पांचशें कागद बाजूस काढिले आणि त्यांच्या नकला स्वतः केल्या किंवा मुख्यतः विद्यार्थी लक्ष्मण प्राणाचार्य ळसासी याजकडून करवून घेतल्या. त्यानें आपलें काम अतिशय चोख केलें हें ांगण्यास मला मोठा संतोष वाटतो. त्यांपैकीं येथें २१९ कागद प्रसिद्ध होत आहेत.

नकला तयार झाल्यानंतर मुख्य काम पत्रांचे काल ठरविण्याचें. हें काम जितकें महत्त्वाचें तितकेंच अवघडही असतें. मराठ्यांच्या इतिहासांत घडलेल्या शेंकडों टनांतील व्यक्ति, स्थल व मिती यांचा रेखीव तपशील ज्याच्या ध्यानांत जितका अधिक तितका नवीन पत्रांचा अधिक उलगडा त्याला होणार. तेव्हां कै. दत्तोपंत आपटे यांची मदत घेणें अपरिहार्यच होतें. त्यांनीं आपल्या स्वभावास अनुसरून या बाबतींतही अगदीं निर्हेतुक व सर्वतोपरि मदत केली. ते हीं पत्रें–विशेषतः

त्यांवरील विवेचन प्रकाशित होईल तें—पहावयास जगते तर त्यांस मोठा आनंद झाला असता. पण तो योग नव्हता. परमेश्वरी इच्छा निराळीच होती.

जमीन बाबीचीं पत्रें सोडल्यास बाकीच्या मराठेशाहींतील पत्रांवर सामान्यतः वर्षाचा उल्लेख न करतां महिना व मिति किंवा तारीख यांचा फक्त उल्लेख करीत. कित्येक पत्रांवर तेवढाही निर्देश नसतो. शिवशाहींतील अशीं पत्रें फार थोडीं सांपडल्यानें पत्र-लेखनपद्धतीमधील हा दोष चटकन ध्यानांत आला नाहीं किंवा अजूनही नीट ध्यानांत येत नाहीं. पण पेशवाईंतील बहुसंख्य पत्रें जमीनबाबीव्यतिरिक्त विषयांचीं असल्यानें ही उणीव तावडतोब लक्षांत आल्याखेरीज रहात नाहीं. अर्थात् कालनिश्चय हा मराठी पत्रांवर करावयाचा एक महत्त्वाचा पण कष्टदायक संस्कार आहे.

तेव्हां कै. दत्तोपंत आपटे यांनीं मदत केली तरीही मी कांहीं पद्धतशीर प्रयत्न करणें आवश्यक होतें. कोणत्याही पत्राच्या कालाची उत्तर मर्यादा म्हणजे त्या पत्रांत उल्लेखिलेल्या सर्वोत्तरकालीन घटनेमध्यें वावरणाऱ्या व्यक्तींपैकीं सर्व प्रथम मेलेल्या व्यक्तीची निधनतिथि होय. पत्राची कालमर्यादा यानंतर फार लांबची असूं शकणार नाहीं. पण अशा मृत्युतिथि एकत्रित केलेल्या कोठेंच आढळल्या नाहींत. तेव्हां सुमारें १७५ मृत्युतिथि एकत्रित केल्या. पैकीं इ. १७६१ पर्यंतच्या मृत्युतिथि परिशिष्टरूपानें पुं. दिल्या आहेत. पत्रांतील सर्वपूर्वकालीन घटनेंत वावरणाऱ्या व्यक्तींपैकीं सर्वांत उशीरा अधिकारी बनलेल्या व्यक्तीच्या अधिकारग्रहणाचा समय ही त्या पत्राच्या कालाची पूर्व मर्यादा असतो. पत्राचा काल या मर्यादेच्या अगोदरचा केव्हांही असूं शकणार नाहीं. पण अशा पुष्कळ तारखा मिळाल्या नाहींत.

विशिष्ट पत्राच्या कालासंबंधीं दोन मर्यादा समजल्या तरी तेवढ्यानें काम भागतें असें नाहीं. बहुधा या दोन मर्यादांतील अंतर कित्येक वर्षांचें असतें यामुळें पत्राचा काल निश्चित करण्यासाठीं निरानिराळ्या घटनासंबंधी जितक्या मित्या मिळतील तेवढ्या एकत्र करणें आवश्यक होतें. त्याप्रमाणें अशा पाचसातशे तारखा एकत्र केल्या.

पण हे सर्व निर्देश एकाच रूपांत कधींच मिळाले नाहींत. कांहींच्या फक्त इंग्रजी तारखा होत्या, तर कांहीं केवळ मुसलमानी होत्या आणि कित्येक नुसत्या हिंदु मित्या होत्या. तेव्हां अशा सर्वांचीं तीनही रूपांतरें मांडून घेतलीं.

पत्रांचा काल ठरविण्यासाठीं केलेल्या प्रयत्नांपैकीं एकाचें वर्णन वर केलें. पण मित्या कळल्या तरी व्यक्तींच्या बहुविध नांवांची व पदव्यांची आणि त्यांच्या एकमेकांशीं असलेल्या नात्यांची ओळख झाल्याखेरीज व्यक्तिनिश्चय करतां येईना. तसा निश्चय झाल्याविना कोणती घटना कोणाविषयीं हें समजेना. म्हणून पाच पंचवीस

वंशावळी त्यांतील व्यक्तींच्या पदव्या आणि अधिकारग्रहण व मृत्यू यांच्या तारखा यांसह एकत्रित केल्या. वंशावळींच्या बाबत कशा अडचणी येत याचें एकच उदाहरण येथें सांगतों. हिदायत मुहीउद्दीनखान हा पहिल्या निजामाच्या मुलीचा मुलगा हें प्रसिद्ध आहे. पण त्याच्या आईबापांचीं नांवें हातांशीं असलेलीं दहा पंधरा पुस्तकें पाहूनही मिळालीं नाहींत. पुढें एका लेखांत तीं अचानक सांपडलीं. अशा कांहीं वंशावळी परिशिष्टरूपानें पुढें दिल्या आहेत.

पत्रांच्या तारखा ठरविण्यासाठीं प्रसिद्ध व्यक्तींच्या मुक्कामांचे तक्ते जवळ असणें अति-शय आवश्यक आहे. पण या बाबतींत माझे हातून केवळ प्राथमिक कामाहून अधिक कांहीं झालें नाहीं.

मीं जीं पत्रें आणिलीं त्यांपैकीं बाळाजी बाजीरावाच्या अखेरीपर्यंतचीं पत्रें या खंडांत आलीं आहेत. राहिलेल्या कागदांमध्यें थोरल्या माधवरावाच्या कारकिर्दीपासून पुढचीं, ज्यांचा काल ठरवितां येत नाहीं अशीं आणि ज्यांचा काल तीं या खंडांत समाविष्ट व्हावीं असा होता पण जीं अनभ्यास अथवा अनवधान यांमुळें या खंडांत घालावयाचीं राहिलीं अशीं मिळून सुमारें २५० ते ३०० पत्रें आहेत. त्यांचा पुढील खंडांत समावेश होऊन तो लौकरच पण मंडळाच्या सवडीनें प्रसिद्ध होईल. अर्थात् त्या खंडांत केवळ बाळाजी बाजीरावाच्या अखेरीपर्यंतचींच पत्रें येतील असें नसून त्या पुढच्याही सुमारें २०।२५ वर्षांतील पत्रें यावयाचीं आहेत. याशिवाय मराठे व इंग्रज यांच्या हर्षामर्षकालांतील फार्सी व मराठी पत्रव्यवहाराचाही २००।२५० पानांचा एक खंड सहज निघण्यासारखा आहे. सारांश आणखी दोन खंड निघण्याइतकी सामुग्री शिल्लक आहे.

या पत्रांचें वैशिष्ट्य काय आहे हें येथें अगदीं थोडक्यांत कां होईना निर्दिष्ट करणें अवश्य आहे. यांतील बहुतेक पत्रें बाजीराव बल्लाळ, चिमाजी आप्पा, बाळाजी बाजीराव, रघुनाथ बाजीराव, त्याचा १७५३ ते १७५५ च्या उत्तर हिंद स्वारींतील कारभारी सखारामबापू, सदाशिवराव भाऊ, मल्हारराव होळकर व त्याचा कारभारी गंगा-धर यशवंत चंद्रचूड, राणोजी, जयाप्पा, जनकोजी, दत्ताजी, शिंदे व त्यांचा कारभारी-रामचंद्र मल्हार, दिल्लीचा वकील महादेवभट हिंगणे, त्याचे चार मुलगे बापूजी, दामोदर, पुरुषोत्तम व दिवाकर अथवा देवराव आणि त्यांचे नियुक्त गोविंद तमाजी, धर्मराव तमाजी इत्यादींनीं पाठविलेलीं आहेत. यामुळें पुरावा म्हणून या पत्रांना पहिल्या प्रतीचें महत्त्व आहे. कोणाचीं कोणतीं व किती पत्रें आहेत य तक्ता येथें देतों. त्यावरून वरील विधान नीट ध्यानांत येईल.

यांत आलेले विषयही अत्यंत महत्त्वाचे असल्यानें अनेक पत्रांतून बाळाजी बाजीराव, रघुनाथराव इत्यादींनीं स्वहस्तानें लिहिलेला मजकूर आहे. येवढेंच नव्हे तर कांहीं पत्रें पूर्णांशानें त्यांच्या हातचीं आहेत. बाळाजी बाजीरावाच्या अशा दोन पत्रांचा निर्देश इतरत्र आला आहे. ले. ९३ ते १५९ यांपैकीं अनेक पत्रें सखारामबापूनें स्वहस्तानें तरी लिहिलीं आहेत किंवा रघुनाथरावानें अंशतः लिहिलीं आहेत. महादेवभट व त्याचे चार मुलगे यांच्या हातचीं पूर्ण किंवा अंशभूत पत्रें तर पुष्कळच आहेत.

हिंगणे दफ्तरांतील कागद आज प्रथमच प्रसिद्ध होत आहेत असें नाहीं. कित्येक वर्षांपूर्वी कै. राजवाडे यांनीं ' मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें ' या मालेच्या सहाव्या

खंडांत हिंगणे घराण्यामध्यें मिळालेले सुमारें २७५ कागद प्रकाशित केले आहेत. ते कागद त्यांस कोठें व कोणाकडे मिळाले हें नमूद केलेलें नसल्यामुळें त्यांच्या स्वामित्वाविषयीं अधिक कांहींच लिहितां येत नाहीं; पण एवढें दाखवितां येईल कीं, ते कागद या कागदांना पूरक आहेत. याचीं एकदोन उदाहरणें येथें देतों. राजवाडे खंड ६ ले. ३८३ हें पत्र सदाशीव चिमणाजीचें असून त्यावर कालाचा उल्लेख फक्त 'छ १६ साबान' येवढाच असल्यानें कै. राजवाड्यांनीं तें पत्र अंदाजानें शक १६८०=इ. १७५८ मध्यें घातलें. पण प्रस्तुत संग्रहांतील ले. ९१ व ९२ हीं पत्रें संपूर्णतया त्याच विषयासंबंधीं व बाळाजी बाजीरावाच्या हातचीं असून त्यांत कालाचा सु. ११५५ साबान १६ असा पुरा उल्लेख असल्यानें सहाव्या खंडांतील पत्राचें गौणत्व स्पष्ट होऊन त्याचा काल दुरुस्त होतो. सहाव्या खंडांत रघुनाथरावाच्या उत्तरेंतील पहिल्या स्वारीविषयीं किरकोळ माहिती देणारीं अदमासें पंधरा पत्रें आहेत. यांत सुमारें पाऊणशें पत्रें आहेत. आणखी अदमासें २५ पत्रें किरकोळ असल्यानें प्रसिद्ध केलीं नाहींत. राजवाडे खंड ६ ले. ७६ व ७९ यांतील कालोल्लेख अपुरे असल्यानें त्यांचा काल भलताच ठरविला गेला. या संग्रहांतील ले. ९ त्यांचा काल कायमचा दुरुस्त करीत आहे. राजवाडे खंड ६ ले. ९५, ९६, ९७ हीं पत्रें अपुऱ्या कालोल्लेखामुळें अशींच भलत्या काळास लागलीं होतीं. पण यांतील ले. ६ मुळें त्या पत्रांचा काल निश्चित ठरत आहे. अशीं आणखीं अनेक उदाहरणें देतां येतील. अशा तऱ्हेनें किंवा अधिक अभ्यासानें राजवाडे खंड ६ मधील सुमारें १००।१२५ पत्रांच्या तारखा मला दुरुस्त करतां आल्या त्या परिशिष्टरूपानें शेवटीं दिल्या आहेत.

गेल्या पांच सहा वर्षांत माझ्या हातून जीं साधनात्मक पुस्तकें प्रसिद्ध झालीं त्यांत आणि माझ्या मदतीनें झालेल्या इतरही कांहीं पुस्तकांत शेवटीं जोडलेल्या सूचींमध्यें निर्दिष्ट स्थलांचा भौगोलिक पत्ता देण्याचा प्रयत्न मीं केला आहे. या पुस्तकांत आलेल्या स्थलांचे बाबतींत तसें करणें अधिकच जरूर होतें. पण युद्धजन्य परिस्थितीमुळें आवश्यक ते नकाशे हाताशीं असणें तर लांबच राहिलें; केवळ पहावयास मिळणेंही कठीण होऊन बसलें. यामुळें एका उपयुक्त गोष्टीस पारखें व्हावें लागलें. परिस्थिति सुधारतांच शक्य तर पुरवणीरूपानें ही उणीव भरून काढण्याचा प्रयत्न करीन, एवढें आश्वासन येथें देऊन ठेवतों.

या खंडांतील पत्र क्रमांक १५ व १६, २०–२२, २३ व २४, ३३–३५, ३६ व ३८, ४३ व ४४, ४६–४८, ५० व ५१, ५२ व ५३, ९१, ९२ व राजवाडे खंड ६ ले. ३८३, १५५–१५९, १६२ व १६३, १६५–१७१, १७६–१८२ आणि २०९ व २१० या पत्रसमूहांकडे मीं वाचकांचें लक्ष वेधूं इच्छितों. यांपैकीं प्रत्येक गटांतील पत्रें एकाच वेळीं लिहून एकदमच–बहुधा एकाच थैलींतून–पाठविलेलीं असावीं. आज ज्याप्रमाणें इंग्रजी पत्रव्यवहारांत एक कव्हरिंग लेटर व एक किंवा

अधिक एन्क्लोझर्स असतात कांहींशीं तद्वतच वरील पत्रांची पद्धत आहे. तेव्हां एका दृष्टीनें हे पत्रसमूह प्रत्येकीं एकेक पत्रच होय: पण प्रत्येकास निराळा कागद, निराळा कालनिर्देश, विषय, इत्यादि असल्यानें मी येथें त्यांना स्वतंत्र क्रमांक दिले आहेत.

या खंडास मराठ्यांच्या उत्तरेंतील बाळाजी बाजीराव अखेरीपर्यंतच्या हालचाली व त्यांमागील हेतू यांचें सम्यग्दर्शन करून देणारी विस्तृत प्रस्तावना लिहिली असती तर उत्तम ठरलें असतें. पण मी सध्याच उत्तर हिंद प्रकरणीं संख्येनें व महत्त्वानें कदाचित् अधिक असे फार्सी-मराठी कागद मिळविण्याच्या प्रयत्नांत आहे. लवकरच मिळतील असा संभव आहे. तेव्हां थोडक्यासाठीं दुबार विवेचन लिहिण्याचा प्रसंग यावा हें बरें नव्हे; म्हणून येथें तशी प्रस्तावना लिहिण्याचें टाळलें आहे. तें विवेचन मजकडूनच पाहिजे असेल तर आणखी एक दोन वर्षें थांबलें पाहिजे. पण वाचकांनीं थांबावें, असें माझें म्हणणें नाहीं. इतरांनींही तें काम करण्यास हरकत नाहीं.

तात्पर्य, मोठी प्रस्तावना लिहिण्याचें पुढें ढकललें असलें तरी ज्यांकडे प्रस्तुत कागद मिळाले त्यांच्या पूर्वजांविषयीं थोडी माहिती येथें देणें आवश्यक आहे. यांजकडील कागदांवरून यांचा मूळ पुरुष पद्माकरभट, त्याचा मुलगा गोविंदभट व त्याचा मुलगा महादेवभट येवढें स्पष्ट होतें. पद्माकरभटाचे पूर्वजांचीं नांवें सांपडलीं नाहींत. आडनांवाचा विचार करतां हे मूळचे हिंगणी गावचे रहिवासी असावे. तेथून नाशकास आल्यावर त्यांस हिंगणे म्हणूं लागले. पद्माकरभट, गोविंदभट व कांहीं काल महादेवभट हे नाशिक येथें भिक्षुकी करूनच रहात असावेत. पेशव्यांचे तीर्थोपाध्ये हिंगणे अजूनही नाशकासच आहेत. पेशवे यात्रेसाठीं नाशकास जात तेव्हां महादेवभटाचा त्यांशीं परिचय झाला असावा. बाळाजी विश्वनाथाबरोबर दिल्लीस गेलेल्या लोकांमध्यें हिंगणे आडनावाचा मनुष्य आहे तो बहुधा महादेवभटच असावा. तरी पण महादेव भटाच्या पूर्वायुष्याविषयीं नीट माहिती मिळत नाहीं हें खरें. महादेवभट प्रथम प्रथम पेशव्यांचा फिरता वकील म्हणून उत्तरेंतील निरनिराळ्या संस्थानांत वावरत असावा. पुढें राजपुतान्यांतील जयपूर संस्थानच्या सवाई जयसिंहाशीं पहिला बाजीराव व त्याचे सरदार शिंदे-होळकर यांचा अधिकाधिक संबंध येऊं लागल्यामुळें महादेवभट जयपूरच्या दरबारी मराठ्यांचा वकील म्हणून राहूं लागला. सवाई जयसिंह दिल्लीच्या राजकारणांत फार मोठा भाग घेत असल्यानें महादेवभट दिल्लीसही जाऊं येऊं लागला. यामुळें सवाईचा सहकारी व दिल्लीच्या राजकारणांतील दुसरी महत्त्वाची व्यक्ति खान दौरान याशींही त्याचा वारंवार संबंध आला. पण बाजीरावाच्या हयातपर्यंत तो दिल्लीचा कायम वकील नव्हता असें वाटतें. बाजीरावाच्या कारकिर्दींत दिल्लीस बाजीरावाचा नातेवाईक बापूराव मल्हार बर्वे हा वकीलाचें व यादवराव मुनशी त्याचा मदतनीस म्हणून काम करीत असावे. बाजीरावाच्या कारकिर्दीच्या अखेरीस महादेवभट दिल्लीचा वकील बनून त्याचा थोरला मुलगा बापूजी हा जयपूरच्या वकिलातीचें काम

पाहूं लागला. पुढें इ. १७४३ मध्यें सवाई जयसिंह वारल्यावर हा जयपूरतर्फेंही दिल्लीच्या दरबारीं वकील बनला. यामुळें नव्या दिल्लींतील सवाई जयसिंहाचें जयसिंगनगर किंवा जयसिंगपुरा यांत वेधशाळेच्या (जंतर-मंतर) परिसरांत हिंगण्यांनीं राहण्यासाठीं घर बांधिलें. हा इ. १७४४ च्या आरंभीं कांहीं कामानिमित्त सफदरजंगाच्या दरबारी गेला असतां त्याजबरोबर असलेले जयपूरी जमातदार व प्यादे आणि याचे लोक यांची हक्काविषयीं कटकट झाली. महादेवभटानें सवाईच्या लोकांस शिवी देऊन आपल्या लोकांस त्यांना पकडण्याविषयीं हुकूम सोडला. त्यामुळें माजलेल्या दंगलींत महादेवभट व त्याचा मुलगा बहुधा बापूजी यांस जखमा झाल्या. मुलगा वांचला पण महादेवभट सायंकाळीं घरीं गेल्यावर मध्यरात्रीं मेला. ही गोष्ट ता. ६।२।१७४४ च्या अगदीं थोडे दिवस अगोदर झाली. महादेवभटामागून त्याचा मुलगा बापूजी (बाबा) दिल्लीच्या वकिलातीचा मुख्य बनला आणि मराठ्यांचा उत्तरेस वर्षानुवर्षे जास्त संबंध येऊन काम वाढल्यानें त्याचे बंधू दामोदर (दादा) व पुरुषोत्तम (नाना) हे त्यास मदत करूं लागले. या वेळीं दिल्लीच्या वकिलातीस, खरें म्हणावयाचें तर, जवळ जवळ सर्व उत्तर हिंदुस्थानच्या वकिलातीचें स्वरूप आलें होतें. त्यामुळें यांना वकिलातीच्या कायम किंवा तात्पुरत्या शाखा उघडाव्या लागल्या. पैकीं जयपूरशाखेकडे गोविंद तमाजी व त्याचे मागून त्याचा भाऊ धर्मराव तमाजी हे काम पहात होते. दिल्ली दरबारांतील मुख्य काम बापूजी महादेव करी आणि दामोदर व पुरुषोत्तम हे बहुधा फिरत राहून रोहिले, पठाण, सफदरजंग, जाट, निजाम, पेशवे, शिंदेहोळकरादि सरदार इत्यादींकडील कामें उरकीत. इ. १७४९ मध्यें दामोदर निजामाचा मुलगा नासिरजंग याजकडे गेलेला आढळतो. इ. स. १७५१ मध्यें रोहिलेपठाणांवरील मोहीम निकालांत काढण्याच्या हेतूनें शिंदे–होळकर अंतर्वेदींत फरुखाबादेजवळ मऊ शम्साबाद येथें छावणी करून राहिले असतां व सफदरजंग आपल्या सुभ्याकडे गेला असतां दामोदर त्याजबरोबर होता व पुरुषोत्तम सरदारांपाशीं राहिला होता. पेशव्यांचे मतें महादेवभटानें वकिलीचें काम अतिशय शहाणपणानें केलें असलें तरी त्याचे मुलगे समाधानकारक काम करीत नव्हते. याला कारणें दोन झालेलीं दिसतात. हिंगणे मुख्यतः जरी पेशव्यांतर्फे दिल्लीस वकील होते तरी ते इतरांची वकिली मुळींच करीत नसत असें नाहीं. जयपूरतर्फेंही ते वकील होतेच. आणखी कोणाकोणाच्या वकिल्या करीत असतील. पण केवळ दोन संस्थानांच्या वकिल्या केल्यानें मनुष्य मर्जीतून उतरेल असें नाहीं. आजही एकच वकील एकापेक्षां अधिक देशांचा प्रतिनिधि म्हणून काम करीत असलेला आढळतो. जोंवर अशा दोन संस्थानांचे हितसंबंध परस्परांविरुद्ध नसतील तोंवर वकिलींत पेंच उत्पन्न होण्याचा संभव नाहीं. पण परस्परविरुद्ध हितसंबंध आले कीं, कोणाचे हिताकडे अधिक लक्ष द्यावयाचें असा प्रश्न वकिलापुढें उभा राहतो. अशा वेळीं वकिलानें जरी अगदी प्रामाणिक न्याया-

धींशाची भूमिका पत्करिली तरीही मनुष्य स्वार्थी असल्यानें ज्या संस्थानाचा स्वार्थ बुडेल त्या संस्थानची आपल्या वकिलाविषयीं कलुषित भावना झाल्याशिवाय राहणार नाहीं. हिंगण्यांविषयीं असेंच कांहींतरी घडलें असण्याचा संभव आहे. त्यांत कोणाचा दोष किती हें सांगणें सध्या तरी शक्य नाहीं. पण काय घडलें तें निवेदिण्यास हरकत नाहीं. शिंदे–होळकरांनीं जयपूर संस्थानच्या वारसाविषयींच्या ईश्वरसिंग–माधोसिंग भांडणांत माधोसिंगाचा पक्ष धरून ईश्वरसिंगास इतकें हतबल व निराश केलें कीं, त्यानें इ. १७५० चे डिसेंबरच्या बारावे तारखेस विषप्रयोगानें आत्महत्त्या करून घेतली आणि माधोसिंगास गादी मिळाली. या दोघांच्या भांडणांत सत्पक्ष कोणाचा व नमतें कोणी किती घेतलें हें पहाण्यांत फारसा अर्थ नाहीं. मुद्दे दोघांच्याही बाजूंनीं आहेत. दोघेही थोडें अधिक नमतें घेतें तर हें भांडण अशा थरास गेलें नसतें. पण तसें झालें नाहीं. माधोसिंग गादीवर आल्यावर राज्यस्नेहानें मराठ्यांचे उपकार तावडतोब विसरला आणि त्यानें विषप्रयोग व दगाबाजी यांच्या साह्यानें शिंदे-होळकर व त्यांचे साथीदार यांस ठार मारण्याचा प्रयत्न केला. प्राणावर बेतलें पण शेपटावर गेलें या वचनाप्रमाणें दोन्ही प्रसंगांतून मल्हारराव, जयाप्पा वगैरे खासे बचावले, पण त्यांचे–कित्येक सरदारांसह–सुमारें १५०० लोक मात्र मारले गेले. ही गोष्ट मराठ्यांनीं विसरावी अशी नव्हती. पण सारासार विचार करून विसरण्याचा प्रयत्न ते करीत होते. इकडे माधोसिंगाची राज्यतृष्णा वाढूं लागली. आग्रा ऊर्फ अकबराबाद हा सुभा पूर्वी एक वेळ सवाई जयसिंहाकडे दिला होता. इ. १७५१ च्या आरंभीं हा सुभा झुलफिकारजंगास बरतरफ केल्यामुळें मोकळा पडला. तेव्हां माधोसिंगानें पातशाहास मोठा नजराणा देऊन तो आपणाकडे करून घेतला. शिंदे–होळकर तो आपणांस म्हणजे मराठ्यांस मिळावा अशा प्रयत्नांत होते. पण न मिळाल्यामुळें आणि माधोसिंग व शिंदे–होळकर या दोघांचेही तर्फे पातशाहापाशीं बोलणारा बापूजी महादेवच असल्यानें शिंदे–होळकरांची समजूत झाली कीं, बापूजी महादेवानेंच हें घडवून आणिलें.

हिंगण्यांचे विषयीं गैरसमज उत्पन्न होण्यास आणखीही एक कारण झालें होतें. वकिलानें परदेशांत स्वतःचें घरदार, इस्टेट वगैरे कांहींएक करतां कामा नये असा त्या वेळींही दंडक होता. तो मोडून हिंगण्यांनीं दिल्लीस व तिच्याभोंवतीं मोठें घरदार व विस्तृत इस्टेट केली. यामुळें त्यांचे हितसंबंध उत्पन्न झाले. आपले हितसंबंध सुरक्षित रहावे या दृष्टीनें दिल्लींतील विविध मुत्सद्यांशीं नर्माईनें बोलणें त्यांस भाग पडूं लागलें. पेशवे व सरदार यांनीं अनेकदां सुचविलें असतांही ते स्पष्ट व निर्भीडपणें बोलण्याचें टाळीत. या दोन्ही मुद्यांविषयीं शिंदे–होळकरांनीं पेशव्यांशीं बोलणें केलें होतें. त्यावरून पेशव्यांचेंही मत हिंगण्यांविषयीं कलुषित झालें.

इ. १७४८ च्या मार्चमध्यें दिल्लीचा वजीर कम्रुद्दीन अबदालीबरोबर झालेल्या लढाईंत मारला गेला, एप्रिलमध्यें मुहम्मदशाह बादशाह मेला आणि मेमध्यें निजामुमुल्क वारला. तेव्हां अहमदशाह तक्तावर बसला आणि सफदरजंग मुख्य प्रधान किंवा वजीर बनला. कम्रुद्दीन व निजाम तुराणी किंवा तुर्की व सुन्नी होते, तर सफदरजंग इराणी व शिया होता. यामुळें दिल्ली दरबारांत तुराणी पक्षाचें वजन कमी होऊन इराणी पक्ष वरचढ होऊं लागला. विशेषतः निजामाचा थोरला मुलगा पहिला गाझीउद्दीन सफदरजंगास मिळाल्यानें त्याचें वजन फार वाढूं लागलें आणि कम्रुद्दीनचा मुलगा इन्तिजामुद्दौला निष्प्रभ ठरला. पण याच काळांत बादशाही परिवारांत असलेल्या जाविद्खान नांवाच्या खोज्याचें बादशाहावरील वजन फार वाढून तो त्याच्याच तंत्रानें चालूं लागला. सफदरजंगाच्या अधिकारांतही ढवळाढवळ होऊं लागली. तेव्हां असूयादि विकारांनीं प्रेरित होऊन सफदरजंगानें इ. १७५२ च्या ऑगस्टमध्यें जाविद्खानाचा खून करविला. इकडे दक्षिणेंत आक्टोबरमध्यें गाझीउद्दीन विषप्रयोगानें मेला. तरीही बादशाह व सफदरजंग यांमधील वितुष्ट कमी न होतां वाढतच गेलें. गाझीउद्दीनचा मुलगा दुसरा गाझीउद्दीन प्रथम सफदरजंगाच्या पक्षांतच होता. पण सत्ताभिलाषानें प्रेरित होऊन त्यानें सफदरजंगास हांकलून देण्यापुरतें इन्तिजामुद्दौल्याशीं एकमत केलें. शेवटीं सफदरजंग जवळ जवळ बंडखोरच ठरल्यामुळें वजीरी इन्तिजामुद्दौल्यास मिळाली. यामुळें गाझीउद्दीनचें इन्तिजामुद्दौल्याशीं वांकडें आलें आणि तो प्रथम केवळ इन्तिजामुद्दौल्यास व नंतर त्याच्यासह बादशाहासही पदच्युत करण्याची खटपट करूं लागला. या खटपटीस इ. १७५४ च्या मे महिन्याचे अखेरीस यश येऊन जूनचे आरंभींच अहमदशाह व वजीर दोघेही पदच्युत झाले आणि दुसरा आलमगीर बादशाह होऊन दुसरा गाझीउद्दीन त्याचा वजीर बनला.

या सर्व घडामोडींत मराठ्यांनीं कोणाची बाजू घ्यावयाची याविषयीं मोठे गंभीर प्रश्न वारंवार उत्पन्न होत. दिल्लीच्या राजकारणांत हात घालण्यास पहिल्या बाजीरावानें सुरुवात केली. त्यानें बादशाह व मुत्सद्दी यांवर अनुकूल परिणाम व्हावा म्हणून दिल्लीपर्यंत दौड मारून त्यांस चकित तर केलेंच; पण निजामास भोपाळांत कोंडून व शरण यावयास लावून मराठ्यांच्या सामर्थ्याचा प्रत्ययही दिल्लीकरांस आणून दिला. तरी त्याचें दिल्ली दरबारांत पाहिजे तितकें वजन पडूं शकलें नाहीं. बाजीरावानंतर सुमारें ११ वर्षें अशींच मराठ्यांचें वजन दिल्ली दरबारांत विशेष न वाढतांच गेलीं. इ. १७४९ व ५० या दोन वर्षांत एका बाजूस बादशाहातर्फे सफदरजंग आणि दुसऱ्या बाजूस रोहिलेपठाण यांमध्यें ज्या लढाया झाल्या त्यांत कांहीं केल्या सफदरजंगास जय मिळेना. तेव्हां त्यानें मराठ्यांची मदत घेण्याचें ठरविलें. मराठ्यांना अशी संधि पाहिजे होतीच. त्यावेळचे उत्तरेंतील पेशव्यांचे प्रतिनिधि शिंदे–होळकर यांनीं केवळ रोहिले–पठाणच नव्हत तर सर्वच बादशाही शत्रूंना तंबी पोचवून

बादशाहाचें व बादशाही मुलखाचें रक्षण करण्याचा तहनामा सफदरजंगाच्या मध्यस्थीनें बादशाहाशीं केला व त्याच्या मोबदल्यांत मराठ्यांना काय मिळावयाचें हेंही ठरवून घेतलें.

हाच प्रसिद्ध अहदनामा होय. हा मराठ्यांकडून रोहिलेपठाणांस तंबी पोचतांच झाला असावा या विषयीं शंका नाहीं. हा अहदनामा एका बाजूनें मराठ्यांच्या फायद्याचा असला तरी दुसऱ्या बाजूनें मराठ्यांवर मोठी जबाबदारी टाकणारा होता. बादशाहांत आंतील व बाहेरील असे दोन्ही प्रकारचे शत्रू होते किंवा असणें शक्य होतें. बाहेरच्या शत्रूंचा निःपात करतांना अन्तर्गत अडचणी कांहींच नसत किंवा नव्हत्या. पण अंतर्गत शत्रूंचे बाबतींत तसें नव्हतें. उदाहरणार्थ अब्दाली, रोहिले, पठाण इत्यादींना तंबी देतांना अडचण नव्हती; पण बादशाह व सफदरजंग यांजमध्येंच भांडण सुरू झाल्यावर विशेषतः तें भांडण सामोपचारानें मिटत नाहीं हें स्पष्ट झाल्यावर मराठ्यांनीं कोणाचा पक्ष धरावयाचा असा नाजूक प्रश्न उत्पन्न झाला. बादशाहाशीं करार होण्यास सफदरजंग कारणीभूत होता. तो इराणी होता. मुत्सद्देगिरीच्या दृष्टीनें त्याचाच पक्ष धरणें अतिशय उचित होतें. उलट बादशाही शत्रूंचा निःपात करून त्याचें रक्षण करण्याची जबाबदारी मराठ्यांनीं स्वीकारली असें अहदनाम्यावरून सिद्धही होतें. तेव्हां मराठ्यांच्या पुढें कोणाची बाजू घ्यावयाची असा गंभीर प्रश्न उभा राहिला.

या वेळीं मराठ्यांनीं बादशाहाचाच पक्ष घ्यावयास पाहिजे असें हिंगण्यास वाटे. पण मराठ्यांचे तर्फे दिल्लीच्या बादशाहाचे रक्षण करण्यासाठीं नेमलेल्या अंताजी माणकेश्वराचें मत सफदरजंगास मदत करण्याचे बाजूनें पडलें. यामुळें दोघांची धुसफुस सुरू झाली. इ. १७५२ च्या आक्टोबरमध्यें हैदराबादची निजामशाही आटोपण्याच्या हेतूनें मराठ्यांनीं उत्तरेंतून दक्षिणेंत आणलेला निजामाचा थोरला मुलगा गाजीउद्दीन औरंगाबादेपाशीं विषप्रयोगानें मारला गेल्यानें मराठ्यांस मोठें वैफल्य वाटलें. यावेळीं उत्तरेंत बादशाहापाशीं असलेला त्याचा मुलगा केवळ पंधरा सोळा वर्षांचा व तुराणी असूनही सफदरजंगाच्या पक्षांत होता. यामुळें मराठ्यांनीं सफदरजंगाचा पक्ष उचलून धरणें अधिकच आवश्यक बनलें. पण पुढें लवकरच या दुसऱ्या गाजीउद्दीननें सफदरजंगास सोडून बादशाह–इन्तिजामचा पक्ष धरला. यामुळें मराठ्यांपुढें बादशाह–इन्तिजाम–गाजीउद्दीन कीं सफदरजंग असा प्रश्न उभा राहिला. पुढें बादशाह–गाजीउद्दीन एक पक्षीय असल्यानें त्यांचा पक्ष धरणें मराठ्यांस [illegible] त्यांत सोईचें पडलें. पण ही एकी फार दिवस टिकली नाहीं. लवकरच बादशाह–इन्तिजाम विरुद्ध गाजीउद्दीन असे दोन तट पडले. तेव्हां मराठ्यांपुढें कोणाचा पक्ष घ्यावयाचा हा प्रश्न पुन्हा उभा राहिला. गाजीउद्दीनचा [illegible] आडवा येत होता. बादशाहाचा पक्ष घ्यावा तर त्याला [illegible] व त्यामुळें मुलगा [illegible] शिंदे–होळकर व अंताजी माणकेश्वर यांनीं [illegible] गाजीउद्दीनचा पक्ष [illegible]

होतें. बादशाहाची अदलाबदल करण्याचें सामर्थ्य आपल्यामध्यें आल्यास आणखी काय पाहिजे असें त्यांस वाटे. पण अशा करण्यानें बादशाह, तुराणी पक्ष व सर्व सामान्य मुसलमान जमात यांचा रोष होईल व तसें होणें मराठ्यांच्या हिताचें नाहीं असेंही वाटण्यासारखें होतें. शेवटीं सरदारांचा पक्ष बलवान ठरला व गाझीउद्दीनकरवीं अहमदशहास पदच्युत करून दुसऱ्या आलमगीरास गादीवर बसविण्यांत आलें.

हिंगण्यांनीं मराठ्यांचे वकील या नात्यानें कोणत्या प्रसंगीं कोणता पक्ष धरावा याविषयीं पेशव्यांस काय सांगितलें याची स्पष्टता करणारे कागद फारसे नाहींत. ते बहुधा बादशाहाच्या पक्षास चिकटून राहावयास सांगत असावेत असा अंदाज होतो. पण या खंडांतील ले. ९१ व ९२ या दोन पत्रांत बादशाह अप्रामाणिक आणि तो व हिंगणे दोघेही घटकेंत इकडे घटकेंत तिकडे असे चंचल बनल्याचा त्यांजवर आरोप केला आहे. अंताजी माणकेश्वर हा सखारामबापूंचा व्याही असल्यानें व तो हिंगण्यांचे विरुद्ध वागत असल्यानें हिंगण्यांना संशय येई कीं, हा पेशव्यांकडे आपल्याविरुद्ध कागाळ्या करतो. यांत कांहीं सत्य असण्याचा संभवही आहे. पण केवळ तेवढ्यावरून पेशव्यांचें मत कलुषित झालें नव्हतें. शिंदे–होळकरांनींही तक्रारी केल्या होत्या; एवढेंच नव्हे तर रघुनाथरावानें स्वतःही परिस्थिति अवलोकन केली होती. सर्वांचेंच मत वाईट झाल्यामुळें शेवटीं त्यांजकडील वकिली काढलीशी करून त्यांस तेरा लाख रुपये दंड केला व पुन्हा वकिली त्यांजकडे सोंपविली. ही गोष्ट श. १७५४ च्या जूनपूर्वीं थोडे दिवस झाली.

इ. १७५७ मध्यें रघुनाथराव उत्तरेंत गेला असतां पुन्हा त्यांचे घरादारांवर जप्ती आणून व त्यांजला वीस लाख रुपये दंड करून वकिली पुन्हा त्यांजकडे दिली. ती अव्याहत दिल्लीस इंग्रजी राज्य होईतों त्यांजकडेच चालू राहिली होती असें दिसतें. पण १७५७ च्या मार्च ६ नंतर लवकरच दामोदर महादेव मेल्यानें हिंगण्यांचें फारच नुकसान झालें. चारी भावांत यावेळीं तरी दामोदर महादेवच सर्वांत हुषार म्हणून समजला जात होता. बापूजी महादेव तर कामांतून गेल्याचेंच ले. ९१ मध्यें नमूद आहे. तरी तो आपल्या मृत्यूपर्यंत अर्थात् इ. १७७१ पर्यंत वकिलीचें काम करीत असलेला दिसतो. पुरुषोत्तम महादेवही इ. १७८२ मध्यें त्याचा मृत्यू होईतों उत्तरेंत वकिलीच्या कामावर होता. दामोदर महादेव जिवंत असतांनाच कनिष्ठ बंधू दिवाकर अथवा देवराव वकिलीच्या कामांत भाग घेऊं लागला आणि उत्तर पेशवाईंत हा पुष्कळच प्रसिद्धीस आला. पुरुषोत्तम व देवराव यांजवर नानाफडणीसाचा विशेष लोभ असल्यानें वकिलीस पुन्हा उर्जितावस्था आली, ती नानाफडणीसाच्या मृत्यूपर्यंत टिकून होती. मराठी राज्याच्या ऱ्हासाबरोबर तिचेंही महत्त्व कमी होत गेलें. देवरावानें दिल्लीकडील काम फार लवकर सोडलें असलें तरी तो इ. १८०६ पर्यंत पुणें, नाशिक इकडे वावरत होता. पुरुषोत्तमानंतर दिल्लीस गोविंद पुरुषोत्तम, दामोदर देवराव, गणपतराव दामोदर, अमृतराव पुरुषोत्तम इत्यादि हिंगणे मंडळी काम करीत होती. अशी या वकिलातीची थोडक्यांत हकीकत आहे.

अनंतचतुर्दशी श. १८६७ गणेश हरी खरे

# शोध

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४ | २९ | येऊन...जिल्यास | घेऊन...जिल्यास |
| ५ | १ | झाली | जाली |
| ५ | ३० | तुम्हा–पुरती | तुम्हापुरती |
| ६ | १३ | राजा–मलच्या | राजामलच्या |
| ७ | १८ | कलेना–सारिखे | कलेनासारिखे |
| २९ | १५ | वद्य १२ | वद्य ११ |
| ४५ | १६ | वाटोळा कंस गाळावा | |
| ५३ | १८ | अहे– | अहे |
| „ | २५ | नवाबही– | नवाबही |
| ६१ | १९ | जून ५ | जून ७ |
| ७२ | ९ | 'सफर ८' गाळा. | |
| „ | „ | डिसेंबर ४ | डिसेंबर ५ |
| ७३ | ८ | काम– | काम |
| १०५ | १८ | पाडावा | पाडवा |
| १२२ | २५ | या ओळीखालची टीप पानाच्या शेवटीं घ्यावी | |
| १२६ | शेवटची ओळ | जिरानी | वजिरानी |
| १२७ | २३ | मफर २५ | सफर २५ |

---

# संक्षेप, खुलासे

इ. = इसवी सन

नि. = निराळ्या हस्ताक्षरांत

ब. = बदामी आकाराचा–ची–चें

बाबापे = बाळाजी बाजीराव पेशवे

मो. जा. = मोकळी जागा

ले. = लेखांक

ल = लंबवर्तुळी

वा. = वाटोळा

श. = शक वर्ष

शि. = शिक्का

ष. = षट्कोनी

सु. = सुहूर सन सुमारे

पत्रांच्या मूळ पाठांत जास्त असलेलीं अक्षरें गाळण्यासाठीं ⌒ हें चिन्ह वापरावें असें प्रथम ठरविलें; पण एक किंवा दोन अक्षरांसाठीं तें चिन्ह वापरतां आलें. दोहों-हून अधिक अक्षरांसाठीं तें वापरतां येईना. तेव्हां उपरिनिर्दिष्ट चिन्हाऐवजीं { } हा कंस वापरावा लागला.

पैवस्तीचा शेरा पत्राच्या गाभ्यांत कधींच नसतो. पण काटकसरीसाठीं कांहीं ठिकाणीं तो पत्राच्या शेवटच्या ओळींत बसविला आहे.

# हिंगणे दफ्तर १ ला खंड

ले. १ श.१६१३प्रजापांते ज्येष्ठ शुद्ध १० भौम } श्रीशंकर नासिक त्रिबक { श. १६१३ ज्येष्ठ शुद्ध १० इ. १६९१ मे २६

वर्षासन पत्र खांसा साबाजी राजे घाटगे होन ४

श्री शके १६१३ प्रजापतिनाम सवछरे उतरायणे ग्रीस्म रितु जेस्ट शुध दशमी भोमवासरे तादिनी धर्मपत्र लेहून दिल्हे येसे जे राजेश्री अनतभट बिन नारायेणभट लोणकर वास्तव्य क्षेत्र श्री [मो. जा.*] यासि राजेश्री साबाजी राजे घाटगे देसाई का। मलेवडी पा। माण दंडवत विनती उपेरी तुम्हास अम्ही क्षेत्रीचे अपले पुरोहितपण दिल्हे यासि धर्मकृत्य वरसासन प्रतिवरसी होनू ४८ मो। च्यार होनू देऊ तुम्ही येऊन घेऊन जात जाणे उतरोतर चालऊ जाणिजे [ नि. * ] मोर्तबू सुद [ 'मुरत्तब शुद' असा फार्सी प- मोर्तब* ] [ पोठीवर पुढील शेरा* ] हे वि।।

[ सुरवातीस उजवे हातचे कोपऱ्यांत पुढील चौकोनी शिक्का* ] साबाजी माळोजी घाटिगे

---

ले. २ शाबान ७ } श्रीरामचंद्रजी साहाये { श. १६५७ पौष शुद्ध ८ इ. १७३५ डिसेंबर ११

श्रीमंत माहाराज राजमान्ये राजेश्री माहादेव भटजी स्वामीचे सेवेसी

सेवक चेरणरज्ये बाबूर्जी गीरराऊ सा। नमस्कार विनति उपरि येथील क्षेम ता। छ ७ माहे शाबान जाणोन स्वामीनी आपले क्षेम लिहि[णेस*] आज्ञा केली पाहिजे विशेश यानंतर स्वामीनी कृपापत्र पाठविले त्यनेकडून अनाथास सनाथ केलें परमानंद जाला त्यो कागदी क़ोठोर म्हणौन ल्याहावा त्यांत आज्ञा की रावजीस सागोन खर्चाची बेगमी लवकर करवणे त्यास सांप्रती येक लक्षा रुपयांची हुंडी तर स्वामीकडे रवाना केली आसे बाकी दोन लक्षे रुपये राहिले त्येही ईस्वरइछ्या आहे तर सत्वरच रवाना केले जातील व रावजी कुमकेच्या फौजेच्या व तोफखान्याच्याही तलाशांत आहेत ईस्वरइछ्या आहे तर फौजही स्वामीकडे लवकरच प्रोहचेल व राजश्री श्रीमंत रावसाहेब आलियावर त्यांच्या त्यांच्या भेटीनंतर वरकडही जे जे मतालीब त्यांचे आहेत त्ये त्ये आवघे निघून येतील व स्वामीसि येश पूर्ण येईल व स्वामी येश-

स्वीच आहेत व पुढेंही होतील आणि राजेश्री राणोजी सिंदे सुबेदार यांच्या आलकाब वाढवायाच्या विशई व थैलीच्या विशई अज्ञा केली होती त्यास स्वामींनी आपले स्वहस्ताक्षेरे बहुत बहुत लिहिले होते येव्हढ्याकरितां सेवकानेही राव किरपारामास बहुता प्रकारें दबाऊन सागितलें त्येव्हां त्याने नवाबास बहुता प्रकारें सागितले त्यास नवाबानी ज्वाब दिल्हा कीं हे पातशाही मुकदमा आहे त्यांच्या आमचा घरगती श्नेह तर ज्यो आहे त्यो तर चितास चीत साक्षे देतच असल परंतु पातशाही जाब त्याकरितां अधीक अलकाब लिहिला जात नाही ज्यो अलकाब कोटेवाले व बुंदीवाले येसे येसे भारी राजे आहेत आणि सरखुद आहेत ज्यो अलकाब त्यांला लिहितों त्यो अलकाब यांलाही लिहिला जातो व हे तर बाजीरायांसमागमे आहेत आणि त्ये स्वतंत्र आहेत तऱ्हीं आम्ही त्यांजबाा यांलाही लिहितो त्येव्हां राव किरपारामाने ज्वाब दिधला कीं येकीकडे त्यांलाही उभें करणे व येकीकडे यांलाही उभे करणे दोघांचेहीं झुज पाहने ज्यो लडाईत सेर होईल त्यास अधीक लिहिणे येसे म्हणौन फार फार रदबदल जाली त्ये कोठोर म्हणौन ल्याहावी त्यास निदान राव किरपारामाने सेवकास सांगितलें कीं तुम्ही हे वर्तमान सविस्तरे माहादेवभटजीस लिहून त्यांच्या कानावर घालवणे कां कीं आमची येव्हडी मेहनत रायेगां न जाये व आपण तर माहादेवभ[ट*]जीच्या रजामंदीसाठी व तुम्ही सांगितलें कीं त्यांही आपल्या स्वहस्ताक्षरे लिहिलें आहे येव्हड्याकरिता बहुता प्रकारें दबाऊन सांगून त्यांचा अलकाब भारी करविला व थैलीही त्यांजकारणे घेतली व पुढे त्ये याच गोस्टीत राजी असतील तर ईस्वरइछ्या आहे तर-राव राणोजी सिंदे म्हणौन लिहिविले जाईल तुम्ही आपली खातरजमा असों देण ज्या ज्या गोस्टी तुम्ही म्हणाल त्या त्या अवघ्या करविल्या जातील परतु तुम्ही मात्र आपल्या वचेनावर सांभाळून असने त्यासही ईस्वरइछ्या आहे तर ज्या मोकदम्यात रामचेंद्रबावा व माहादेवभटजी आहेत त्या मोकदम्यात आमचीही खातरजमा आहे व आम्ही त्यांच्याच भरोशावर येव्हडे ढोंग उचलिले आहे नवाब कमरदींखान व सादतखांन व महमदखां बगस व राजा अभेसिंग व सपूर्ण मोगलिये व समस्त लाहान थोर त्ये आवघे येकीकडे व येकले आम्ही येकीकडे येसे म्हणोन नवाब फार म्हणताती त्यास राव किरपाराम व यादगारखां सेवकास म्हणो लागले की हे वर्तमान तुम्ही सविस्तरे भटजीस लिहून त्याजहाती येसें करवणे कीं येथ पातशापासीं आम्हास बोल न लागे व तुमचा बोलबाला होये व वरकड दुशमनाची तोंडे काली होयेत त्ये करणे व नवाब रामचेंद्रबावाच्या पत्राविशई फार उल्हाने देत होत्ये कीं त्यांही आम्हाला फुकाचें पत्रही न लिहिले त्येव्हां राव किरपारामाने गोस्टीस सांभाळून ज्वाब दिधला कीं राणो[जी*] सिंदे व रामचेंद्रबावा म्हणायास कुडी वेगल्या आहेत परंतु जीव एकच आहेत व वर्तमानही येकच येव्हड्याकरितां लिहिले नसेल म्हणौन राव किरपा

रामाने गोस्ट सांभालली व सेवकास आज्ञा केली कीं तुम्ही त्यांस लिहून अखंड रामचेंद्रबावाचे पत्र नवाबास आणवीत जाणे कांकीं मुख्ये पत्र रामचेंद्रबावाचेंच आहे कीं येव्हडी इमारत त्यांच्याच भरोशावर आहे व त्ये कागद न लिहितील तर पुढे कामकाज कैसे चालेल येसे म्हणोन सेवकास बहुता प्रकारे ताकीद केली व धारवाल्यान्च्या विशई स्वामींनी लिहिले होतें त्यास राव किरपारामाने ज्वाब दिधला की हा पातशाही मुकदमा आहे येकायेकीच तगीर होऊं शकत नाही समये पाहून गोस्ट करावी लागत्ये येव्हड्याकरितां सांप्रतां त्यास ताकीद तों फारसी लिहिली आहे व त्याच्या वकिलाहातीही लिहिविले आहे व तुम्हासही मोठमोठाली कामें पुढें घेण आहेत त्यास सांप्रति येशा येशा मुकद्म्यावर अटकणे विहीत नव्हे जैसे जाणाल तैसें सांभालून घेत जाणे व पुढे पीरपरखाश होये त्यें न करणे येसे म्हणोंन राव किर[पा*]रामाने व यादगारखानाने सेवकास ताकीद फार फार केली वरकड वर्तमाना विशई लिहिले त्यांस सांप्रती हे अवघे फडफडीत आहेत परंतु खांन दौरां व जयेसिगा-पुढे यांचे काही चालत नाही नाहीतर हे दोघे वेगले करून वरकड अवघ्यांच्या मनात बिगाड करायाची गोस्ट आहे उदंड मनगटे तोडितात परतु यांजपुढे काहीं चालत नाही याजमुले सर्वप्रकारे स्वामीचाच बोलबाला आहे कलले पाहिजे वरकड वर्तमान येथास्थित आहे विशेश कार्ये लिहिणे रुपा निरंतर असो दीजे हे विनंति [पत्रारंभीं आडवें*] विहीत जाणाल तर राजश्री रामचेंद्रबावांस व रामरावजीस सेवकाचा नमस्कार पावता क्ररणे हे विनती

---

| | | |
|---|---|---|
| ले. ३<br>शाबान १७ | श्री | श. १६५७ पौष वद्य ३<br>इ. १७३५ डिसेंबर २१ |

वेदमूर्ति राजश्री महादेवभट स्वामीचे शेवेशी

सेवक रामचंद्र मल्हार सां। नमस्कार विनंति उपरि येथील कुशल ता। छ १७ माहे साबान मु॥ लोणवाडा जाणून स्वकीये कुशल लेखन करणें विशेष तुम्ही स्वार जाल्यानंतर येक पत्र तालेचा मुकामीहून पा। तें पावलें लि॥ वर्तमान विदित जाले येसियासि येथील सर्व मनसबा तुम्हास विदित असोन तुम्ही तेथें जाऊन विलंबा-खाले गोस्ट न घालणे श्रीमंत राजश्री सवाईजीस विनंति करणें कीं तुमच्या आज्ञेप्रा। रसायेन उतम उतरलें आहे त्याचें सार्थक हेंच कीं राजामलजीस सत्वर रवाना करणें येसी विनंति करून सवाईजीचेही डेरे बाहेर होयेत ते गोस्ट आविलंबे करणें श्रीमंत राजेश्री [मो. जा.*] पंताचा प्रसंग उतावलीचा तुम्ही जाणतचा आहां येथें विचार जाला आहे कीं देवलियाच्या घाटे चढोन मजल दरमजल जावदेवरून शाहापुरि-यावरी यावें हा सिधांत जाला आहे येसियासि इतक्या नजीक फौज आलियानें

देशास उपद्रव लागेल यास्तव राजामलजीस घेऊन तुम्ही सत्वर येणे आणि श्रीमंत सवाईजीचे डेरे बाहेर करवणें जोपर्यंत राजामलजीस घेऊन तुम्ही आले नाहीत तोपर्यंत यांसी विश्वास येत नाही सारांश गोस्ट पुढें महत्कार्ये करणे आणि थोड्या गोस्टी साठी विलंब लागला या गोस्टीवरून आपूर्वता मासते तुम्ही व राजामलजी आलेत म्हणजे तुम्हा उभयेतांच्या वि[नि.*] चारें फौज जिकडे चारणीस महिना पधरा रोज घालणे तिकडे घालणे तिकडे घालून [नि.*] बहुत काय लिहिणें हे विनंति

---

| ले. ४<br>मोहरम ३० नंतर | नकल खत खान-<br>दौरांच्या नावाची | श. १६५८ ज्येष्ठ शुद्ध २<br>इ. १७३६ मे ३१ |
|---|---|---|

आपण रुकसतेचे वेळेस खान वालाशान यादगारखां व राव क्रिपारामजीस तकरार सांगितलें होतें कीं आपणाचा पनासिसाठ हजार स्वार आहेत त्यांही हरतऱ्हेने आजपरयेंत जैसें जाणिले तैसे आपले पोट भरून काल गुजरान केली त्यास आतां चाकरीनौकरीचा कौलकरार मधे आला त्येव्हां त्यांची लूटलवाड आवघीच राहिली त्येव्हा आपण इतक्या फौजेस कोठोर म्हणौन चारावें त्यास या वोह्याने आपण निघू सकन नाही येव्हड्याकरिता आमच्या...चा ज्वाबस्वाल लौकर पोंहचल्यानें त्याजमाफी[क]...अमलांत आणिलें जाईल त्यास त्याही करार करून उत्तर दिधलें कीं आम्ही हुजुरास जाऊन पोंहचल्यावर दो तीं दिवसांत तुमचे तमाम मोकदमे सरंज्याम होतील त्यास हे तों हुजुरास जाऊन त्या अवघ्या गोस्टी त्यांच्या खातरेतून विसरून जाऊन कांहीं आमलांत आले नाही [त्या]...उपरांतीकही आपण जैसे जाणिले तैसी आपल्या क[रारा]हून आधीक त्या जिल्यात वाट पाहिली परंतु आखर मोहरमपरयेंतही कांही मतालब सरज्याम न जाले आणि पावसाला डोईवर येऊन पोंहचला याजकरितां आपले रफीक जे कोन्ही...आपल्या ज्वाबस्वालाच्या मोकदम्यास दिरंग लागला येव्हड्याकरीत बहूत उतावले जाले त्येव्हां आपण लाच्यार होऊन राणोजी सिंदे व मल्हारजी होलकर व येशवंतराऊ पोवार आनंदराऊ पोवाराचा ल्योक दाहा हजारा स्वारानसी जोंवर ज्वाबस्वाल हजूरचा येईल तोपरयेंत माळव्यांत ठीऊन आपण छ ३० मोहरमी फतीहाबादेस कूच केलें अगर आतांही आपल्या मतालबाचा ज्वाबस्वाल आपल्या कराराप्रमाणे जर हजुरांत सर्वही आपले मुकदमे कबूल पडल्यानें व आपली नौकरी मुस्तहकम होऊन जागीरच्या सनदा येऊन ज फौज माळव्यांत ठीवली आहे त्यास जर खर्चास लवकर पोंहचेल तर ईस्वरइच्छेने पावसाला......कबिले येऊन आपणही सत्वरच या जिल्यास येऊन पोंहचोंन ज्या प्रकारें आज्ञा होईल त्या रीतीनें वर्तनूक केली जाईल व येकदां आपल्यास कबिले आणायाकारणे दक्षिणेस जाणे जरूरच हों तों त्यास जनू येणेवेळेस हाच कामा-

पासून सुटका झाला आणि जर आपले मुकदमे हजूरात कबूल न पडेल तर आनर्सा तऱ्ही कांही पोटाची फिकीर केली जाईल व आपण तो जोंवर आपला मकदूर चाले तोंवर परयेंत आपल्या कौलकरारांत अंतर पडूं देणार नाहीं आतां कामाची सरज्यामी त्यांच्या...त आहे व वरकड वर्तमान माहादेवभटजी विनंती...कलो येईल विशेश काये लिहिणे पो छ १४ सफर

---

ले. ५ } सफर २५ } श्रीगजानन { श. १५५८ ज्येष्ठ वद्य १२ { इ. १७३६ जून २४

राजश्री सुभेदार व ता। राजेश्री बावा गोसावी यांसि

दं श्रीमत्सकलगुणालंकर्ण असंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्ये [ मो. जा.* ] प्रति शुभचिंतक माहादेवभट हिंगणे कृतानेक असीर्वाद विनंती उपरी येथील कुशल ता। छ २५ सफर मु॥ इंद्रप्रस्छ जाणून स्वकीये कुशल लेखन केले पा। विशेष येथील सर्व वर्तमान छ १७ सफरी बुधवारी पत्रें आपणाकडे पाठविलीं होती त्याजवरून विदित जाले असेल प्रस्तुत छ २२ रोजी नवाबाचे भेटीस आलो होतों त्यासी नवाबानी छत्रपती स्वामी यांसी राऊसाहेबांस व सरदारास वस्त्रें व जवाहर सिध केलें तें आम्हास दाखविलें सांगितलें की हातीघोडे व करारामा। सनदा याही आज येतील तुम्ही स्वार व्हावयासी मुहूर्त उतम पाहून स्वार होणें त्यावरून घरास येऊन छ २६ रोजीं सुक्रवारीचा महूर्त करार केला लक्ष रुपयाची हुंडी राजामलजीपासी तेच दिवसीं रवाना केली दुसरी आणीख लक्षा रुपयाची हुंडी तयार केली जवाहराचे कबज आम्हापासोन घेऊन आमच्या स्वाधीन करावयाची परवानगी जाली हाती घोड्यांचीही परवानगी होऊन नवाबाच्या घरास अले होते इतक्यामधें छ २३ रोजीं दिढा प्रहरा रात्रीं नवाबास वर्तमान आलें कीं उजेनचा किला दगा देऊन घेतला हें कलतांच परम श्रमी होऊन दुसरे दिवसीं छ २४ रोजी आम्हास बोलाऊन हें वर्तमान सांगितलें आणि बोलिले कीं दक्षणी लोक इमानी वचनाचे खरे हें जाणत होतों आणि मीं आपल्या वचनास चुकलों नाही जर यांसी बेइमानीच करणे होतें तर तुम्हास काये निमित्य येथें पाठविलें अथ:पर मीं पातशाहास जाब काये देऊं किती मेहनत करून आमित्राचा आपकर्ष करून तुमचें काम सिरीं चढविलें होतें त्याच आमित्राचा बोल तुम्ही खरा केला इतक्या उपर पातशाही फौजांचा पराक्रम द्रिष्टीस पडेल आणि तुम्हीही उजेन या बेइमानीने राखलच बरें आतां जे होतां होईल तें पाहालच पातशाहापासीं फौजेची व खजान्याची वाण नाही तुम्हा-पुरती फौज फार आहे येसें बोलोन इनामात व हाती व घोडे जवहर सनदा येसें सर्व यांचती महकूफ जाल्या आणि हुंडीही फिरोन अ..

उमरायासी फौज तयार करावयाची ताकीद केली यैसा रांधा नासला शुभचिंतकाने आपल्या जिवामाफीक श्रम करून कार्य करणें तें केलें होतें पुढेही येथाज्ञाने जाबसालास चुकणार नाही राऊ देशास गेलियानेंच काम नासलें होते तें त्यांच्याच प्रतापेकरून मागती करारप्रमाणें तहवर आणिलें होतें तुम्ही राहिलियानेंही च्यार लक्ष रुपये सर्चास द्यावे व पंचविसा कोढीची भागीदारीच्याही सनदा तयार केल्या होत्या पुढें सुभाही आपल्यासच द्यावा हा करार होता परंतु आपण हें काये समजोन केलें असेल हे न कले आम्हास नवाबानी पुसिलें ते वेलेस आम्ही उत्तर दिधलें कीं राणोजी सिंदे सुभेदार तेथें नसतील हें काम कोण्ही लाहाण माणासानें केलें असेल ते असलियावर हें काम होणार नाही तथापि त्यांच्या चितात हे गोष्टी असतील तर आम्हास इतला देते यैसा जाब दिधला येथें कारभार अवघा खवळला आहे इतक्या उपरही आपल्या चितांत सळूख करावावयाचीच गोष्ट असली तर उजेनचा किला सोडोन दोचौं कोसावर फतियाबाद वगैरे आणख्या स्थलीं छावणी करावी आणि सवाईजीचा येखादा मातबर माणूस बोलाऊन राजा—मलच्या विचारें किल्यामधें ठेवावा आणि नवाबास येक पत्र आपल्या नावें लिहावें त्यांत मजकूर लिहावा कीं हें काम आम्हास न कलता लाहाण माणसानी केलें होतें त्यास सजा पोहोचविली आपल्यास रायानी चाकरीसाठीं ठेविलें आहे आम्हास हुकूम कराल त्या माफीक वर्तणूक करून यैसें पत्र लिहिल्यानें व किला सोडिलियानें दुसरियानेंही गेली बाजी संवरते पुढें मनोगतानुरूप सर्वही होईल सुभा दरोबस्त आपला होणें तो आक्लेश होईल अपलाच आहे चौ दिवसामागून हेच स्वसंतोषें देतील मुख्य गोस्ट इतबार आपला राखलियाने सर्व काम होईल चार लक्ष रुपये हातास प्रस्तुत खर्चस येतील हे गोष्ट मनसुब्याच्या विचारें दीर्घ द्रिष्टीनें ध्यानास येईल तर याप्रमाणें पत्रामधें विशेष नम्रता आणूत गोळतेने लिहावें हा मोगलाई दरबार पत्रामधें यांची वडाई लिहिलियानें यासी समाधान आहे जर हे गोष्टी आपल्या चितास येत नसेल तर मजला या पत्राचें उत्तर सत्वर पाठवावें म्हणजे आज्ञेप्रमाणें मी सेवेस येऊन प्रविष्ट होईन आपल्या चितामधें बिगाड करावयाचीच गोष्ट असली आणि आम्हास उत्तर सत्वर न अलें तर नवाब तों थोर मनुष्य इमानी तो आम्हासी विरुध गोष्टी कदापि बोलणार नाही परंतु आमित्र मोगल वगैरे बहूत आहेत ते स्वारीमधे मार्गी नाहक येखादी खटखट करितील यास्तव जैसे असेल तैसे उत्तर पत्रदर्शनी लिहिले पाहिजे पातशाही शाहर खर्चही बेमुचलग लागतो यैसें चौकडोन क्लेशांत आहों आपल्या पत्राची अपेक्षा बहूत आहे ते पत्री काये म्हणून लिहावी आम्ही तो सात(न) आठ पत्रे तावर वरस्यावर पाठविली आणि आपण हे काये समजोन केलें असेल ते ईश्वर जाणे हा॥

---

ले. ६
सु. ११३७ रबल १२

श्री

श. १६५८ आषाढ शुद्ध १५
इ. १७३६ जुलै ११

वेदमूर्ती राजश्री माहादेवभट हिंगणे गोसावीं यांसि

सेवक बाजीराव बलाल प्रधान नमस्कार सुा सबा सलासीन मया अलफ तुम्हीं पत्र छ [ मो. जा.* ] पाठविले ते छ ७ रालोवली प्रविष्ट जाहालें त्यात मुख्यार्थ हाच कीं राजश्री [ मो. जा.* ] स्वामीस व आपणांस इनायेत हती व घोडे व जवाहीर व सिरपाव पाठवावयास तयार केले असे व सनद न........तयार होत आहे खर्चाची गो...रुपये चार लक्ष द्यावेसे ठहरोन तूर्त येक माहीं रुपये येक लक्ष देतात हुडी करून अगर रोखच तुम्हीं पोहचावणे म्हणतात त्यासी आम्ही मान्य केले नाहीं आजी या लक्षाची हुडणावल आम्ही द्यावयाचे मान्य करावें तरी पुढें हेच चाल पडेल याजकरिता आम्हीं यादगारखानांस सागणे ते सागोन त्याजकडेच लाविले आहे हुडी होऊन आली म्हणजे येका दो दिवसा पाठऊन देतो वर्कड आम्ही बराबर घेऊन येतो भेटीनतर सविस्तर विनंती करून म्हणोन तपसिले लिहिले ते कलले येशांस आम्ही छावणीस राहावे हा आमचा निश्चये होता तुम्हांस ठावकाच आहे तुम्ही व यादगारखान रुपाराम याणी विसा रोजांत जाबसाल पाठवावासा करार करून गेलेत त्याज गोष्टीवर प्रतीक्षा करीत अवघ्र पाउणे दोन मास दोन मास वाट पाहिली जवाबसाल निश्चयेरूप येकही न कले तुमची अवस्था काये जाहली तेही कलेना—सारिखे जाहलें आखेरीचे दिवस लस्कर थोर छावणीस राहावयास पोटाची गोष्टी मातबर ते गोष्टीवरी सारी इमारत ते काहीच कलेनासारिखे जाहले मोगली मनसुबा चिकट खर्चास देतील न देत हाही भरवसा नाहीं निदान जाहले लस्कर तो बुडविता नये तेव्हा राजश्री मल्हारजी होलकर व राणोजी सिंदे तुकोजी पवार व जिवाजी पवार व येशवंतराव पवार बारा पधरा हजार फौजेनिसी ठेऊन आम्हीं बुलगे घेऊन देसास आलो जरी तुम्हीं नियेत करून गेला त्याप्रो खर्चासुधा पत्र येऊन पावते तरीं आम्हीच खामखा राहतो ते गोष्टी न जाहाली असों हाली येक लक्षाची हुडी पाठविली म्हणोन लिहिता तरी लक्ष रुपये म्हणजे काये फौज पधरावीस हजार त्याचे आठवडियाची बेगमी नाहीं हे गोष्टी कार्याची नव्हें यादगारखान रुपाराम करार करून गेले आहेत त्याप्रो पाच लक्ष रुपये खर्चाचे व सनद असनाद च पातशाहाकडील खलत हातीघोडे जवाहीर वस्त्रें व च्यातुर्मासा आलीकडे सुभ्याची सनद व रोहिल्याचे-मुलूखची सनद येसी पाठऊन द्यावी म्हणजे आम्ही दसरा करून येतों येथें आलो म्हणोन आम्हास यावयास विलब आहे येसे नाही कराराप्रो अमलात आलिया आम्ही ते क्षणी येऊन पोहाचतों नवाबाचे चितांत कितेक विचार आहे तदनरूपच घडून येतील मुख्य गोष्टी करार करून गेले त्याप्रो अमलात आलिया आम्हीं नवाबाचे पदरीच आहो आम्हास नवाबाचे श्रेहापेक्षा दुसरी

जोड नाही मुख्य गोष्टी जागीरची सनद व खर्चास पाच लक्ष रुपये देतात म्हणून रुपारामजीने सवाईजीस लिहिले ते पाच लक्ष व व रोहिल्यांचा मुलूक सोडवावयास फौज द्यावयाचा करार आहे ते त्याणी उभयेता मारानिले जवळ पाठऊन द्यावे तुम्हीं घेऊन येणें व सुभ्याची सनद चोमासा आलीकडे द्यावी ते त्याहीं कराराप्रो पाठवावी म्हणजे आमचा करार आहे तो त्यास अतर आहे येैसे नाही केवळ आम्ही टोलाटाल करून आलो येैसे नाहीं आम्ही आलो परंतु फौज ठेऊन आलो असो तरी लिहि-ल्याप्रो त्याही तो सरजाम पोहचवावा आम्हांस तों ते प्राते येणेच आहे दसरा होताच येतों जाणिजे छ १२ रालोवल [ नि.* ] बहुत काये लिहिणे [ वा.* ] लेखन सीमा

---

ले. ७
रवल २५

श्री

श. १६५८ आषाढ वद्य १२
इ. १७३६ जुलै २४

राजश्री माहादेभट गोसांवी यांसि

दं अखडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य [ मो. जा.* ] श्रो राणोजी सिंदे दंडवत विनति येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणें विश [ ष* ] तुम्ही पत्र पा ते पावलें सनदापत्रा खर्चवेच तयार जाहला होता तो वर्तमान आले कीं उजे-नीचा किला दगा करून तुम्हीं घेतला यास्तव मकूब जाहाले म्हणौन लिहिले तरी उजेनीमधें त्याचा नायेब साहेबराऊ किलेदार आहे आमचा गोरखोजीही आझून अम्हापासींच आहे आम्ही मवासामधें छ्यावणी केली आहे उपराटे जोरावरसिंगाची बाकीही वसूल करून देवितो परभारे बातमी पाठवून खबर घेणें वर्तमान लबाड आहे पातशाही आंधेर ज्याच्या चितास येईल त्याणें मनमाने ते ल्याहावे नवाबानी खरें मानिले आसेल तरी त्यासी सांगणे कीं आजी दोन वर्षे मेहनत तुम्हास येश द्यावयासी करितो नाही तरी आम्ही कोण्हेविसी चिंता करीत नाही अगर पाईपडीची चाकरीही करणार नाही आमचा ईस्वर आम्हास देऊन राहिला आहे सलूख जाहा-लियानेच आम्हास फिकीर पडते बदसलुखे बहूत संतोष आहे म्हणोन सांगणे बेमानी आम्हाकडून नाही त्यांचे आंगी पुरती लाऊन निरोप घेऊन स्वार होऊन येणे जाणिजे छ २५ रावल बहुत काय लिहिणे हे विनंति [ नि.* ] पो छ २२ राखर सवाई जयपूर

---

ले. ८ }
पौष शुद्ध ११ }

{ श. १६६० पौष शुद्ध ११
{ इ. १७३९ जानेवारी ९

श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] राऊ स्वामिचे सेवेसी शुभचिंतक माहादेवभट हिंगणे कृतानेक आसिर्वाद विनंती उपर येथील स्वामिचे कृपेकटाक्षेकरून पौष शुध ११ पावेतो क्षेम असे विशेष श्रीमंत आपाची अज्ञा अलेदीच्या मुकामीहून कन्येच्या लग्नास्तव घेऊन स्वार जालो ते नाशकास आलों कन्येचे लग्न मार्गेश्वर शुधांत केले यांउपर तिकडे यावें तो आपलेच आगमन इकडे होणार याजकरिता राहिलों त्यास आपलेच आगमण कधी होईल किंवा आम्हीच तिकडे यावेंस अज्ञा न्यास कर्तव्य ते करावी बहुत काये लिहिणे हे विज्ञाप्ति

---

ले. ९ }
सु. ११३९ सव्वाल २९ }

श्री

{ श. १६६० माघ शुद्ध १
{ इ. १७३९ जानेवारी २९

राजश्री बलवंतराऊ टोके गोसावी यांसी

दं अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री [ मो. जा.* ] बाजीराऊ बलाळ प्रधान आसीर्वाद सुा तिसा सलासीन मया अलफ सरकारची उंटे नासिक प्रातें राजश्री महादेवभट यांजपासी ठेविली होती त्यास तुमची स्वारी त्या प्राते जालियाउपरी तुम्हाकडील स्वारानी उंटे चोरून नेली त्याचा माग तुमच्या डेरियापावेतो लाविला असतां उट लांचविले आहेती म्हणोन कलले तरी सरकारचे उटे न्यावी लावावे हे गोष्टी कांही उतम आहे ऐसे नाही हे गोष्टीने उट तुम्हास सुटतात की कार्ये तरी याउपरी उंटे जेथे गेली असतील तेथून आणऊन पुणियास पाठऊन देणें जरी उटे तुम्ही पाठवीत नाहीं तरी तुम्हास उटे सुटणार नाही पष्ट समजोन उटे पाठऊन देणें [नि.* ] जाणिजे छ २९ सवाल [नि.*] बहूत काये लिहिणे [ वा.*]लेखन । सीमा

[पाठीवर डाव्या हातच्या कोपऱ्यांत वा.शि.*] श्री । राजा शाहू नरप । ति हर्ष निधान बा । जीराव बलाळ । मुख्य प्रधा । न [उलटा*]

---

ले. १० }
माघ शुद्ध ८ }

श्री

{ श. १६६० माघ शुद्ध ८
{ इ. १७३९ फेब्रुवारी ५

[ बालबोधींत* ] सत्वर आम्हापाशी पाठऊ

सहश्रायें चिरंजीव बापाजी व दामाजी व पुरुषोतमजी यांप्रति माहादेवभट हिंगणे आसीर्वाद उपर येथील क्षेम ताा माघ शुध ८ जाणोन स्वकीयें कुशळ लिहिणें विशेष विहीत गांवीहून स्वार जालों तें शुक्रवारी पुण्यास आलों श्रीमंताचे डेरे ते

दिवसीं बाहेर आले होतें दुसरे दिवसीं तेही आलेत भेटही जाली कितेक वर्तमान सांगायाचें तें सांगितलें त्याप्रमाणें उमाबाई दाभाडण यांस पत्र दिधलें आहे व आम्हीही राजश्री अंबाजीपंत व गिरमाजीपंतास पत्र लिहिलें आहे तें त्यास देणे श्रीमताचे पत्रीं उंटाची ताकीद लिहिली नाहीं कारण हेच की पहिल्याणें आम्ही न घेता जे त्याणी लिहिणे ते लिहिलें आहे वारंवार काये लिहावें तुम्ही बाईस भेटोन उंटाच्या विशी इटकणे ते जोंच देतील ते लिहिणे श्रीमंत राजश्री राऊ तो आम्हांसी बोलिले आहेत कीं त्याचे डेरियापासून मातबर उंटे च्यार सोडून आणून फिकीर नाही परंतु तुम्ही बाईसी सोमोपचारेंच बोलणे हे गोष्ट न काढणे रा हरबाजीपंत भिडे यांस आम्ही पत्र लिहिले आहे व कासीराजभट पंचधारी यांस लिहिलें आहे ते त्यांची त्यांस प्रविष्ट करणे बहूत काये लिहिणे हा आसीर्वाद

या राजश्री बाबूभट व शंकरभट शौचे व त्रिंबकपंत यांस नमस्कार अनुकर्मे आसीर्वाद उपर लिहिलें परिसोन रुपा असों दीजे

[ बालबोधींत* ] राजेश्री त्रिंबकपंतास आशिर्वाद विटाचे काम चालि लावणे भिंतीचे काम पडो न देणे जागा पुढील हवार करून ठेवणे हा आशिर्वाद -

रा रघुनाथजीस आशिर्वाद घराविषयी आम्ही तुमच्या भरवशावर निश्चिंत असो

---

| | | |
|---|---|---|
| ले. ११<br>सु. ११४० रवल २१ | श्री<br>[ आरंभीं ले. ९ प्रमाणें शिक्का* ] | श. १६६१ ज्येष्ठ वद्य ८<br>इ. १७३९ जून १७ |

अभयपत्र समस्तराजकार्यधुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री बाजीराऊ पंडीत प्रधान ता मोकादमानी मौजे सुकेणे पा नासिक सुा आर्बैन मया व अलफ तुम्हास राजश्री मल्हारपंताचा व मातुश्री उमाबाईचा वगैरे कितेक मौजे मजकुरास उपद्रव लागतो म्हणोन महादजी जासूद याणी हुजूर येऊन विदित केले त्यावरून रा मल्हारपंतास व उमाबाईस पत्रे पाठविली आहेत ते कोणे गोष्टीने मौजे मजकुरास उपद्रव देणार नाही तुम्ही आपले समाधान असो देणे व मौजे मारचा बाजार भरि [ वत* ] जाणे रयतेचा दिलासा करून गाव आबाद होये ते करणे जाणिजे छ २१ रबिलोवल [ नि.* ] आज्ञा प्रमाण [ वा.* ] लेखन । सीमा

---

| | | |
|---|---|---|
| ले. १२<br>भाद्रपद शुद्ध ३ मंद | श्री | श. १६६१ भाद्रपद शुद्ध ३<br>इ. १७३९ आगस्ट २५ |

वेदशास्त्रसंपन श्रीमंत राजश्री महादेवभटजी स्वामिचे शेवेसी

प्रोष्यांतरगत मल्हार कृष्ण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील क्षेम ता भाद्रपद शुध. तृतीया मंदवारपावेतों मुा वाफगाव स्वामिच्या आसीर्वादें करून

स्वरूप असो विशेष आम्ही आल्याता काही वर्तमान स्वामीकडील कलत नाही तरी सविस्तर लिंहिले पाहिजे आमचें वर्तमान तरी येथे आलों येजमानाचें दर्शन जाहालें दोन दिवस भाशण त्याणी कार्याकारण मात्र करीत तिसरे दिवसी येकांती कितेक प्रकारें सांगितले व रा भोजकट व सर्व विप्रमडली याणी सागितल्यावर मागती पूर्ववत कृपा करू लागले जमीदार पुढे आले आहेत त्याचाही बहूतसा हेत की मामल्यांत घालमेल करावी त्यास येजमानाही पष्ट उतर दिल्हें की मामला माल्हारपंताचा येकूदर तुमच्याचेने काढितों यैसे नाही तुम्ही मल्हारपताबरोबर जाणे त्याची तुमची गोडी करून देतों यैसे पष्ट सागितलें आहे आपल्यावर बहूतसा श्नेह करितात सर्व मडली आपलीच आहे आपल्या मामल्यात घालमेल नाही स्वामीचें आगमन लौकर जाहालियानें कितेक कामकाज मामले वगैर या प्रांती आल्याने होईल मागेंही येथो आल्यावर स्वामीस लिहिले आहे परंतु आगमन न जाहाले याउपरी अगत्य आले पा श्रीमंत-राजश्री आपाही लौकरीच पुण्यास येणार आहेत आपले येजमान अद्याप वाफगांवास आहेत आठाचौ दिवसी पुण्यास जातील या प्रकारचें वर्तमान आहे राजश्री सिवजी शंकर यास बरे वाटत नाही हाली काहीसे आरोग्य जाहालें आहे परंतु सर्व प्रकारें तुम्ही लक्ष कामे टाकून सत्वर येणे विशेष काये लिा [ नि.* ] हे विनंती

---

ले. १३ } श्री { श. १६६२ वैशाख शुद्ध १३ पूर्वी
इ. १७४० एप्रिल २८ पूर्वी

पुा श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] पंत प्रधान स्वामिंचे सेवेसी

पूर्वी अमीरखानासी राजश्री बाबूरावजी करार करून अलियावरी मागाहून अस[फ*]ज्यांहाकडून सेद लस्करखान अपणाकडे अले आणि नासरजंगासी अपल्यासी सळूसही जाला दुसरें कमरदीखान व असफज्यांहा दोघेही येकचित होऊन बाहेर निघाले यावरून पातशाहा घाबिरे होऊन असफज्याहासी सख्य संपादून अमीरखानास यांचे मुद्देमाफीक निरो[प*] दिल्हा परंतु चितांत विशमच होतें इताकियांत वर्तमान यैकिलें कीं सैद लस्करखानाची गोष्टी अपण न यैकिली अणि अम्हास इकडे रवाना केलें यावरून सवाईजीचे चित स्वस्थ होऊन सार्वभौमास लिहिले कीं रायांनीं ह्या पक्ष कबूल केला हें वर्तमान सार्वभौमानी यैकोन बहूत संतोषी होऊन सवाईजीस लिहिलें कीं तुम्हीं अपली निशा करून घेऊन अपलें पत्र आम्हास लिहेवें याल म्हणजे अमची निशा होईल आणि कोयेही करून दिल्हीं [जा]तील येथें पत्रें इंद्रप्रस्थींहून अमच्या भेटी अगोधर येक दिवस येऊन पोंहचलीं होतीं तीच पत्रें बाजिनस सवाईजीनी अम्हास दाखविलीं आणि बोलिले कीं श्रीमंत रायांचा करार पृथ्वीपतीसीं सळूखाचा निश्चयात्मक असिला तरी तुम्हीं द्यावें [illegible] तर

घाल म्हणजे अम्हीं पातशाहाची निशा करून प्रस्तुत खर्चास पांच लक्ष रुपये पक्षसंख्यामध्यें अणऊं त्यावरून यादवरायानी व अम्हीं सवाईजीस वचन दिल्हे कीं रायांस असफज्याहाचा पक्ष कबूल नाही हाच पक्ष कबूल अहे सवाईजी बोलिले कीं पातशाहांसीं स्नेह केलियानें जैसें कार्य होईल तैसें अणखियाऱ्याने कार्य होतच नाही परंतु श्रीमंतांचें कार्य न व्हावें या [ अपूर्ण * ]

---

लें. १४ } श्री { श. १६६२ वैशाख शुद्ध १३ पूर्वी
जवळ ८ } { इ. १७४० एप्रिल २८ पूर्वी

गुरुभक्तपरायेण तपोनिधी महत ज्ञानगीर मठ जयेनगर प्रा सुलतानपूर यांसी

प्रति बाजीराव बलाल प्रधान नमो नारायेण उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणें विशेष प्रस्तुत तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान कलत नाहीं तरी सविस्तर लेहून पाठवणें यानंतर राजश्री महादेवभट हिंगणे यासमागमे कार्यप्रयोजनाविशीं कितेक सांगून पाठविलें आहे त्याप्रमाणें तुम्हांस सागतील तरी तुम्हीं मनावरी घेऊन कार्य करून पाठविलें पाहिजे [ नि.* ] जाणिजे छ ८ जमादिलोवल [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन। सीमा

---

ले. १५ } [ पहिला बंद बहुधा फाटून गेला आहे.* ] { श. १६६२ ज्येष्ठ वद्य ४
रवल १८ } { इ. १७४० जून २

हें वर्तमान सवाईजीनी आम्हास सांगितले कीं तुम्हीं या गोष्टीचे बलकटीनें वचन देणे म्हणजे अमीरखाजीसी व बाबूरावजीस करार जाहाले ते ते सरजाम होतील त्याजवरून आम्ही सवाईजीसीं वचन प्रमाण केले कीं ये गो[ ष्टी* ]ची सला श्रीमंतांची आहे यांवरून रुपारामास ताकीद लेहोन यादवरायांस दिलीकडे मार्गस्त केले आहे आम्ही येथे आलियावरी वर्तमान येकिले कीं अमीरखान बंगशापावेतों पावले मागाहून वजीराचें पत्र गेले कीं तुम्हीं तेथेच राहाणे बहुतेक हजूर बोलावितील पूर्वी अमीरखानासीं राजश्री बाबूरावजी करार करून आलियावरी मागाहून असफज्याहाकडून सैद लस्करखान आपणांकडे आले आणि नासरजंगांसी आपल्यासी सलूख हो जाहाला दुसरे कमरदीखान व आसफज्याहा दोघे येकचित होऊन बाहेर निघाले यावरून पातशाहा बाबरें होऊन अस[ फ* ]ज्यासीं सख्य संपादून अमीरखानास त्याने मुदेमाफीक निरोप दल्हा ( दिल्हा ) परंतु चितात विषमच होते इतकियांत वर्तमान येकिले कीं सहद लस्करखानाची गोष्टी आपण न आइकिली आणि आम्हांस इकडे रयाना केले यांवरून सवाईचे चित स्वस्त होऊन सार्वभोमास लिहिले कीं रायानी हान

पक्ष कबूल केला हे वर्तमान सार्वभोमानी यैकोन बहूत संतोषी होऊन सवाईजीस लिहिले कीं तुम्ही आपली निशा करून घेऊन आपले पत्र निशेचे आम्हास घालं म्हणजे आमची निशा होईल आणि कार्यही करून दिल्हे जातील यैसी पत्रें इंद्रप्रस्थींहून आमच्या भेटी अगोधर येक दिवस येऊन पोहचली होती तींच पत्रे बजनस सवाईजींनी आम्हांस दाखविली आणि बोलिले कीं श्रीमंत रायाचा करार पृथ्वीपतीसीं सलूखाचा निश्चयात्मक असिला तर तुम्हीं शफथपूर्वक वचन द्या म्हणजे आम्हीं पातशाहाची निशा करून तूर्त पाच लक्ष रुपये पधरा लक्षामध्ये आणऊन त्यावरून आम्ही सवाईजीस वचन दिल्हे कीं रायांस आसफजाहाचें कडील पक्ष कबूल नाहीं हाच पक्ष कबूल आहे सवाईजी बोलिले कीं पातशाहासी श्नेह केलियानी जैसे कार्य होईल तैसे आणखी वाटेन कार्य होत नाहीं श्रीमताचे कार्य न व्हावें पातशाहासीं विकल्प पडावा यास्तव नकारपूर्वक अधिक आशा दाखवितील ते गोष्टी आपण मनावर न घेता पातशाहाचेच गोष्टीवरी कायेम असलियाने सर्व मुदे होतील आम्हीं सवाईजीचे समाधान केलें तेच समई डाकेवरा सवाईजींनी कृपारामास लिहिले कीं आपली निशा पातशाहास देऊन पाच लक्ष रुा खर्चास पाठवणे राव उजैनींस आले म्हणौन लिहिले आम्हास सागितले की रायांस लेहून लौकर उजैनीस येऊन राहात ते करणे पाच लक्ष रुा व अयामल व तुम्ही रायांकडे जाणे तदोतर राणाजी व आम्हीं रायांचे भेटीस विसा कोसावरी येऊन उपरातिक पातशाहाचे विचारे मनसुबा कर्तव्य तो मातबरीने केला जाईल म्हणौन सागितले तरी स्वामींनी लौकर उजैनीस यावे म्हणून तपसिले वर्तमान लिहिले ते अक्षरशाहा अवगत जाहालें ऐशास पातशाहाची सर्वप्रकारें कृपा संपादून घेऊन पातशाहतचा बंदोबस्त तुटला आहे कितेक अमीर बेयेख्तियार होऊन जो जे जागा राहिला तो बराये खुद खावंद आपणच यैसे मानून पातशाहाचा हुकूम किमपि मानीत नाहीं त्यास पातशाहाच्या येख्तियारांत आणून पातशाही बंदोबस्त करून रयेत गोर गरीबाची दुवा घ्यावी मुलकाची मामुरी करून पातशाही खजानियाची तरकी करून हिंदुस्तानच्या पातशाहतचा बंदोबस्त केलियाची लोकोत्तर कीर्ती संपादून पातशाहाचे कृपेस पात्र व्हावें यांच अन्वयें आजी आठ दाहा वर्षे तीर्थरूप कैलासवासी राव यानी राजश्री सवाईजी यांचे हातून नवाब खानदौरा यांजसीं संदर्भ लाविला होतां कितेक करारमदाराच्या गोष्टी सवाईजीच्याच विद्यमाने होऊन आल्या होत्या त्याचा परिणाम लागोन योजिला मनसुबा पातशाहाच्या चितानरूप सेवटास जावा तरी आमचा प्रसंग सरदारी सिपाहखर्च व किलेजात व बाजे कितेक कामे यामुले वोढगस्त सार्वभोमापासून मदतखर्च व कर्ज परिहारास द्रव्य प्राप्त होऊन उमदा मनसुबा करून बंदोबस्ताची सुरत करून दाखवावी तर ते गोष्टी त्याजकडून होऊन आली नाहीं द्रव्यावरी मनसुबा आमचा त्यामुले सर्व सिथील पडले मध्यें कितेक विक्षेपही पडले तथापि रायांची उमेद पातशाहीं बंदगी हासील करून घेऊन आपले करारमदारावर कायम राहावें हेच त्रिकर्ण-

पुरस्तर होते तेच गोष्ट चितात आणून उद्डही आशा नवाब आसफज्याहानीं दाखऊन सेद लस्करखान पाठविले त्यास तन्हा देऊन पूर्वीपासून जे जे गोष्टी चितावरी धरिली आहे तेच परिणामास लावून लोकोतर उतम करून दाखवावें दुसऱ्याजवळून द्रव्यादीक विशेष प्राप्त जाहाले आणि सार्वभोमापासून काही नून्य मिलाले तरी तेच कबूल करावे आणि आपल्या वचनप्रमाणावर काईम राहावें याच अन्वयें रायाची आमची बोली दृढोतर होऊन तुम्हांस सवाईजीकडे पाठवावेसा निश्चये ठहराऊन ठेविला तदोतर रायांनी मालवियांत जावयाचा उदेश केला आम्हीं अवरंगाबादेस गेलो उपरातीक रायानी तुम्हास सवाईजीकडे रवाना केले रायानी बरानपुराहून कूच करून नेमाड खरगोण प्राते आले काकेरकर मवास मुफसद होता त्याचे पारपत्य करून बंदोबस्त केला तदोतर कूच करून रेवा उतरून जाताच शरीरी पीडा वायोची होऊन वैशाख शुध त्रयोदशीस रायानी देहावसान केलें ईश्वरे मोठी अनुचित गोष्ट केलीं ईश्वरी तंत्रास उपाये नाही नाही जे जे काली ज्या ज्या गोष्टी घडून येणार तितक्याच घडतात सर्व गोष्टीस ईश्वरी सता प्रमाण आहे माणसाचे हाती तिलमात्र नाहीं परंतु विचारी दीर्घदर्शी लोक आहेत ते मनसुबियांचा पेश अंदेशाचा विचार चि [ ति* ]तांत व सवाई प्रमुख थोरथोर आहेत त्याचेही चितात येणे ते आलेच असेल या गोष्टीचा विचार कैसा म्हणाल तर तीर्थरूप कैलासवासी नाना याची नजर रयेत पाळावी अशेष जनाची दुवा घ्यावी हेच त्याचे चितात कायावाङ्मन्सा होते तदनुरूपच अरण्यवत मुलूख जाहाला होता त्यास कौल देऊन कंटकाचा उछेद करून रयेत नादविली रयेतीचा आसीर्वाद घेतला तन्मुले नानाची कीर्ती लोकोतर प्रकाशमान जाहाली नानाचा काळ जाहाला तीर्थरूप राव प्रधानपदास आठई जाहाले राजश्री [ मो. जा*. ] स्वामींनी कृपा करून गौरव केलें नानाच्या पदरीं रयेतेची दुवा व देव ब्राह्मणाची स्थापना केली त्यांचा आसीर्वाद पदरी विपुल ते पुण्य नानानी रायाचे पदरी बांधलें व रायांचीही बुध रयेत परिपाळणांस पूर्ण देवाब्राह्मणाची स्थापना करून काश्यादीक माहास्थली विश्वेश्वराचा जीर्णोध्धार करावयांस निरत होऊन त्याच मार्गेकरून रयेत नादविली रेवादक्षणतीरी देवाब्राह्मणांची स्थापना करून माहास्थलाचा जीर्णोध्धार केला पुढे उतर प्रांती कीर्तिलता प्रफुल्लित केली विश्वेश्वराची स्थापना करावी हे आर्त होतीच नानानी कीर्ति संपादिली त्यापेक्षा दशगुणीत कीर्ति जगत्यात रायाची प्रकाशमान जाहाली राव पूर्ण प्रतापी प्रतिश्रेष्टकर्ते होते त्याचे पुत्र चिरंजीव राजश्री नाना आहेत सर्वाप्रकारे बुधिमंत वडीलवडिलोपार्जित येशकीर्ति घडून आली ते अभिवृधीस पावावयास निपुण आहेत दुसरें उभेयेतां तीर्थरूपाचे पदरी रयेतीची दुवा व देवाब्राह्मणाचा आसीर्वाद होता तो त्याणीं यांच्या पदरी बांधिला सर्वा जनाचे ज्यांचे त्यापरी परिपालण करावें हेच उमेद आमची व चिरंजीवाची आहे वडिलांचें पुण्य आमच्या मस्तकी आहे कोणेविशीं तिलमात्र नून्य पडेसारिखे

आहे येसे नाहीं राव असता सरदार व फौज व कार्येकर्ते पुरूष पदरी होते तेच प्रस्तुत आहेत ज्या ज्या गोष्टी रायानी संपादिल्या व संपादावयाच्या चितांत आल्या त्याचा परिणाम लावावा हेच त्रिकर्णपुरसर चितांत आहे प्रस्तुत आम्हीं चिरंजीव राजश्री नाना राजश्री [ मो. जा.* ] छत्रपति स्वामीचे दर्शनास जातों नानास पेशवाईची वस्त्रें देऊन बहुमान करून अविलंबेच पुण्यास येऊन तों सरदारही मुळूकगिरीहून येतील लक्ष फौजेची समजावीस व तयारी व्हावयास कनिष्ट पक्षी दोन तीन मास लागतील तदोतर सरदाराचे आमचे विचारें आम्ही अथवा नाना फौज घेऊन त्या प्राते येऊन ज्या ज्या गोष्टी रायानी अविलंबिल्या होत्या त्याची अभिवृधी करून सार्वभोमाचे मनोभीष्ट सिधीस नेऊन त्याचे कृपेस पात्र होऊन अन्यथा दुसरा विचार नाहीं तुम्हीं सवाईजीस येविसी सागणे ते सागितलेच असेल व सांगोन त्याजपासून पातशाहास लेहून पाठवणे नकारपूर्वकाचा उपमर्द करावा हे गोष्ट सार्वभोमाचे व सवाईजीच्या चिता[त आ]हे तदनरूपच घडून येईल संदेह नाहीं रायासी जें जे करार केले त्यावर त्याणी काईम राहून किंबहुना त्याहून विशेष करून द्यावें हे गोष्ट सर्वात्मना त्यास योग्य आहे पंधरापैकी पाच लक्ष तूर्त रायांकडे पाठवावयास त्याणी तयार केले होते त्याप्रो सवाईजीस सागून अविलबे पाठवून देणे सारे फौजेची सिधता करून दसरा होतांच उभयेतातून येकजण सरदारसहवर्तमान घेऊन त्या प्राते येऊन तदोतर राजामलजी [ स घे ] ऊन तुम्ही पुढे येणे उपरातिक सवाईजी व राणाजी यांचे भेटीचा विचार करून अभेसिगजीसही उभयेताचे विचारे आपणाजवळ आणून भारी होऊन सार्वभोमाची इच्छ्या असेल तदनरूप कर्तव्यार्थ संपादणे तो संपादिला जाईल कदाचित नकारपूर्वक आदिकरून दीर्घ दृष्टी न देता अल्पबुधीस प्रवर्तून राव गेले अतःपर कार्ये राहिलें म्हणून आम्हासी विरुध वर्ततील तर काये मुजाइका आहे लक्ष । फौज व उमदे उमदे सरदार आमच्या पदरी आहेत नकारपूर्वकस मुळीच ठिकाणी लावावयास अतर होणार नाही याही गोष्टीने सार्वभोमाचे व सवाईचे मनोभीष्ट सिधीस पाऊन कोते अदेश कितेक संकल्पविकल्प चितांत आणितील तैसे सवाईजीच्या चितांत येणेच नाही सवाईजी आम्हाप्रमाणें जाणतच आहेत राव होते तेव्हा ते काये करीत होते करणार सरदार व इत्यादीक सामादीक व आम्ही आहों तेच आहों तुम्हांस सर्वविसी कुळीप आहे आधी तो आमच्या करतृत्वास ते बरे वाकीफ आहेत येद्यपि काही गोष्ट त्याच्या चितात नयेसी जाहाली तरी तिचा शेहनिशह करून त्याच्या प्रत्ययास येईसे करून ते सार्वभोमाचा निशा करीत ते करणें सर्वा हिंदूस महदाश्रये रावच होतें रायासरिखा सामानपूर सर्व गोष्टीने संपूर्ण दक्षणेस या हिंदुस्थानात दुसरा कोणी नव्हता असों राव काये घेऊन गेले रायानी सर्व ठेविले आहे पहिल्यापासून आम्ही व वरकड रायांच्या पदरी होतो ते आहो रायानी येश कीर्ति जोडिली तिची अभिवृधी करावी हेच मानस आहे श्रीकृपे सर्वही रायाच्या

तपोबळपुण्यकरून घडेल आम्ही आपले सामानफौजेनसी जे सार्वभोमांसी वे- चेरुितयार वर्ततात त्याचे पारपत्य करावयास कुवत धरीत आहों तेथे सवाई व राणाजी व अभेसिग यांचा आमचा येक विचार असता जे जे मनावर धरून ते न घडेसे काये आहे सारांश राव असता होते तेच हाली आहे अंतर तिलतुल्य नाहीं म्हणावयास अंतर ये [ व* ] ढेच की राव पर्जन्यकाली मालवियांत राहून मनसुबा करिते तोडास गेले होते ते गोष्टी मागे येऊन तोच मनसुबा दुसरा जाहालियावर होणार इतकेच अंनर आहे वरकड काही नून्य नाही तुम्हीं सवाईजीचा निशा करून त्याजकडून पातशाहाचा निशा करून या वोढीच्या समयांत द्रव्य येऊन पुढें उमदा मनसुबा आम्हा- पासून घडून ये ते त्याणी करावेंच करावे व तुम्ही करवणे जाणिजे छ १८ रालोवल [ नि.* ] बहुत कांये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. १६ } श्री { श. १६६२ ज्येष्ठ वद्य ४
सु. ११४१ रवल १८ } { इ. १७४० जून २

पुा राजश्री माहादेवभट हिंगणे गोसावी यासि

सुा इहिदे आर्बैन मया अलफ नादरशाह लटीच्या मुलकात येऊन जमीदारासीं युध्द- प्रसंग करून जमीदारास कैद केले आण खंडणी दोन क्रोड रुपये घतले व गुन्हेगारी पावणे दोन क्रोड येकून पावणे च्यार क्रोड रुपये घेऊन च्यार डेरे चहू बाजूस कंदार व तुराण व इरान व रजपूत या प्रकारे चहूं रोंखे डेरे दिलियाचा अर्थ लिहिला तो विदित जाहाला पुढे नादरशा कोणे रोखे जाणार मनसुबा काये हें सविस्तर वृत्त लेहून पाठवणें [ नि.* ] जाणिजे छ १८ रालोवल [ नि.* ] बहुत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. १७ } { श. १६६२ आषाढ शुद्ध ३
सु. ११४१ रबर २ } { इ. १७४० जून १६

……… सांवी यासि

सेवक चिमणाजी बलाल नमस्कार सुा इहिदे आर्बैन मया अलफ तुम्ही पत्र छ २९ सफराचे पाठविले ते छ २७ रविलोवली प्रविष्ट जाहालें आम्ही सवाई जयपुरास येऊन राजश्री सवाईजीची भेटी घेऊन याची पत्रें- पातशाहास पाठविली तेथून श्रीमंतांस पाच लक्ष रुपये खर्चास पातशाहानी यावे हा निश्चये करून घेतला होता विस्तारे पत्र श्रीमंतास लिहिले होते आपणांस पावले असेल आठी दिवसात पाच लक्ष रुपये यावे आणि श्रीमंत उजेनीस दाखल जाहालि- यावर त्यास पावते करावें त्याउपरी दाहा लक्ष रुपये पर्जन्यकालात यावें तो छ १५

सफरी राजश्री सवाईजवल डाकेचे वर्तमान विपरीत साडे सा द्विसाचे आले ईश्वरे अनुचित केले यांचा विस्तार पत्री काये त्याहावा इछेस उपाय नाहीं हे वर्तमान सवाईजीनी आइकून बहूत दुखी जाहालें वारंवार स्वासोस्वास टाकून आपली बाजी खचली या वर्तमानाची पत्रे दिलीस पाठविली होती त्याची उतरे छ २८ सफरी आली तेही आम्हास वाचून दाखविली अमित्रास संतोष जाहाला म्हणाले श्रमी फार जाहाले फिसाद करावा हे इछा नकारपूर्वकाची आहे विचार करितात अत:पर सल्हा हेच आहे कीं मालवियांत फौज पोख्ती ठेवावी म्हणजे खर्चासहीं पातशाहापासून घेऊन पाठवून व पुढेही उमदी कामे कर्तव्य ते करून यास्तव फौज खामखा ठेवावीच ठेवावी हा हेत सवाईजीचा आहे व विचारेकरून सल्हा हेच आहे म्हणून तपसिलें लिहिले ते कलले ऐसियास तीर्थरूप कैलासवासी राव यानी पाया घातला होता तो सर्वांच्या बऱ्याचाच घातला होता करून दाखवावे हे ईश्वरे सामर्थ त्यास दिल्हे होतें व करितेच ज्यामध्ये पातशाही बंदोबस्त होऊन येई व धर्म- स्थापना होये तेच करिते व पातशाहाही त्याचे मनोदयानरूप गोरे करिते परंतु ईश्वरे त्यास दिवस थोडे केले त्यास उपाये काये ईश्वरी तत्र प्रमाण म्हणावें राव निधन पावलियांनीं सवाईजीस विशेष दुख जाहाले म्हणो तर सवाईजीचा आमचा वेव्हार कैसा आहे तो तुम्ही जाणतच आहा ते केवल इष्टच नव्हेत त्याचा आमचा भाऊपणा आहे त्यास सर्वापेक्षा श्रम अधिक जाहाले असतील यात संदेह काये येरवी राव सर्वा जनाचे मनोरंजक व सर्व हिंदूंस आश्रये होते ते दिव्यगत जाहालियानी अबाल वृधांचे चित विक्षेपास पावले असो त्याचा अवतारच तेवढा होता परंतु त्यास कैलास- वास जाहालियाचा संतोष अमित्रानी चितांत आणून फिसाद करावयाचे चितांत आणिले म्हणोन तर या गोष्टीचे संकट काये आहे राव मात्र गेले परंतु सर्व अर्कान दौलत व सरदार फौज कुल आहे ते आहेच व रायाचा आर्सीर्वाद आमच्या व चिरंजीव राजश्री नानाच्या पदरी आहे तरी जे जे या गोष्टीस अर्तभूत जाहाले असतील त्याची इछा पूर्ण करावयांस किमपि अंतर होणार नाही जे आमचे अमित्र तेच सवाईजीचे अमित्र सवाईजीस अगत्य तेच आम्हांस अगत्य अन्यथा दुसरा विचारच नाहीं यापूर्वीही ज्या ज्याणी विकृत चितात आणून कलहास्पद केले त्याचे मनोभीष्ट रायानी सिधीस पाविलेच किंवहुना त्यात काही नुन्य जाहाले असेल म्हणोन त्यास फिसाद करावयाची बुध ईश्वर देईल त्याचा हेत आम्ही व नाना पूर्ण करावयास चुकणार नाहीं वरकड मालवियांत फौज ठेवावयाचे लिहिले तर येदा मालवियात आम्हांस ठेवावीच लागते तुमच्या पत्रापूर्वीच राजश्री विठोजी बुले फौजेंनसी ते प्राते ठेविले व राजश्री पिलाजी जाधवराव यांस फौज ठेवावयाविशी लिहिले आहे ते ठेवितील राजश्री राणोजी सिंदे व मल्हारजी होलकर यांस लिहिले आहे ते उभयेतातून येक जण खासाच राहातील दाहापंधरा हजार फौज त्या प्रांते राहलि हाली फौजेने देशी यावे यैसे दिवस राहिले

नाहीं बहुधा तों सारीच फौज राहील कदाचित आलेच तरी लिहिलेप्रो पधरा हजार राहातीलच राहातील त्याचे खर्चाची बेगमी सवाईजीनी चितात आणून पाच लक्ष रुा पातशाहापासून घेऊन पाठवितीलच राहिले दाहा लक्ष तेही पर्जन्य कालातच घेऊन त्याणी पाठवावे म्हणजे फौजेची बेगमी पोख्ती होईल व इकडीलही फौजेची समजावीस करून खासाच त्या प्राते फौजेनसी येऊन ज्या ज्या गोष्टी कर्तव्य त्या सवाईजीच्या आमच्या विचारें केल्या जातील मुख्य गोष्ट कितेक कर्तव्यपदार्थ व पातशाहाची भेटी होणे ह्या गोष्टी रायांनी चितात आणिल्या होत्या त्या राहिल्या आहेत त्या देव आमच्या हातून अगर नानाच्या हातून रायाचे पुण्यकरून घडतीलच घडतील संदेह नाही रायाचा हेत बाकी राहील हे होणे नाहीं सवाईजी पहिल्यापासून या कार्याचे बाजीकार आहेत व आमचे कार्य ज्या ज्या तरेने करून घेणे ते ते घेतीलच आम्ही सर्वप्रकारे सवाईजीचा भरोसा मानितों व बंधुपणास उपयुक्त व लोकीक पदार्थ बधुपणाची अभिवृधी होये तेच ते करितील बिकानेरकराचे साह्य सर्वप्रकारे करावे हे सवाईजसि अगत्य आहे याच अन्वये अगोधर अभेसिगजीस सागणे ते सागितले त्याणीं कबूल केले आणि बिकानेरकरावर कबरबंदी करून गेले शहर लुटले किल्यास माहासरा केला आहे हे विशम सवाईजीस होऊन फौजबंदी करून राणाजी व सवाईजी बिकानेरच्या साह्यास जाणार म्हणून लिहिले ते कललें [नि.*] जाणिजे छ २ रबिलाखर [लं.*] लेखन । सीमा

---

ले. १८ श्रावण शुद्ध १ } श्री { श. १६६२ श्रावण शुद्ध १ इ. १७४० जुलै १३

वेदशास्त्रसंपन राजश्री माहदेवभटजी स्वामि गोसांवी यासी

ई अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्ये [ मो. जा.* ] स्नो राणोजी सिंदे दंडवत विनंती उपर येथील कुशल ताा श्रावण शुध १ मुा श्रीगोदे जाणोन स्वकीये लेखन करणे यानंतर तुम्हीं पत्र पा ते पावोन लेखनार्थ अवगत जाले श्रीमंताचे वर्तमान विस्कलीत यैकोन दिलीमध्ये सर्वास हर्ष निर्माण होऊन मालवे प्रांते अजमुलाखान येतात म्हणौन कितेक विशदे लिा ते सविस्तर कलो आले तर पूर्वीही सेवक लोकच सेवा करून अमित्रास पराभव पावीत होते अताही चिंता करावीसी नाही ईश्वर कृपावंतच आहे जे येतील ते सुख पावतील इकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्री नानास वस्त्रे होऊन पूर्ववत्प्रा माहराजाही गौरव केला त्याचे पदरी पुण्य समर्थ आहे शत्रूस विशापात्कारेच नतीजा होईल चिता केली न पाहिजे [ नि.*] बिशप काये लिहिणें लोभ असों दीजे हे विनती [ वा*. ] मोर्त । व सुद

[ पाठीवर डाव्या बाजूस बदामी शिक्यांत* ] श्रीजोति । स्वरुपचरणि त । त्पर जनकोजि सु । त राणोजि सींदे । नीरतर

---

ले. १९
सु. ११४१ जिल्काद १९ }    श्री    { श. १६६२ माघ वद्य ६
{ इ. १७४१ जानेवारी २६

पुा राजश्री माहादेवभट हिंगणे गोसांवी यांसि

सुा इहिदे आर्बैन मया व अलफ नवाब आसफज्या याणी राजश्री बाबूराव मल्हार याजसमागमे मजकूर सागून पाठविला कीं दिलीस असतां पातशाही बदोबस्ताची कामे चितांत होती तो मजकूर तुम्हाजवळ सांगून राजश्री बाजीराऊ यास लेहविला होता व पातशाहीचा बंदोबस्त व्हावा हे गोष्ट ते च्याहात असता त्याजला दिवस थोडे जाहाले आपणासही दक्षणच्या बंदोबस्ताकरिता निघून येणे लागेले त्यास तुमचे रिफाकतीने घरकलह तुटला ओघ्याच गोष्टी दस्तात आल्या जत्फरल्क आहे तेथे इकडील बंदोबस्ताचे संकट नाहीं आता वृधापकाल येक वेल पुन्हा दिलीस जाऊन पातशाहीचा बंदोबस्त करून दाखवावा पुढे भवितव्य असेल तसे असो तुम्ही कर्जदार त्याचा परिहार जाहाला पाहिजे व नादरशाईच्या प्रसंगामुळे पातशाही खजाना [ ना* ]मामूर होऊन बंदोबस्त तुटला आहे तोही येथास्थीत जाहाला पाहिजे हे मानस माझे आहे बंदोबस्त कोण तो कैसा म्ह[ ण* ] तील तरी रजपूत राजे तमाम पातशाही मुलूख खाऊन जागा जागा खजानपूर होऊन बसले आहेत पातशाहीवर नादरशाहाचे कालचक्र आले त्या वख्ती पातशास मोठा भरोसा राखत होते की या वेळेस रजपुताच्या फौजा मातबर येऊन पोहचतील तरवारेची त्याच्या सिफारस बहूत आइकतो या वेळेस आपले दृष्टीने तमासा पाहीन या प्रकारचा भरोसा मानून पत्रे यावयाविसीं पाठविली परतु कोण्हींच नाहीं आले तरतें बुडतें पाहिले जे आम्हीं होतों ते गलों युध्याचा प्रसंग खानदौरा व सादतखान याणी बिघाडिला असो तो प्रसग तैसा जाहाला आतां रजपुताचे वैश्यम पातशाहाच्या मनात फार आहे व मजलाही लाजीम आहे की येक वेळ त्याजपासून द्रव्य घेऊन पातशाही मुलाजमतीस न्यावे यैसे आहे या गोष्टीस तुम्ही व मी येक असिल्यास अगाध नाहीं पातशाही काम करून तुम्हांस कर्जानिराळे करीन पातशाहा पधरा लक्ष खजानियातून द्यावयास केले आहेत ते व त्याखेरीज आणखी पाच लक्ष येकून वीस लक्ष आणवीन व माळवा दरोबस्त तुम्हास दिल्हा आहे त्याची व चमल आलीकडील मुलूक आगऱ्याच्या ताळुकियाचा आहे तो तुम्हास सुपुर्द म्हणून सनद पातशाही आणून देईन माझे चालणे जाहालिया मजसमागमे चालावे अगर या प्रांते मजला च्यार दिवस लागत असल्यास दिलीत पातशाहाजवळ नवाब गा[जु* ]दीखान फोरोजजग व नवाब कमरुदीखान वजीर येक्या

विचारे आहेत त्यास लिहून त्याची तुमची भेट करून हजरत पातशाहाची भेट करीन तुम्ही आम्ही येक जाहालियावरी दुसरा थोर कोण आहे पातशाहाच्या खातरख्वा बंदोबस्त करून आणखी तुमचे मनोभीष्ट सिधीस नेऊ कोणते म्हणाल तरी वाराणसीप्रयाग हिंदूची जागा आहे त्यास प्रयागचा कर माफ करऊन वाराणसी जागीर करून देईन दोन च्यार जागा मातबर पैका घ्यावयाच्या आहेत तेथून घेऊन तुमचे कर्ज फारी [क*] करीन पातशाहास पैका देईन त्याखेरीज तुम्हास खरळखोंचर पाहावयास बहूत जागे आहेत म्हणून कितेक मायामोहोच्या गोष्टी सांगून पाठविल्या याचा खुलासा पाहातां दक्षणेत फौज आमची व हिंदुस्थानांत सवाई दोन्ही सबळ पक्ष येकत्र असिल्यास दुसऱ्याची आढ्यता चालत नाहीं प्रस्तुत काळीं न घडती गोष्ट भेटीचा योग घडला या समयात मायामोहो घालून पातशाहापासून कार्यभाग होणे ते आपले जिमेस लाऊन घ्यावे आणि करून घेऊन आपलीच मातबरी पाडावी म्हणजे सहजेच पातशाही बंदोबस्ताच्या गोष्टी घडून जे च्याहातील ते होणार येसियास आम्हास सर्व-प्रकारे वडील सवाईजी मातुश्री [मो. जा.*] बाई माहायात्रेस जाते समई आपल्या स्थलास घेऊंन जाऊन अतीत्य निःसीम संपादिले पुत्र म्हणऊन समागमे फौज देऊन माहाप्रतापे सिधीस पावविली मातुश्री [मो. जा.*]नी पुत्राधिक्यता चितात आणिली तन्मुळे राजराजेंद्र व उभयेता तीर्थरूप कैलासवासी बंधुत्वे चालले त्याच अन्वये राजराजेंद्र याची माया आमचे ठाई असेलच जी जी कार्ये आसफज्या करून देऊ बालले ती राजश्री सवाईजी याजपासून नव्हेत सारिखी होतील तेव्हा दुसरियाची आशा चितांत आणावी तरी तीर्थरूपाचा व सवाईजीचा बधुपण जाहाल्यादारभ्य कितेक कार्ये जाहालीं राहिली ती करून देतील यांत संदेह नाहीं प्रयागवाराणसी हीं व आणखी कितेक माहाक्षेत्रे येवनापासून...[ मुक्त होऊन गोव ]ध मना व्हावा हे इत्सा पहिल्यापासून राजराजेंद्र याची व कैलासवासी या [चीं*] होती ते घडावी हेच मानस आमचे त्यास सवाईजी आम्हीं येकाचित असिल्यास नव्हेसे काये आहे आस-फज्या करून देतील त्यापेक्षा अधिकोतर करून द्यावयास श्री [ मो. जा.* ]ने राज-राजेंद्र यास सामर्थ दिल्हे आहे व आमचे पदरी वडिलाचे पुण्य कार्य करून घ्यावयास समर्थ आहे तेथे इतर प्रसंग चितात आणून काये असों तेही कार्यकर्ते ममता-युक्त बोलत असता आपण नाही म्हणून त्याचीं तूप( ? ) काये निमित्य मोडावी परंतु आम्हास भरोसा राजेराजेंद्र याचाच आहे व उभयेता कैलासवासीमागे कर्जवामाचे व फौजेच्या संरक्षाणचे प्रसंग संकटावह प्राप्त जाहाले आहेत ते परिहार करावयास राज-राजेंद्र याजपेक्षा सामर्थवान् कोण आहे प्रस्तुत हिवरचारीने नेमाड प्रातें आलो अतःपर कुल फौजेनसीं मजल दरमजल चोडसेदलिया या प्रांते येत परंतु येदा कर्जाचा प्रसंग आहे तो तुम्हीं जाणतच आहा येक तो कर्ज भारी दुसरे उभ[ य* ]ता तीर्थरूपी कैलासवास संपादिला याजमुळे ओघ्याच गोष्टी संकटावह आहेत तथापि

दोन गोष्टी वडिली समर्थ संपादिल्या आहेत कोणत्या म्हणाल तरी सवाईजीचा भाऊपणा व फौज भा..........ठेऊन गेले आहेत याजमुले कर्जाची कालजी वाहा[ वी ]सी नाहीं जी जी कामे वडिली इछिली होती ती करून देतील व पातसाहजीनी पधरा लक्ष कबूल केले आहेत ते खजानियातून आणून देतील यात संशये नाहीच परंतु खजानियातील रुपया निघतां दिवसगत लागेल आम्हास तों मागें गडकोटकिल्याची बेगमी व दिवाण देणे व लस्करच्या लोकाचे वेगमाची निकड प्रस्तुत फारच लागली आहे या प्रसंगी सवाईजीनी आपणांपासूनच आमचे साहित्य करावें आणि पातशाही सरकारचा पैका येईल तो मुबादला घ्यावा म्हणजे आमची मोठी बोढ वारतें वडिली भावपणा जोडिला तो समई कामास आला यैसें जगप्रसिध होते तरी तुम्हीं सर्व अर्थ राजराजेंद्र यास समजाऊन सांगून सध्या द्रव्याची साह्यता होऊन येई तें करणें तीर्थरूपाची व सवाईजीची भेट होती आमचाही हेत भेटीचा आहे व त्याची आमची भेट जाहालियास कामेंही बहूत आहेत त्यास आम्ही बोडसेदातियांकडून कोट्याकडे ये तों सवाईजीनी त्याच सुमारें येऊन भेटीचा योग घडे तें करावें येविसीचाही सिधांत करून लिहून पाठविणें द्रव्याचा अर्थ लिहिला आहे त्यास सवाईजी साक्षेप केल्यास पातशाहापासून द्रव्य निघाव[यास वेळ ] नाही कैसे म्हणजेल तरी त्या स्थळीं हरयेक कार्यास विक्षेप घालावयास आसफज्या होते ते दक्षणेस आले अतःपर तेथे विक्षेप घालीसा कोण आहे ओघा जंगजोड सवाईजीचाच आहे त्याणी लिहून द्रव्य आणवावे त्याच्या लिहिल्याने येईलच येईल यावयास कांहीं विलब तो लागतच आहे ते येई तो सवाईजीनी अगोधर आपणांपासून साहित्य करावे उभयेता मागे त्याचे ठाईच आम्हांस सवाईजी असता साहित्य न करीत तरी स्वर्गी वडील वडिलाचे आर्श्वीर्य मानतील जाणिजे छ १९ जिलकाद [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ लं.* ] लेखन । सीमा

---

लें. २०<br>सु. ११४१ जिल्काद २०. } श्री { श. १६६२ माघ वद्य ७<br>इ. १७४१ जानेवारी २७

अखंडीतलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री माहादेवभट हिंगणे गोसांवी यांसि

सेवक बालाजी बाजीराऊ प्रधान नमस्कार सुा इहिदे औबैन मया व अलफ तुम्हीं धारेहून पुढे गेल्याचे वर्तमान विदीत जाहालें पुढे मजल दरमजल जाऊन सवाईजीची भेट घेतलीच असाल येथील वर्तमान तरी नवाब आसफज्याचा व नवाब नासरजंग या पित्यापुत्राचा कलह निर्माण जाहाला होता नासरजग कुल फौजेनसी येऊन अजनठियास मुकाम का केला आसफज्या बऱ्हानपुरी नवनिगादास्त करीत होते हे वर्तमान तुम्हांस कललेच होंते त्यास साहित्याविसीं ... पै... पाले

बळाबळ पाहून साहित्य करावे या विचारे कासारबारीने वरणगाव जामनेरावरी आलो फौजाही तमाम जमा जाहाल्या जिकडे हे फौज तिकडे जये यैसा अर्थ उभयेता येवनानी चितांत आणून रिफाकतीचा साक्षेप केला राजश्री बाबूराऊ आसफज्याकडे गेले होते त्याजवळ त्याणी बजीदीच्या गोष्टी बहूतच सांगितल्या नासरजंग याजजवल जमियेत फार आपणाजवल थोडी आबरू राहाणे संकट संपादिले येश जाऊन जीवित्वास मुकामे( वे ) यापेक्षा बजीदी करून रिफाकत करून घ्यावी हे उत्तम यैसे चितांत आणून फारच बजीद जाहालें नासरजंग तारुण्य फौज तोफा व रिसाला बहूत याजमुळे गुमराई वसत होती त्यास त्याचे साहित्य करावे तरी येश पावल्यास आपलाच पराक्रम ध्यानात आणितील आणि लौकिकातही यैसे दिसेल कीं नासरजंग जबरदस्त यास्तव त्याजकडे जाहाले आमची प्रथम स्वारी ज्याचा जोर थोडा त्याचे साहित्य केल्याविना नक्ष वाढत नाहीं हा विचार चितांत आणिला व असफज्याची बजीदी पाहून रिफाकत करावी हेच गोष्ट निश्चयांत आणिली नासरजंग याजकडील भले माणूस आले होते व हिमतयारखान व रा जानोजी निंबालकर येत होते त्यास मना करून येदलाबादेवरी आलों आसफज्याकडून सैद लस्करखान व बाबूराव येऊन भेटले हे वर्तमान नासरजंग याणी आइकताच गात्रे सिथल जाहाली आधीच आसफज्या युक्तिवान् त्यास हे मातबर फौज सामील जाहाली अतःपर आपला नाश व दौलतीची हान करावी उत्तम नाहीं यैसे चितांत आणून दौलतीचा त्याग केला फकीरी अवलंबून रोज्यास गेले त्याचे हमरंगति अबदुल अजीजखान व हिमतयारखान व सैद जमालखान व जानोजी निंबालकर व फतेयाबखान होते तितके त्या समागमे फकीरीच्याच विचारें गेले राजश्री सुलतानजी निंबालकर वगैरे सरदार अजनठियासच राहिले नासरजंग याचा आयुर्भावाचा विध्वंस जाहाला तेन्हा आसफज्या बऱ्हानपुरीहून कूच करून येदलाबादेवरी आले भेटीचा साक्षेप केला नवाब नसीरुतदौला यास आमच्या डेरियास पाठविले आणि घेऊन गेले अतिसन्माने डेऱ्यापुढे उभे राहून भेटी जाहाल्या समागमे पचतीस आसामी सरदार होते त्यासही आलिंगनयुक्त भेटले कैलासवासी [ मो. ज़ा.* ] राऊ याच्या भेटी पूर्वी जाहाल्या त्यापेक्षा समारंभ विशेषात्कारें संपादिला नासरजंग याणी जागीरा दिल्ह्या त्या बाहाल करून वरकडही कितेक मुदेमजकूर चितानरूप मान्य केले सध्या करून द्यावयाचे ते दिल्हे पुढे करू[न*] द्यावयाचे त्याची निशा केली साराश आ[स* ]फज्या बुधिवान आपल्या बुधिवैभवानसारच आदर मान केला हती घोडे जवाहीर वस्त्रें विहीत प्रसंगानरूप देऊन निरोप दिल्हा आपण औरंगाबादेस जाणार आम्हीं कूच [करून*] येदलाबादेहून जलगावाकडे आलो मजल दरमजल ल हिवरबारीने हिंदुस्थानास येतों हे वर्तमान तुम्हास कलावे यास्तव लिहिले आहे वरकड कितेक मजकूर अलाहिदा पुरवणीत लिहिला आहे त्यावरून कळेल मुख्य

गोष्ट आम्हास सर्व प्रकारे भरोसा राजराजेंद्र याचा आहे जाणिजे छ २० जिलकाद [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ लं.* ] लेखन । सीमा

---

ले. २१
सु. ११४१ जिल्काद २०

श्री

श. १६६२ माघ वद्य ७
इ. १७४१ जानेवारी २७

पुा राजश्री माहादेवभट हिंगणे गोसांवी यांसि

सुा इहिदे अर्बैन मया व अलफ आटेरच्या राज्यावरी हिमतसिंग याची स्थापना करावयाचा विचार राजश्री सवाईजी याणी चितांत आणिल्याचे वर्तमान रा वेंकाजीराम याणी तीर्थरूप कैलासवासी राऊ यास लिहिले तेव्हा तीर्थरूप लिहून पाठविले की चंमल आलीकडील येख्तियार आमचा आहे येका स्थापन अगर उथापन करणे ते आम्हीं करूं हा मजकूर वेंकाजीराम यांणी राजराजेंद्र यास सांगितला त्यावरी ते बालले की ते राज्य व हिमतसिंग रायाखेरीज नाही ज्या गोष्टीत राव रजाबद असतील तेच गोष्ट अमलात येईल यैसे म्हणून हिंमतासिंगास राज्यावरी बसविले त्यास निमे राज्य व आटेर भेड या दोही स्थलातून येक स्थळ घ्यावे हा खुलासा कैलासवासी [ मो. जा.* ] राऊ याचा होता तुम्हींही जाणतच आहा त्यास राव कैलासवासी जाहालियावरी राजश्री [ मो. जा.*] राजराजेंद्र याणी येक लक्ष रुपयाचे जागीरीचा मजकूर तीर्थस्वरूप कैलासवासी [ मो. जा.* ] आपा यास सांगून पाठविला होता व हिमतसिंगही देत होते परंतु वीस पंचवीस [स*] लक्षाचा मुलूक त्यांत लक्ष रुपयाचाच घेऊन काये करावें आपल्या चितानरूप कार्य होऊन हिमतसिंगाचे स्थापन राज्यावरी असावें राजराजेंद्र याणी केले कार्य प्रतिपादावे या विचारांत असतां अजीमुलाखान आले त्याणी हिमतसिंग यास राज्यावरून उठवून रायेसिग यास बसवि... यास पुन्हा हिमतसिंगाची स्थापन राज्यावरी व्हावी हे मानस राजराजेंद्र याचे आहे येथील विचार तरी माळवा प्रांत होलकर सिंदे पवार यांस वाटून दिल्हा च्यार समाईक माहाल होते ते सरकारच्या खाजगी खर्चास ठेविले वरकड सरदार पदरी मातबर त्यास सरजाम वाटून द्यावयास थोर राज्य भदावरचे व गैरी आहेत प्रस्तुत स्वारीही त्या प्रांतेच आहे लोकास मुलूक वाटून द्यावा लागेल त्यास राजराजेंद्र याचा आमचा स्नेह यास्तव त्याचाही विचार येविसीचा काये आहे तो कळून बंदोबस्त करावा लागतो याजकरितां तुम्हास लिहिले आहे तुम्ही येविसीचा खुलासा राजराजेंद्र याचा मनास आणून लिहून पाठवणें तदनुरूप कर्तव्य तें केलें जाईल सरदारास मुलूख वाटून दिल्हियावरी अमल बसावावयास संकट नाहीं मेहनत करून अमल बैसवितील परंतु राजश्री सवाईजी याचा आमचा स्नेह जे करणें तें त्याच्या विचारे करावे त्यास तुम्ही तजविजेने सवाईजीस सांगून निमे राज्य व आटेर आमचे वाटियात येई निमे

हिमतसिंगाकडे राहे ऐसा विचार करून वर्तमान लिहून पाठवणें [ नि.* ] छ २० जिलकाद बहूत काये लिहिणे [ लं.* ] लेखन । सीमा

---

ले. २२
सु. ११४१ जिल्काद २०

श्री

श. १६६२ माघ वद्य ७
इ. १७४१ जानेवारी २७

पुा राजश्री महादेवभट हिंगणे गोसांवी यांसि

सुा इहिदे ओर्बैन मया व अलफ रामपुरा व बुंदी वगैरे तालुकियाची बाकी सालगुदस्ताची राहिली आहे त्याचा व साल मजकूरचा निर्वाह होणें त्याचा विचार काये आहे तो मनास आणून लिहून पाठवणे व त्या प्रांतीच्या वगैरे जागाच्या अमलाचे वर्तमान लिहून [ पा ] ठवणें [ नि.* ] छ २० जिलकाद [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ वा.* ] लेखन । सीमा

---

ले. २३
सु. [११४]१ जिल्हेज २०

श्री

श. १६६२ फाल्गुन वद्य ७
इ. १७४१ फेब्रुवारी २६

पुा राजश्री माहादेवभट हिंगणे गोसांवी यासि

सुा इहिदे..............नवाब निजामनमुल्क याची.........णी उतर प्रांतीच्या कार्यभागास [उ]चितपूर्वक उमेदवार केलें त्याचा विस्तार तुम्हांस पहिला लिहून पाठविलाच आहे तीं पत्रे पाऊन तुम्हास सकल अभिप्राये कळलाच असेल बमय किलेजात दरोबस्त माळवियाची सनद व चमल आलाकडील तालुका व राजे ताबिनांत ऐसी सनद आणून देतों पधरा लक्ष रुपये पातशाही खजानियातून घावयाचा करार त्यास पाच लक्ष जाजती येकून वीस लक्ष देववितों मातबर स्थळे पैका घ्यावयाची आहेत तेथील पैका घेऊन काही पातशाहास देऊन काहीं तुम्हीं आम्हीं घेऊन कर्ज तुमचे फारीक करीन प्रयागचा कर माफ होऊन श्री [ मो. जा.* ] वाराणसी क्षेत्र आपणाकडे करून घ्यावे हे मानस तुमचे आहे तेंही करीत तुम्ही आपले मायेत असावे तुम्ही मी येक असिल्यास बहूत कामे होतील ऐसा करार केला आहे परतु पहिल्यापासून आम्हाकडील माध्यस्तीत राजराजेद्र आहेत आणि इतकीही कार्य आमची करून घ्यावयास श्री [मो. जा.*]ने त्यास सामर्थ्य दिल्हे आहे वडील उभयेता कैलासवासी जाहाले त्या माघारी आमची कार्ये करून देऊन पहिल्यापेक्षा स्नेह विशेष चालवावा हा अगत्य धरितात ऐसा अर्थ तुमच्या लिहिल्यावरून दिसून आला आहे त्यास आमचा खर्चवेच फौजेचा व गडकोटकिल्याचा व दिवाणदेणियाचा काये काये आहे व कर्ज कितेक जाहाले आहे हे तुम्हांस ठावकेच आहे तुम्ही राजराजेद्र यासही सांगितलेच असेल मुख्य गोष्ट पातशापासून द्रव्य येणें ते आल्यास काहीं थोप राहून मोठे उपयोगास

येते त्यास ये प्रसंगी राजराजेंद्र यांणी येत्न करून निजामनमुल्क यांणी याच केल्याप्रमाणे द्रव्य खजानियातून येईसें करावें कदाचित तेथील गोष्ट ओकाशावरी दिसून आल्यास आपणापासून द्रव्याची साह्यता करून खजानियातील द्रव्य निघेल ते मुचादलिचास घ्यावें म्हणजे मोठी थोप राखिलीसारिखी होईल उभयेता वडील असतां साहित्य केले ते गोष्ट थोडकी आहे परंतु या समई साहित्य केल्यास सवाईजीचा लौकीक उतम व आम्हीही त्याच्याच उपयोगास येऊ वडिलाचा व त्याचा श्नेह चालत आला आहे त्यापेक्षा अधिकोतर चालून पातशाही बंदोबस्त ज्याहातील तो होईल परकड आम्हास कर्जपरिहार करणे व फौजेचा खर्च चालवणे यापेक्षा दुसरा निजध्यास नाहीं निकडून साहित्य होऊन आल्यास उतम जाहाले न होवेच तेव्हा कर्जपरिहाराचा विचार कोठे काही पाहावाच लागेल इतके काये निमित्य लिहिले म्हणाल तरी सवाईजी आम्हांस वडील आणि पातशाहाजवळ मातबरीची व जामिनीची निशा त्याणी आमचे विसीची त्याणीं केली आहे यास्तव पहिले व आतां सूचनार्थ लिहिले आहे तुम्ही कार्यकर्ते आहा ज्या तऱ्हेने सवाईजीस सांगणे तेसें सांगून लिहिल्याप्रो कार्य होऊन येई ते करणे [नि.*] जाणिजे छ.२० जिल्हेज बहूत काये लिहिणे [ या.*] लेखन । सीमा

---

| | | |
|---|---|---|
| ले. २४<br>सु. ११४०(१) जिल्हेज २० | श्री | श. १६६२ फाल्गुन वद्य ७<br>इ. १७४१ फेब्रुवारी २६ |

राजश्री मल्हारजी होलकर गोसांवी यांसि

दं अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य[ मो. जा.* ] श्नो बालाजी बाजीराऊ प्रधान आसीर्वाद सुरु सन [ इहिदे* ] आर्बैन मया व अलफ प्रस्तुत तुम्हीं रामपुरियासी बिघाड करून मुकाम त्याच परगणियात केला यावरून राजश्री सवाईजी बहूत श्रमी जाहाले आहेत येसियास तीर्थरूप कैलासवासी याचा व सवाईजीचा श्नेह चालत आला त्याच अन्वये आम्हांसही त्यासी श्नेह रक्षणेच लागतो सार्वभौमाच्या व आमच्या राजकारणांत मध्यत सवाईजी आहेत ते दिलगीर जाहाल्यास कितेक कार्यांत विक्षेपें पडणार हा अर्थ तुम्हास न कलेसा काये आहे साप्रत आम्हीं हिंदुस्थानास येत आहो सवाईजीची भेट होऊन कितेक कार्यें होणार या विचारास्तव रामपुरियास उपसर्ग न लागावा विहीत असे तरी तुम्हीं या प्रसगी रामपुरियास उपसर्ग न लावणे तुमची आमची भेट लौकरीच होईल भेटीनंतर रामपुरियाचा विचार कर्तव्य तो केला जाईल [ नि.* ] जाणिजे छ २० जिल्हेज बहूत काये लिहिणे [ लं.*] लेखन । सीमा

[ पाठीवर डावे बाजूस याबापेचा ले. ९ प्रो शिक्का * ]

---

ले. २५
चैत्र वद्य ८ शनि.

श्री

शा. १६६४ चैत्र वद्य ८
इ. १७४२ एप्रिल १७

श्रियासह चिरंजीव दामोदरास व पुरुषोतमास व दिवाकरास प्रती माहादेवभट हिंगणे आसीरवद उपरी येथील कुशल चैत्र वदी ८ शणवार मुा लस्कर रा राणोजी सिंदे व मल्हारजी होलकर नजीक [ मो. जा.* ] जाणौन स्वक्षेम लिहिणे विशेष बहूत दिवस जाले काही गावाकडील व्रत कलत नाही याकरिता चिंता वाटते तर आलिया मनुशाबाार साकल्ये वर्तमान घरचे व गांवचे लिहिणे आपण दोन तीन पत्रे तुम्हास पाठविली व मुजरद कासिदाची जोडी येक पाठविली त्यास अठरा दिवस जाले तेही पावलीच आसेल तुम्हाकडे यैवज आम्ही काही रा सेशाद्रिराम याजकडून देविला होता व उजेनीबाा हुडी येक पावणे दाहासे पाठविली यासिवये दाहा हजाराची हुडी नारो शंकर याचे जासुदासमागमे पाठविली व कासिदाची जोडी आली तिजबाार हुडी हजार पांच सदरहू यैवज तुम्हाकडे कोणता पावला न पावला हा तपसीलवर लिहून पाा भारी व्याजाचा यैवज देणे कुल फारक करणे व घराचे काम कोठपरियेत जाले उतरेची भित होऊन वरील खपरेल पके जाले कीं नाही जाले नसेल तर सत्वर करणे व तुम्ही लिहीत जाणे घोकीत जाणे आक्षेर उतम वलवणे चिरंजीव बापूचे वर्तमान राजश्री सवाईजीजवल आगरियास आहे कागदपत्र आखंड लस्करचे वर्तमान आम्हास लिहितो सुखरूप आहे चिंता न करणे आमचे वर्तमान राा मल्हारजी होलकर यानी रामपुऱ्यासी बिगाड केला याजनिमित्य सख्ये करायास आलो राा राजामलजीसही घेऊन आलो सर्व सरदारांच्या व मलजीच्या भेटी केल्या सखेत्वाचा विचार उतम प्र[का*] रे करून येका दो दिवसा सर्व सरदार सहवर्तमान व राा मलजीसही घेऊन श्रीमंताचे भेटीस जाऊ तुम्हास कलावे म्हणून लिहिले आसे पूर्वी कासिदाबाार पत्रे राा गणेशभट खरे व रामभट तलेगांवकर व हरबाजीपत भिडे व कासी नानाजी कंवठेकर यास लिहिली होती ते पाविलीच आसतील कासीपताचे रुाा च्यारसे वरात कोस्याचाा आपणाकडे आहेत मागतील तेव्हा त्यास देणे [ नि.* ] आम्ही श्रीमंत राजेश्री [ मो. जा.* ] पंतप्रधान याज

---

ले. २६
जवल २८

श्री

शा. १६६४ आषाढ वद्य ३०
इ. १७४२ जुलै २०

श्रियासह चिरंजीव राजश्री दामोदर माहादेव व पुरुषोतम व दिवाकर यांप्रति बापूजी माहादेव कृतानेक असीर्वाद उपरी येथील कुशल ताा छ २८ जामादिलवल मुाा पाटोदी दिलीहून वीस कोस आलीकडे जाणून स्वक्षेम लिहिणें विशेष बहूत दिवस पत्र येऊन वर्तमान कलत नाहीं याकरितां चित उद्विग्न आहे इनामी कासीद औरंगाबादेहून सह...येत असतां येकही पत्र न ये हा कोण विचार अम्ही जेपुरीहून

आज दोन महिने जाले मुजरत जोडी तुम्हाकडे पाठविली ते पावलीच असेल त्याचें उतर अद्यापि येन नाहीं अम्ही जेपुरीहून दिलीस गेलों होतों सार्वभोमानी हती घोडे वस्रे जवाहीर श्रीमंतास दि[ल्ही] व अम्हावर बहूत मेहेर्बान हो [ ऊन आम ] त्या नावें नव सदि वा न संबधी उ ... र पुरुषोत्तमाचे नावें आठ सदी दिवाकराचें नावें शत सदी त्रंबकपंत खलगावकराचें नावें च्यार सदी ..................या- ली आणि बहू[न सं ] तोषी होऊन श्रीमंताजवळ रवाना [ के ] लें आहा दिवसी जेपुरास पाऊ तेथून श्रीमंताकडे जाऊन येंदा श्रीमंता........णी सिरोंज प्रांतीच आहे या ... [ आ ] मचे येणे होणार नाहीं सार्वभौम...इंद्रप्रस्थीं सुखरूप आहेत सार्वभोमाची रुपा बहूत आहे सविस्तर वृत जेपुरी पावल्यानंतर मुजरत कासदा बरोबरी पाठऊं चिरंजीव पुरुषोतमास सेलों न देणें बहूत काये लिहिणें लोभ असों दीजे हा असीर्वाद

[ राज ]श्री त्रिंबकपंतास नमस्कार रा। गोविंद नाईक आठवले यांस नमस्कार कासदास अर्धा रुपया इनाम देणें चिरंजीव दामोदरास नाशकीं पावता करणे सर्वदा पत्रीं सांभाल करणें हे विनंती

[ बालबोधींत* ] राजमान्य राजश्री दामोदर माहादेव यांप्रति भाईभट पुरकर याचा नमस्कार ... बेणाजी त्रिंबक सा। नमस्कार विनंती सविस्तर राजश्री बापूही लिहि[ ले ] त्यावरून शृत होईल घरचा सर्वांचा प्रामृश घेतला पाहिजे लोभ असो देणे हे विनंती

---

ले. २७ } श्री { श. १६६५ माघ वद्य २
सु. ११४४ जिल्हेज १५ } { इ. १७४४ जानेवारी २०

अखंडीत लक्ष्मी आलक्रुत राजमान्य राजश्री बापूजी माहादेव गोनार्दी यांसि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार सु॥ आर्बा आबैन मया व अलफ माहाराजा ईश्वरीसिंग व राजामलजी यांनी आम्हांस पत्रे पाठविली व रा। गोविंदराव यानी तुम्हांस पत्रे पाठविली ती सारी येथेच आली सविस्तर पत्रांवरून कळले त्यांची उतरे त्यास पाठविली असेत तुमचीं पत्रे तुम्हासकडे पाठविली असेत ती पाहून तुम्ही त्याची उतरे देऊन कासीद रवाना करणें सारांश त्याही येण्याचा व फौज रवाना करावयाच्या विचाराचा मजकूर लिहिला आहे त्यास फौज त्या प्रांते रवाना केली त्याचे साहित्य करणे आम्हांस जरूर आहे ते लिहिनील तदनुसार मदत तुम्ही करणे ते करितील तुम्हीं जलदीने जाणें[नि.*] जाणिजे छ १५ जिल्हेज [दा.* ] बहुत काय लिहिणे

---

ले. २८ | श्री | श. १६६५ माघ वद्य ६
सु. ११४४ जिल्हेज १९ | | इ. १७४४ जानेवारी २४

राजश्री राणोजी सिंदे गोसावी यांसि

दं अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य [ मो. जा.* ] श्रा बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद सु॥ आर्बा आर्बैन मया व अलफ राजश्री बापूजी माहादेव यांस राजश्री ईश्वरीसिंग यांजकडे रवाना केले टिक्याची वस्त्रे व हतीघोडे रवाना करावे लागतात त्यास हती तुम्हाजवल त्यास द्यावयायोग असेल तर त्यास देणें रा॥ लक्ष्मण शंकराबाबत छ्यावा तुम्ही ठेवणे कदाचीत हती तुम्हांजवल द्यावयाचा नसिला तर लक्ष्मणपंताबाबत छ्यावा मारनिलेस देऊन रवाना करणे व घोडे देणें येविसी अलाहिदा सनद पाठविली आहे तरी त्याची रवानगी जलदीने करणे जाणिजे छ १९ जिल्हेज [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ वा.* ] लेखन । सीमा

[ पाठीमागे डाव्या हातच्या कोपऱ्यांत बाजापेचा शिक्का* ]

---

ले. २९ | | श. १६६६ पौष वद्य ५
सु. ११४५ जिल्हेज १८ | श्री | इ. १७४५ जानेवारी ११

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री दामोधर महादेव गोसावी यांसि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार सु॥ खमस आर्बैन मया व अलफ तुम्हीं पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले दिलीहून राजश्री बापूजी माहादेव यांस मनसूर अलीखान याजकडे रा॥ केले राजश्री मल्हारजी होलकर याचा हती गेला होता तो त्याजपासून घेतला कितेक स्नेहाचा मजकूर नबाब सफदरजंग यानी सांगितला व वकील आम्हाचा दिल्हे त्यास घेऊन सरदाराकडे आलो सरदाराच्या भेटी जाहाल्या सर्व अर्थ यांस सांगितला परस्पर स्नेहाची वृधी करून सरदारसहीत कोट्याहून कूच करून इकडे आलो हुंडिया नबाब सफदरजंगाबाबत पाठविल्या आहेत म्हणोन लिहिले ते कललें ऐशास सफदरजंग यांस स्नेहाविसी सांगून देहावरी आणिले हती व पैका घेतला उतम केले सरदाराचे व सफदरजगाचा स्नेह मुस्तकीम केला बहूत उतम केलें हुंड्या पाठविल्याप्रो पावल्या राणाजी माधोसिंगास घेऊन आले आहेत सरदाराची व याची रदबदल पडली आहे सरदार व बाबा म्हणतात की माधोसिंगास आमच्या हाती देणें पाचा लक्षाचा पटा ईश्वरासिंगाकडून देवितो व रामपुरा दरोबस्त व काही नगद देऊन याप्रो रदबदल आहे ठहराव जाहला नाहीं वजिराचे पुत्र इंति[जा*]मुदौला व जाट दो चौ रा(रो)जात येतील दुर्जनसाल कोटेकर बुंदीस आले आहेत राणाजिस सामील होणार म्हणोन लिहिले ते कलले अतःपरही नवल विशेष वर्तमान तेथील लिहीत जाणें दिलीकडीलही वर्तमान लिहिणे आम्ही

मजल दरमजल त्या प्रांते येत असों जाणिजे [ नि.* ] आठा दिवसा आड जलद जोडीबरावर सविस्तर वर्तमान लिहून पाठवीत जाणे छ १८ जिल्हेज [ बा.* ] लेखन । सीमा पौ छ २० मोहरम

---

ले. ३० } श्री { श. १६७० ज्येष्ठ वद्य ६ / इ. १७४८ जून ५

पुा श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] पंतप्रधान स्वामिंचे सेवेसी

विज्ञापना छ १९ जमादिलाखरीं सखारामपंतानी राा मल्हारबास सांगून कनीराम दिवाण निा राजे माधोसिं[ग] नरसिंगदास वकील निा नवाब सफदरजंग या दोघांस सुरजमल जाटाकडे मामलतीस्तव पाठविलें आहे जाट दबोन मामलत करिता तरी नक्ष राहोन पैकाही विपूळ देता सांप्रत सुरजमलाचेंच येकतलिसें दिसून येतें लौकरीच मामलतही होईल जो ठहराव होईल तो पुढें सेवेसी विनती करूं प्रस्तुत सुरजमल जे देईल तेच घ्यावे वचनप्रमाण देऊन मामलत फैसल करावी आणि कुमुहूर्त टाळून अखे[र] मथुरा येथे छावणी करून जाटाचे पारपत्य करावे हे मानस कारभारी याचे आहे दोचौ दिवसांत जे अमलांत येईल तैसी विनंती लिहून पाठऊ सेवेसी श्रुत होये हे विनंती

---

लें. ३१ / रमजान २४ } श्री / पौ छ ६ शवल { श. १६७० भाद्रपद वद्य १[illegible] / इ. १७४८ [illegible]

राजश्री बापूजी माहादेव व राजश्री दामोदर माहादेव [illegible]

दं अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य [ मो. जा.* ] [illegible] दंडवत विनंती उपरी येथील कुशळ जाणऊन स्वकीये [illegible] विशेष राजे ईश्वरसिग गर्वयुक्त होऊन बमये फौज [illegible] चालोन अले त्यांसि आम्ही तयार होऊन गेलो [illegible] प्रसंग उतम प्रकारें जाला कछवे सिकंदे करून [illegible] होऊन राा केशोदास आम्हाकडे पाठऊन [illegible] देतो याउपरी सलूख करावा येसा त्याजकडील [illegible] आमची भेटी जाली ते कूच करून जेपुरा[illegible] डियाकडे मुकाम आहे ज्याजकडे [illegible] हरनाथसिग जसवतसिग मोहबतसिग [illegible] घेऊन आपल्याबराबर आणिले आहेत [illegible]

राहिली तेही साली होऊन बुंदीस जाऊन तेथील बदोबस्त करून तदनंतर जिकडे जाण्याचा योग होईल ते लिहून राजश्री जयापा व राजश्री रामचद्रबावा हेही मालवियातून येतील त्याची आमची भेटी होईल तुम्हाकडील दिलीची राजकारणे सर्व आपले उपयोगी राखून लिहून पाठवणे राजश्री बावा आम्ही येकत्र होऊन उपयोगी अर्थ ते होईल याजकरिता तेथील मनसबे राजकारणे कोणे प्रकारें आपल्या उपयोगास कोणती ते सविस्तर लिहून पाठवणें राजश्री बावाकडे अर्थ तुम्ही लिहिलाच असेल तदनुसार लिहून पाठवणें आम्ही ते येकत्र सत्वरच होऊन कर्तव्य अर्थ तों केला जाईल परंतु त्यांकडे आम्हांकडे आन्वये येकच वृत लिहीत आसिलें पाहिजे [नि.*] छ २४ रमजान बहूत काये लिहिणे हे विनंती [ ब.* ] मोर्तें। ब सुद

[ पाठीवर डाव्या बाजूस वा. शि.* ] श्री म्हळसा। कांत चरणी त। त्पर खडोजी सुत। मल्हारजी हो। ळकरः

---

लें. ३२ } श्री { श. १६७० पौष वद्य ३
अदमासें पौष वद्य ३ } { इ. १७४८ डिसेंबर २६

पुा राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यासि

विनंती उपरी तुम्ही पत्री लिहिले की माहाराजा अभेसिग याच्या साहित्यास अपले जाणे जाले त्यावरून नवाब अमीरुल उमराव सादातखान बाहादर जुलपकारजंग यानी बोलाऊन नेऊन पुसिले की बाळाजीरायाचे आमचा परम स्नेह उमदी कामे त्याचे विचारे करणें येसें असता पातशाहानी अजीमुलाखानाचा पुत्र न्यायेतखान बहादर बखतसिग अजमेरची सुभियाची नायेबत सांगून पाठविले त्यासि अभेसिग याच्या चितात अन्य विचार अला तरी रावजीनी माकूल करावे ते गोस्टी राहून बखतसिंगास दबावितात हे सला की काये येसे कितेक प्रकारे भाशण त्यासि जालें ते तुम्ही पत्री लिहिलें येसियासि राठोड उभयेता बंधूही आमचे स्नेही कोणासी जुंजावे अम्ही अलो येक महिना जाला सारस्य करून द्यावे याजकरिता धम धरून दोघासही सागणे ते सागून सारस्याचा विचार मनास अणिला तुम्ही लिहिलें होते की सारस्य उभयेतासी करून दिलिया सर्व अमीर सतोशी अहेत आम्हासही पातशाही काम बजावणें वजीर व बक्षी सतोशी राखणे आणि दोघासीही भाऊपणा त्याचेही नुकसान न व्हावे येसे जाणून येक महिना रदबदळ करिता लागला तो पावेतो धम धरून माहाराजा अभेसिंग याची व माहाराजा बखतसिग याच्या भेटी पौश कृष्ण त्रितीयेस करून सारस्य उभयेता बंधूचे करून दिल्हे ज्यामधे पातशाहा व अमीर सर्व राजी तेच गोस्टी अम्हासही करणे प्रस्तूतही अमीरुलउमराव सादातखान बहादूर जुलपकार-

जंग याच्या मनोगतानरूप उभयेता बंधूचे सारस्य केले [ नि.* ] वरकड वर्तमान दिलीचे पातशाहाजीचे वरचेवर लिहीत जाणें विस्तारें काये लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती [ ब.* ] मोर्त । ब सुद

पौ छ २ माहे सफर

---

ले. ३३
जखर ८

श्री

श. १६७१ ज्येष्ठ शुद्ध ९
इ. १७४९ मे १४

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव गो

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्हीं पत्र छ २३ रबिलाखरचे पाठविले ते छ २७ जमादिलौवली प्रविष्ट जाहालें कितेक मजकूर हजूरचे सार्वभोम सिकारीस गेले वजीर व बाजे उमरायांन उजाम दिलीतच आहेत मीर मनू लाहोरास आहेत आबदाली पठाण अटक उतरून आपले मुलकास गेला सरदारानी दतियाचा तह करून ढवलपूरचा घाट उतरले म्हणोन विस्तारे लिहिले ते कलले याउपरीही तिकडील नवल विशेष वर्तमान लिहीत जाणें [ नि.* ] छ ८ जमादिलाखर बहूत काये लिहिणें [वा.*] लेखन । सीमा

पौ छ १३ रजब

---

ले. ३४
जखर ८

श्री
पौ छ १

श. १६७१ ज्येष्ठ शुद्ध ९
इ. १७४९ मे १४

पुरवणी राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसि

उपरी नासरजगाने बकसीगिरी व वजीरी घ्यावयांची उमेद धरून सादातखानाचे विद्यमाने......केला सालजाब शुके नासरजंगा गेले ते सर्वही वजिराचा रुसवा होता त्याच समयांत गेले वजिराची व पातशाहाची ऐक्य......नासरजगास हजूरात यावयासी...केले प्रस्तुत सरदारखान ... उतरलियावर वजिरांनीं बाईट मानोन नासरजगास हजूर बोला...पाहावे कसकसा रंग......लिहिले ते कलले दक्षिणी... नर्मदा उतरू न द्यावे मालवा......द नासरजंगाचे तीर्थरूप...भूपालपर्येत आले त्यास येतद्विषईचा फळादेश कोणे तऱ्हेने जाहाला तो महसूर आहे तेथे नासरजगानी हे उमेद धरिलियांस ईश्वरकृपेकरून इकडून चमत्कारास आतर होणार नाहीं पहिली सेवा थोडी जाली किंबहुना त्यासि त्याचे पित्याहीपेक्षा विशिष्ट प्रकारे महजूज केले जातील चिंता न करावी [ नि.* ] कृपा करून मनसबा या [गे*]जात श्रीकृपेने जे इछितील ते घडून येईल छ ८ जमादिलाखर बहूत काये लिहिणे [वा.*] लेखन । सीमा

पौ छ १३ रजब

---

ले. ३५ }
जासूद ८ } श्री { श. १६७१ ज्येष्ठ शुद्ध ९
{ इ. १७४९ मे १४

पुा राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसि

उपरी सरदार ग्वलपूरचा घाट उतरून जाटाचे मुलकात आले जाटानी ठाणी बळाऊन तमाम मुलूक उजाड केला सरदार फतेपुरास गेले तेथे युध्यप्रसंग जाहाला जाटानी वरच्यावर कुमकेविसी वजिरास लिहीत गेला त्याजवरून वजिरानी राजश्री दामोदर माहादेव यांस सरदाराकडे रुसकत केले पत्रेही पाठविली तथापि सरदाराचे चितात जाटाचा तहरह करून काही घ्यावें वजिराची तों मर्जी नाहीं पातशाहा सिकारीस निघालेच आहेत वजीरही निघोन पातशाहासहवर्तमान आगरियांस येणार म्हणोन तपसिले लिहिले ते कलले ऐशास सरदार समीप गेलेच आहेत ज्यात सार्वभौमादि वजिराची मर्जी असेल व जाट नरम होत तेच ते करितील सर्वोत्कर्ष पातशाही वंदे पातशाही वंदगीत रुजू राहावे ते सरदार करीत असतां वाईट मानितील तर त्यात ते मन कशास घालितील परभारा जाबसाल ते करीतच असतील सविस्तर वर्तमान लिहून पाठवणे [ नि.* ] जाटाचे मगरुरीमुले चमेलीपलीकडे जाणे सरदारास जरूर प्राप्त जाहाले वरकड पातशाही मर्यादेस अतर करावे तहाखेरीज वर्तावे हे तिलमात्र मनात नाही वजिरानी संशये मानून रुपेस अतर करावे ऐसे नाही छ ८ जमादिलाखर [ नि.*] बहूत काय लिहिणे [ वा.*] लेखन । सीमा

पौ छ १३ रजब

---

ले. ३६ } श्री { श. १६७१ ज्येष्ठ वद्य ११
जासूद २५ } पो छ २१ रजब { इ. १७४९ मे ३१

राजश्री दामोदर माहादेव गोसावी यांसि

॥ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य [मो. जा.*] श्री मल्हारजी होलकर व जयाजी सिंदे दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहिणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिले वर्तमान सविस्तर अवगत जाहाले जाटाचा ऐवज येणे त्यापैकी येक लाख दाहा हजार रुपयाची हुंडी पाठविली ते घेऊन उजेनीस रवाना केली असे हुंडी सकारली तरी जाटास लेहून पाठवणे वरकड ऐवजाची रवानगी केलीच असेल नसली केली तरी सत्वर ऐवज पाठऊन देणे [ नि.* ] रा। छ २५ जमादिलाखर [ नि.* ] पुढे येका महिन्याचा वाइदा होता त्यानी दोन मास होत आल्या उपरी पैक तिनसे णवद व पाऊण सत्वरी पाठवणे बहूत काये लिहिणे हे विनंती [ व.* ] लेखन । सीमा

[ पाठीवर बाबापेता मुतालिकी शिक्का* ]

---

लें. ३७ }  श्री  { श. १६७१ ज्येष्ठ वद्य ११
जसर २५ }  छ २१ रजब  { इ. १७४९ मे ३१

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री दामोदर माहादेव स्वामी गोसावी यांसि

पो रामचंद्र मल्हार सां नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता छ २५ जमादिलाखर मुकाम नजीक सातोली श्रां कोटे जाणोन स्वकीये लिहीत जाणे विशेष तुम्हीं पत्र पाठविलें ते पावले लिहिले वर्तमान कलले जाटाच्या यैवजी येक लाख दा[हा*] हाजाराची हुंडी पाठविली ते उजेनीस रवाना केली असे सकारली तरी जाब लेहून पाठऊन [नि.*] पुढे मुद्दती होऊन गेल्या यैवज रवाना केलाच असेल नसला तरी तीनसे नवद व पाऊण सत्वरी पाठवणे बहूत काये लिहिणे लोभ आसो दीजे हे विनंति

---

लें. ३८ }  श्री  { श. १६७१ ज्येष्ठ वद्य ११
}  छ २१ रजब  { इ. १७४९ मे ३१

पुरवणी राजश्री दामोदर माहादेव गो।

विनंति उपरी नवाब नासरजंगाचे वर्तमान तरी बऱ्हाणपुरास होते तेथून कूच करून आसेरीजवली येऊन राहिले इतकियात आमची बातमी गेली कीं हाड्याच्या घाटे लस्कर येते त्याजवरून तेथून कूच करून खाडव्यावरून खरगोणावरून अकबरपूरच्या घाटास आले तेथे नर्मदा उतरोन उजेनीवरून दिलीस जावे हा मनसबा करून आले होते इतकियात आमची फिरोन बातमी गेली की लस्कर रस्ता सोडून सेंचीवरून मजल दरमजल उजेन इंदुरास येत आहे तेव्हा संकट जाणोन प्रस्तुत अकबरपूरचाच मुकाम करून राहिला आहे [नि.*] या उपरि माडोचा घाट वेघोन आला तरी आम्ही कोणते रीतीने त्यासी बोलावे तुम्हाकडील करार होऊन यैवज पदरी पडतो तरी निश्चयेरूप बिघाड करून आटकावितों तुम्हीही येऊन पावतसे कार्य होते तुमचा तो अर्थ कलतच आहे घाव जाऊन बुकी आठवेल बागदस्त जातो मग आटपत नाही तुम्ही म्हणाल की तुम्ही बिघाड का न करा तरी विना पैका व कामे आम्ही दुतर्फा नासावे कीं काये आसो आमचे काये जाऊं पाहाते जरी तूर्त तुमचा जाब आला तरी बरें नाही [तरी*] सुखरूप जाऊं द्यावा की कांये तें सत्वरी लिहिणे हे विनति

---

ले. ३९
जखर २९ } श्री { श. १६७१ ज्येष्ठ वद्य ३०
{ इ. १७४९ जून ४

राजश्री बापूजी माहादेव व राजश्री दामोदर माहादेव गोसावी यांसि

ई अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य [ मो-जा.* ] श्रो मल्हारजी होलकर व जयाजी सिंदे दंडवत विनंती उपरी . येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष इकडील वर्तमान तर नवाब अकबरपूरच्या घाटविर आला आहे घाट उतरोन दिलीस जात आहे हे वर्तमान आइकिलीवर मनसबा पाहाता कदाचित दरकूच जात असेल हे ध्यानात आणून बुलगे पेंढारी व गौली वगैरे वाणी बंकाल यास खेचीच्या रानात टाकून सडे लस्कर कोट्याच्या सुमारे आडवे व्हावे या विचारे आलो अैसियास हे बातमी नवाब नासरजंग यास ठीक जाताच छ १९ जमादिलाखरी कूच करून माघारे बऱ्हाण [पुरचा] रोख धरिला आहे वरकड सविस्तर आलाहिदा पुरवणी पत्रावरून कलेल रा। छ २९ जमादिलाखर [ नि.* ] बहूत काये लिहिणे हे विनंती [ ब.* ] लेखन । सीमा पो। छ १३ रजब

[पाठीवर बाबापेचा मुतालिकी शिक्का* ]

---

ले. ४० } श्री { श. १६७१ ज्येष्ठ–आषाढ
{ इ. १७४९ जून

राजश्री बापूजी माहादेव व राजश्री दामोदर माहादेव गोसावी यासि

ई अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य [ मो. जा * ] श्रो मलारजी होळकर दंडवत विनंति उपरी येथील कुशळ जाणऊन स्वकीये कुशळ लिहीत जाणे विशेष तुमची दिलीकडे रवानगी केलियानतर दरमजल शाहाबादेस आलो त्यासि नवाब नासरजंग दिलीस जाण्याचे उदेशे बराणपुरास आळेच होते पुढे हांडियाच्या घाटे रस्तियाने जाणार तों आम्ही रस्तियाच्या मार्गे येऊन मार्ग निरोध केळा तेव्हा त्याजला शह पडोन रास्तियाचा मार्ग टाकून बऱ्हाणपुराहून कूच करून आकबरपुरास रेवा उतरोन पुढे माडवचा घाट चढोन मुकुदबारीने जाणार येैसें वर्तमान आम्हास रेवातीरास आलियाचें कळलियावर आम्ही कूच करून कोटियाच्या मुलकात मुकुदबारीच्या सुमारे त्याचा मार्ग निरोध करून मुकाम केळा हेही खबर त्याजला गेली तेव्हा शह भारी पडोन माघारे जावयाचा विचार केळा पूर्वी दक्षिणेहून दिलीस जावयाचा निश्चये केळा ते समई माहाराव जानोजी निंबाळकर यांजला श्रीमंत राजश्री [ मो. जा. * ] पंत प्रधान स्वामी याजकडे पुणियासि पाठविळे की आम्हास दिलीस जाणें नवाब सफदरजंग याचा व राजश्री मलारराऊ याचा भाऊपणा आहे त्यासि येैसे होये की त्याजला पत्र पाठवून आमचे सर्वप्रकारें साहेता करावी तुमचा

आमचा स्नेह वडिलापासून त्याजवर नजर देऊन सरदारास पत्र द्यावे की याचे साहेता करावी त्यासि श्रीमंतानी श्रवण करून प्रतिउतर केले की राजश्री मल्हारबा देसास येणार त्याची भेटी जालिया वर्तमान मनास आणून तुम्हासी जाचसाल करणें तो करून यैसे करिता तुम्ही जाल तरी मार्गी फौजा आहेत तुमची स्थीत राहून जाणे होणार नाही याजकरिता तूर्त न जाणे म्हणून साफ उतर केलें येणेंप्रमाणें राजश्री जानबानी नासरजंगास लिहून पाठविलें हाही विचार त्याजला पडला मुख्य मार्गावर मुकुंदबारीपासी आमचा मुकाम निभाव न होये शहभरी पडोन नवाब नासरजंग यानी माघारें कूच करून बऱ्हाणपुराकडे गेले मोठे उमेदीने घाट रचोन दिलीस जात होते परतु नाउमेद होऊन माघारे गेले नवाब सफदरजंग याचा येकनिष्ट स्नेहाचा आर्थ सागोन वचन प्रमाण घेतलें त्या वचनाप्रमाणें त्याचे साहह करणे जरूर परज्यन्यकाळ या दिवसात लस्करें दिसास गेली पाहिजेत परतु या प्रसंगी टाळा दिलियाने उतम नाही यैसें जाणून त्याचा मार्ग निरोंध करून माघारें फिरविलें या उपरी आमचे येथून कूच होऊन इदुरास जातो तुम्हाकडील उतराची मार्गप्रतीक्ष करीत आसों सवा महिना होन आला आद्यापी उतर नाही नासरजंग याचे वर्तमान लिहिल्याप्रमाणे नवाब सफदरजंग यासि सागून कराराप्रमाणे पैकियाची सरबरा करून जलदीने उतर पाठवणें [ नि.* ] जाटाकडील यैवज मुदती होऊन गेली तरी सत्वर यैवज पावसें करणे [ नि.* ] बहूत काये लिहिणें हे विनंती वरकड वृतांत राजश्री रामचंद्रबावानी आगोधर लिहिलेच आहे त्यावरून कळू येईळ हे विनंती [ब.*] मोर्त । ब सुद

[ पाठीवर डावे बाजूच्या कोपऱ्यांत ले. ३१ प्रो शि. *]

---

| ले. ४१<br>जिल्हेज ८ | श्री | श. १६७१ कार्तिक शुद्द १०<br>इ. १७४९ नोव्हेंबर ८ |
|---|---|---|

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री दामोदर माहादेव गोसावी यांसि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहिणे विशेष पत्र पाठविले ते प्रविष्ट जाले लिहिला मजकूर कलला नवाब अबदुल हुसेनखान यांचा लेक बोलवावयास (स) पाठविला यास्तव नासरजंगाकडे जाऊन त्यास भेटून ते काये बोलतात ते आईकून सेवेसी येतो म्हणोन लिहिले ते कळले उतम असे लौकर जाऊन नवाबास भेटो [ न* ] अतिसत्वर हुजूर येणे नवाबाची भाव भक्ति येगीत भाव सर्वही मनास आणून येणे जाणिजे छ ८ जिल्हेज [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ बा.* ] लेखन । सीमा

[ पाठीवर* ] पो छ २४ जिल्हेज औरंगाबादेच्या कासदाचा जाब

---

ले. ४२ } श्री { श. १६७१ कार्तिक वद्य ११
सु. ११५० जिल्हेज २४ } { इ. १७४९ नोव्हेंबर २४.

असंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री बगाजी यादव गोसांवी यासी

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार सुा खमसैन मया अलफ राजश्री दामोदर माहादेव यांचे पत्र आले कीं राजश्री मोरो..........ऊन येतो यैसियासी आम्हीं सातारां आहो येथे नानाप्रकारच्या गपा उठावयास चुकणार नाहीत निदान भल्या माणसासीं काहींच सौरसाच्या गोश्टी घडणार नाहीत यास्तव राजश्री मोरोपंत यासी राहात त्याच च्यार गोश्टी सांगणे आम्ही पुण्यास गेलियावरी जे लिहिणें ते लिहू तूर्त रा॥ दामोदर माहादेव यांसच पाठऊन देणे [ नि.* ] जाणिजे छ २४ जिल्हेज [ नि.* ] येथील दुखण्याचे प्रसंगात आलिया ज्या कार्यास येतील त्यास रंग पडणार नाही वाईट मानितील विमनस्कतेस कारण होईल बहूत काये लिहिणे [ लं* ] लेखन । सीमा

---

ले. ४३ } श्री { श. १६७१ फाल्गुन शुद्ध ८
पौ रखर ६ } छ ६ राखर { इ. १७५० मार्च ४

पु॥ चिरंजीव राजश्री दादास प्रति तुम्ही लिहिले की जाटाकडील यैवजापैकी येका लाख्याच्या हुंड्या पाठविल्या त्या पावल्या त्याच्या साहित्याविशंई बहूत प्रकारे लिहिले तर अज पर्यंत कमी तो जाली नाही व पुढेही ही ईस्वरइछेने होणार नाही परतु त्यानी जितक्या यैवजास अम्हांस जामीन दिधले तितका यैवज तो पाठवावा असतां येक लाख दिलीस असतांच चाळविले दुसरे मागातां अज अज उद्या उद्यां करून खोळंबा केला सेवटी औघा यैवजही न पाठविला सातान्घास जांतांच या लाखाचा तागादा होईल यास्तव त्यास ताकीद करून बाकीचा यैवज कराराप्रमाणे सत्वर पाठविला पाहिजे की समयास कार्यास ये यैवज न पावल्यास ते आपल्यावर शब्द येऊ देणार नाहीत औध्या हुंड्या अटीच्या अहेत अठास च्यार साडे च्यार दर सेकडा बटा पडतो हा अम्हांपासून भरू घेतील याचा हिशोब जाटापासून समजून घेणे हुंड्या औरंगाबादेस पाठवितो सावकारानी सकारल्या व लाा हातांस अले म्हणजेच रसीद दिलीहून पाठऊं [ नि.*] म्हणून लिहिलें तरी जाटाची मिठी सोडविली आणि औध्या पातशाहींत जे जे कर······हे तुमचेंच काम होतें अतां मीरबकसी हिंदुस्थानचे हकीमखा आणि मुद्रीजखा आली रुस्तुमखां येक येक सरदार यैसा होतां जे आजी कोणाजवळीही यैसे सरदार नसतील त्या गरूरावरी त्यांजवरी चाल केली हजरत जिलसुभानी विसा कोसावरी असता बकसीस कुटून हकीमखां अली रुस्तुमखां वगैर मारून टाकून देवढीपर्यंत चाल केली जर संध्याकाल नसता जाहला तरी बकसीस डेरियांत थेट मारले असतें ते श्रीमंत स्वामीचे प्राक्तन जे त्यांचे चाकर त्या हातून

वसें काम विना लढाई जाहालें हेंही फते त्यांचीच आहे जातांस अधेरुच्या परापेक्षा सर्वापेक्षा आशा जाणावे चंदा······ची टेक याणी राखिली अपल्यास महद्यश प्राप्त जाहालें बहुत काय लिहिणें हे आसीर्वाद

---

ले. ४४ ) पौ रसर ६ )

श्रीशंकर

छ ६ रावार

( श. १६७१ फाल्गुन शुद्ध ८
( इ. १७५० मार्च ४

पुा चिरंजीव राजेश्री दादा यांसि आसीर्वाद उपरी तुम्ही लिहिले कीं औरंगाबादेहून दरमजल इंद्रापुरास आलों तेथें शुतरस्वार पत्रें घेऊन आले जे तुम्हासाठीं येक महिना धारूर प्रांती राहिलो औरंगाबादेहून अर्जी आली त्यावरी अर्जी आलीच नाहीं तुमचा मुश्ताक फार आहे त्यावरून मोठी मजल करून गेलो चों कोसावरी पुनः तैसींच पत्रें आलीं लिहिलें कीं इस्तकबाल कोणास पाठवावें मोरोपंतास व अबदुल हुसेनखानाच्या पुत्रास पाठविलें अम्हीं वसें पानखुशाचो अम्हीं तवाजे केली छ ७ जिल्हेजीं मुलाजमत केली बगलगीर करून बहूतच सिष्टाचार केला त्रिंबकपंतानी दोन मोहरा व माधोराव वेणाजीपंत खंडोबा यानी पांच पांच रुपये नजर केले अनवरत्तां मुसवीतां मोरोपंत व अम्हीं पांचजण इतके मात्र होतों ते दिवसीं शिष्टाचार मात्र जाला दुसरे दिवसीं सैन्यासमागमें डेरे पाठऊन अम्हीं तुलजापुरी देवीदर्शन ब्राह्मणभोजन करून संध्याकालीं डेरेदाखल जालों तों नासिकाहून खेमा कासद पत्रें घेऊन आला तोच खेद तीन दिवस राहिला दरबारास जाणें न जालें छ ११ अबदुल हु[ सेन ]खानाच्या पुत्रासमागमें मातमीचा खिलत देऊन मातमांतून उठऊन नेलें बोलिला कीं मीं तुम्हावरी किती खुषी आहे हें पाहिलें कीं कालपासून तुमचा चिरापटका बांधून बैसलो अम्ही म्हटलें जे कोठवरी शुक्र अदा करावा व अम्हीं तरी वस्त्रे दिल्हीं नाहींत बोलिले कीं अबदुल हुसेनखानाच्या पुत्रास दिधली त्यांतील हे दोन्हीं छ १२ खिलबत जाली आमूलांत बोलणे जालें पाहिजे तैसी निशा केली याविषई आठ चंद मजकूर लिहिला तो कलला त्यावरून बहूत समाधान जालें मुख्य तुरानियांचे शिष्टाचारास काय पाहावें लिहिले यथार्थ आहे जे याणीं सिष्टाचार सळूख कोणासी केला नसेल तो तुम्हासीं केला दक्षणचा दूयम पातशाह हातीं आला या गोष्टीचें सौख्य जालें खेमा कासद आलियाचे लिहिलें त्यावरून खेद जाला म्हणून लिहावे तरी संसारगोष्टी तीर्थरूप कैलासवासी हमेशा सांगत होते जे प्रपंचांत सौख्य किती म्हटल्यास तेवढा मद्याचा बिंदु मात्र सुख त्या दृष्टांतावरी मात्र दृष्ट द्यावी मतिमान्न प्रकाशयेत् या श्लोकाने बहूत दुख दिधले कदापि स्मरण न करावें चूप राहावे नित्य नवे खेल करीतच जावे चितास दुख मानिलें तरी खेलांत तील [ अपूर्ण* ]

---

ले. ४५
सु. ११५१ सफर ४ } श्री { श. १६७२ पौष शुद्ध ६
इ. १७५० डिसेंबर २३

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री दामोदर माहादेव गोसावी यांसि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्हीं विनंतीपत्र पा ते पावले गुजराथचे मामल्याचे रसदेचे अडीच ल [क्ष] रुपये वरातापो प्रविष्ट केले म्हणो [न लिहि] ले ते कळले उतम गोष्ट केली दाभाडे ...... चा करिता सदरहू ... चा निकाल करून देवावा ह्मणौन लिहिले त्यास येविसीची आज्ञा पेस्तर तुम्हास करणे ते केली जाईल राजश्री जयाजी सिंदे चाम्हारगोंदेयास आहेत किंवा कोठे आहेत ते लेहून पाठवावयासी आज्ञा केली पाहिजे म्हणौन तुम्ही लिहिले त्यास जयापा माळव्यांत गेले उजनीस जाऊन पोहचले असतील [नि.*] जाणिजे छ ४ सफर सुंा इहिदे खमसैन मया व अलफ बहूत काय लिहिणे [लं.*] लेखन । सीमा

---

ले. ४६
रवल १७ } श्री { श. १६७२ माघ वद्य ४
इ. १७५१ फेब्रुवारी ३

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहिणे विशेष तुम्हीं पत्र छ २९ सफरचे पाठविले ते छ ९ रालोवली पावले दिलीतील पातशाहा आदीकरून उमर्दे अमी [राचे] वर्तमान व लाहोर व अबदाल वगैर लि.........व बाजे अमीराचे वर्तमान अंतरबाह्य सर्व मनास आणून लिहित जाणे राजश्री मल्हारजी होलकर जयनगरास आहेत ते सार्वभोमाचे मनारंजेन करून वजिराचाही स्नेह राखतील तुम्हीं त्यास तेथील वर्तमान लिहीत असाल इकडले वरचेवरी वर्तमान लिहीत जाणे आम्हीं भागानगर प्राते जात असों जाणिजे छ १७ रालोवल [नि.*] मुलतानी छिटे वगैर रिस्तेची फर्मास जरूर तलास करून पाठवणे बहुत काये लिहिणे [ब.*] लेखन । सीमा पो छ १९ रासर

---

ले. ४७
रवल १७ } श्री { श. १६७२ माघ वद्य ४
इ. १७५१ फेब्रुवारी ३

पुा राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसि

उपरी पातशाहात व वजिरात अतिशयेसी पेच पडला आहे तुरानियांचे केले पातशाहा ऱ्याहाता इरानियांचे ठाई परम विशमता वजीर नवानिगादास्त करीतच आहेत बाहेर ... ... तील तर उतम न निघेत तर दि ... ... अर्जदास्त पान ... ... लियावर फार फार सं [तो] षी जाहाले स्वामीस फार ऱ्याहातात

पातशाहीचा मदार बाळाजीरायावर आहे म्हणतात गेली बाजी हातासाली घातली नवाब बहादूर व निजामनमुळूक फेरोजंग यानी उपकार फार केला गुजराथ व ग्वालियेर स्वामीस देविली म्हणतात स्वामीनी अकांनदौलतास व पातशाहास पत्रे वरचेवरी पाठवीत जावी इकडे स्वामी येतु तात हे अर्ज आम्ही केल्यावरून फार संतोषी जाले स्वामींनी इकडे यावें अथवा नर्मदेपर्यंत यावें गुजराथेस येणे जाल्यास लटीचा राजा येऊन सामील होईल म्हणोन विस्तारे लिहिले ते कळलें ऐशांस आम्ही पुण्याहून कूच केले त्यास गुजराथेमुले दाभाडियाचे तहरहचा गुंता पडला दाभाडियाचा सिंथील कारभार फार याजमुले दिदसगत ला ... ... ... येकायेकीं नासरजगास पठाणा......मारिलियाचे वर्तमान चालले ज्याची...करून होते त्यास चमत्कार कसा दाखविला माहाराष्टाचे तों ते परम द्वंदी त्यास पथ्थावर ठेवावें आपले राज्याचा बंदोबस्त करावा हे टाकून जाणे उतम नाहीं जाणोन आपले लोकाचा मुलकाचा व जाग्याचा बंदोबस्त करणे जरूर प्राप्त जालें राज्यातहीं कितेक पेचपाच आहेत ते दूर करावे लागले हिदायेद मोहि[दी*]खान व पठाण येतात ते सळूख किंवा बिघाड करितात ते पाहिले पाहिजे यास्तव गुंतावे लागले अवरंगाबादपर्येत आलो होते अतःपर त्याचेच रोखावर जातों होईल वर्तमान ते लेहून पाठऊन सारांश पातशाहाचे इरशातांहून अधीक आम्हांस नाहीं जे आज्ञा करितील त्याप्रो सेवा करून दाखऊन सर्वप्रकारे पातशाहाची रुपा संपादावी हेच जरूर असे तुम्हीं पातशाहासीं साल [जाब] करिता तो उतमच आहे हा म ... ... तुम्हांकडे लटीक ... ... स सवड राही असाच जावसाल करीत जाणें वजिरासी बोलणे [नि.*] की पठाणानी हे कर्म केले नावास मात्र हिदायेत मोहिदीखान केला आहे परतु सर्वाध्यक्ष हेच जाहाले आहेत तिकडे पठाण इकडे हे पठाण हे गोष्ट कामाची नाही याअन्वये बोलणे कागदीपत्रीं आम्हास उपयोगी पडे ऐसे करणे वरचेवर तेथील सर्व अमीराचे भाव व परस्परे इतिफाक कोणासी विमनस्कता कोणासी आमचे सरदाराविसी तेथे कसे आहे हे सविस्तर जरूर त्वरेने लिहीत जाणे छ १७ रबिलावल बहूत काये लिहिणे· [ब.*] लेखन। सीमा

पौ छ १९ राखर

---

ले. ४८
खल १७

श्री

श. १६७२ माघ वद्य ४
इ. १७५१ फेब्रुवारी ३

पुा राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसि

उपरी लाहोराकडील वर्तमान व शाहादार अली यानी फौज बहूत जमा करून हिरायेतच्या पातशाहासीं लढाई केलियांचे वर्तमान लिहिले ते कळले या उपरीही तिकडील वर्तमान चे[कंदर] वरचेवरी लिहीत जाणे ईश्वर..............ळये केला राजश्री.............. होलकर जयेपुरास पोहचले म्हणोन पात : सचर पोर्न्चली

पातशाहाची दृष्टी स्वामींवर आहे म्हणोन लिहिले ते कळले [नि.*] वरचेवर वर्तमान लिहीत जाणे छ १७ रबिलोवल बहूत काये लिहिणे [ब.*] लेखन। सीमा

पो छ १९ राखर

---

ले. ४९ } श्री { श. १६७२ फाल्गुन शुद्ध ८
रखर ६ } { इ. १७५१ फेब्रुवारी २२

पो छ १० माहे राखर मंगलवार तिसरा प्रहर मुा लश्कर बयान्यांत

श्रियासह चिरंजीव राजश्री दादा व नाना यांप्रति बापूजी माहादेव अनेक आसीर्वाद उपरी येथील कुशल ता छ ६ माहे राखर मुा इंद्रप्रस्थ जाणून स्वक्षेम लिहिणें विशेष रा उभयता सुभेदार यांच्या भेटीगोष्टी होऊन काये मनसबा यो[जि]ला याचा भावार्थ किमपि कळों येत नाहीं.......... चित आहो तर तेथील ... [अपूर्ण *]

---

ले. ५० } श्री { श. १६७२ फाल्गुन वद्य ३
रखर १६ } { इ. १७५१ मार्च ४

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जाणे विशेष आलीकडे तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान कलत नाहीं तर सविस्तर लिहिणें इकडील वर्तमान तर कडपे व कनोल व सावनूरवाल्यानी व हिदायेद मोहिदीखान यांनी दगा करून नासरजंगास मारिलें हे मर्जी पातशाहाची नव्हती यांस तंबी पोहोचवावी यात पातशाहा राजी जाणोंन सर्वप्रकारे पातशाहाची मर्जीवर कमर बाधून मजल दरमजल नादेडपर्येत आलो हिदायेद मोहिदीखान मुजफरजग यानीं पठाण व गैर कुल फौजेनसी हैदराबादेस यावयास अरकाटातून कूच केले दामलचरूचा घाट चढोन कनोलवाला पठाण यान्च्या मुलकात आले राचोटी म्हणोन मातबर जागा पठाणाचा आहे यांचे पलीकडून कूच छ १६ रालोवली करून राचोटीपुढें दोन कोस येऊन मुकाम केला लस्कर राचो[टी*]वरून येता पठाणानीं काहीं घोडे व छकडे व म्हैसी व गरीब गुरी[ब*] व मातबर काहीं लुटून घेतली त्यानीं फिर्याद मुजफरजंगापासी केली यानीं पठाणास बहुत रीतीने सागून पाठविले कीं हे गो[ष्ट*] अनुचीत आहे जे घेतले असेल लोकाचे फिरोन देणे त्याणी उतर सागून पाठविले कीं त्यात उडवाउडव केली आम्ही नासरजंगास खातरेत आणिले नाहीं तेथे तुमचा मजकूर काये पुढे काये

होते ते पाहा म्हणोन त्याजवरून मुजफरजंगास वाईट वाटोन अमानतखान बहादूर व लक्ष्मण खंडागले व [मो. जा.*] खान वगैरे लाहानथोर मनसबदार यांस बोलावून मसलहत केली कीं पठाणांची आम्हीं क्षेमाच करीत असतां ते बेआदाई करितात पुढेही जागीर त्याचीच त्याच्याच जागीरेतून जाणे तेव्हा उपद्रव लागेल पठाण लस्कर कूटून घेतील तर हे गोष्ट कसी कामांस येईल मुजफरजंगाचा। तीन हजार फिरंगीर होते त्यानी व सर्वांनी विचार केला कीं पठाणांस तंबी करावी त्यावर छ १७ राखोवली मुजफरजगानी मुकाम केला पठाण युध्यास तयार जालियांची खबर मुजफरजंगास येऊन हेही तयार होऊन दोन प्रहरी छ मारी युध्यस गेले मराटे सरदार कुल सिवाये लक्ष्मण खडागले वेंकटेशाचे यात्रेस गेले होते लक्ष्मण खडागले व मोगली फौज व फिरंगी दाहाबारा हजार होती हे चालोन गेली पठाण पंधरासे सतरासे कडपेकर व कनोलकर व सावनूरकर तिघे मिलोन होते लडाई सूर जाली पठाणही आप[ले*] लस्करातून बाहेर मैदानात तलावाजवल उभ राहून लडाई देऊ लागले दोन वेला पठाण चालोन कोते हतेरांस पोहचले तोफखाना भारी व फिरंगी लडाऊ नोकखानियाखाली उडऊन दिल्हे तिसरे वेलेस पठाण चालून आलें लढाई बरे वजेन जाली मुजफरजंगाचे पुढे हतीजवल लोक होते ते मार न सोसे म्हणोन निघालें तो कनोलवालियानी व सावनूरवालियानी दाटी करून हतीजवल हती आणिला मुजफरजग[नीं*] तीरदाजी केलीच तथापि येक गोली व येक तीर मुजफरजगास लागोन ठार जाले इकडील महमद अलीखानानी दोन गोल्या चालऊन कनोलवाला ठार केला नबाब आसफज्याचा पुत्र कनिष्ट मीर निजामअलीखान यांणी हती पुढे चालऊन [illegible] [illegible] वाला व सावनूरवाला यास पुरा करून त्याची डोचकी कापून [illegible] व त्याचे दिवाणांची डोचकी कापून बरचीस लाविली व त्याचे दिवाणांची [illegible] लाऊविली कडपेकर पंनास राउतानसी गडबडीत पळून [illegible] यानी शादियाने वाजविले फतेह मीर निजाम [illegible] अलीखान यांचे तोंडावर थोडासा तीर लागला [illegible] माणोस मारले गेले खावंद मीर निजाम [illegible] म्हणोन लेहून आले तुम्हांस वर्तमान [illegible] मनसुबियांत विचारात आहेत ते [illegible] करीत असतां या तऱ्हेने जाहाले आम्हीं [illegible] लिहिले जाईल [नि.*] छ १६ [illegible]

पौ छ ९ माहे जाखर [illegible]

ले. ५१ } श्री { श. १६७२ फाल्गुन वद्य ३
रुमाल १६ } { इ. १७५१ मार्च ४

पुा राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसि

उपरी पातशाहा व फेरोजग व वजिरासी बोलावयांचा मजकूर

[डावें कोष्टक*] पातशाहासी बोलावे की नासरजंगा [सी*] पठाणानी व हिदायेद मोहिदीखान यांनी दगा करून मारिले हिदायेद मोहिदीखान खावंदगिरी करू लागले नासरजंगास दगा केला यांत हजरतीची नारजावंदी सर्वप्रकारे हजरत नासरजंगास च्याहात होतें व उमदा अमीर होतां आम्हांसी येखलास राखत होतां तथापि ज्या गोष्टीत हजरतीची मद नजर तेच करणें आम्हांस जरूर होऊन गुजराथचा मामला मातबर व ज्यात आमचे काम मातबर होते परंतु ते मोकूफ करून हिदायेद मोहिदीखान व पठाण याजवर रोख [धरिला*] हे खबर पठाणास कळून पठाणानी हिदायेद मोहिदीखानासी कुरूस राखोन आम्हांसी येखलासी करावी या तरतुदेस लागले हे हिदायेद मोहिदीखानास कलोन लढाईस रूबकार होऊन लडाई जाली पठाण व हिदायेद मोहिदीखान लडाईत मारले गेले मीर निजाम अलीखान नासरजगाच्या जागा जाहाले यांणी पूर्व स्मरोन दक्षणचा मामला मातबर आहे आमच्या विचारे दक्षणचा बंदोबस्त करावा येणेकरून दौलतीचा पाया पोख्ता होऊन बंदोबस्त चागला चालेल येविसी हजरतीने मीर निजाम अलीखान यास शुका सादर करून आमचे विचारें बंदोबस्त करीत ते केल्या आम्हींही चाकरी करून दाखऊन म्हणोन अर्ज करणें

[उजवें कोष्टक*] फेरोजगासी बोलावे की आपण दक्षणेस यावयाचा कस्त धरितात बहूत उतम असे आमचा व नवाब आसफज्याचा येखलास होता त्याच विचारे आपण व मीर निजाम अलीखान याणी श्नेह चालवावा येणेकरून तर्फेनचा नफा व कामे बहूत आहेत व स्नेहेकरून काम बहूत घडतील म्हणोन बोलावे

नवाब वजीर मुमालकासीं बोलावे की तिकडे पठाणानी सोखी करून हगामा केला वजिरासी कजिया फैलाविला याच विचारे इकडेही पठाणाही नासरजगास दगा करून मारिले नमूदास हिदायेद मोहिदीखान उभे केले होते हिदायेद मोहिदीखान बरा उमदा सरदार लायेक सलतन[ते*]चा होता मातबर मातबर कामे करिता परंतु त्याजसीं पठाणानी थोडेच दिवसात कोर चालऊन दक्षण आपण आटोपावी या तलाशास लागले हे खबर आम्हांस कलोन तरतूद करणे ते केली की हे थोडे असोन हे उमेद राखतात भारी जालियावर कामाचे नव्हेत देखोन मोगलाई सरदार व या राज्यातील सरदारासी बोलोन रफाकि करून घेऊन पठाणावर जावे या विचार (रे) मजल दरमजल नादेडाजवल आलो तों पठाण व हिदायेद मोहिदीखानासी लडाई होऊन पठाण व हिदायेद मोहिदीखान मारले गेले पुढे निकटेच जात असोन म्हणोन बोलावे

[निराळ्या हस्ताक्षरांत धावता मजकूर*] ज्याचे त्याप्रकारे बोलून आपले कामास उपयोगी पडे तैसे करावे छ १६ रबिलाखर बहूत काये लिहिणे [वा*.]

लेखन । सीमा पो छ १८ जाखर

---

ले. ५२ } श्री { श. १६७२ फाल्गुन वद्य ६
रखर १९ } पौ छ १३ माहे जाखर { इ. १७५१ मार्च ७

पुरवणी राजश्री बापूजीमाहादेव गोसावी यांसि

उपरी वजीर आजम व निजामनमुल्क व मीर बकसी हे समदुखी जाले आहेत पातशाहास बाहेर काढू च्याहातात हे निघतील आगऱ्यापावेतों सारे येतील दो हजार फौज येक पथक स्वामींनी पाठऊन निजामनमुल्क यांस न्यावें म्हणजे आम्हीं पाच हजार बोलोन व पातशाहाहीं सुक्रगुजार होतील दुसरे वजिराच्या साहित्यास राजश्री मल्हारबा आले तर कदापि पातशाहा आगरियांस येत नाहीं अजमेरीस जाऊन तमाम राजे राणा राठोड हाडे कछवे यांस फर्मान पाठविले असेत सामील करून घेतील म्हणोन लिहिले ते कलले अैशांस पातशाहा, आगरियांस आले तर येतील मल्हारबा दूर अदेश आहेत ज्यात पातशाहाची व वजिराची रिजामंदी तेच ते करितील ते भलती उतावली उतावली करितील अैसे नाहीं दोन हजार फौज निजामनमुलकास न्यावयांस पाठवावी म्हणोन तर [नि. *] येथून फौज कसी पावते कमावीसदाराचे ताबिनाती फौज तो जमीदाराचे कजियात गिरिफदार आहे मल्हारबा जयापा साप्रत यख्तियारी करून हिंदुस्थानात ठेविले आहेत तुम्ही त्यासच लिहून जे पाठवितील ते फौज नेणें छ १९ रबिलाखर बहूत काये लिहिणे [ब.*] लेखन । सीमा

---

ले. ५३ } श्री { श. १६७२ फाल्गुन वद्य ६
रखर १९ } पो छ २२ जाखर { इ. १७५१ मार्च ७

राजाश्रिया विराजित राजमान्ये राजश्री बापूजी माहादेव गोसावी यासि

सेवक बाळाजी बाजीराव नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणें विशेष तुम्ही पत्र छ १३ रौवलच पाठविले ते छ१५रौलाखरी पावलें पातशाहाच वजीर आदिकरून उमदे आमीराचा मजकूर लिहिला तो कलला उत्तर अलाहिदा पुरवाणियात लिहिली असेत त्याजवरून कलेल तुम्ही तेथील वर्तमान वरचेवर लिहीत जाणें अमच येणे निजामदौलाचे बदल्याबदल भागानगर प्रांते जाले असे ईश्वर-

इच्छेकरून सैद महमदखां बाहादूर सलाबतजंग याचे अमचे सौरसच होईल वरकड नवलविशेषे लिहिजेसें नाही तुम्ही लाहूर व काबूल व इरान व बाजे जागाचें वर्तमान लिहीत जाणें जाणिजे [ नि.* ] छ १९ रबिलाखर बहूत काये लिहिणे

---

ले. ५४
जखर ६ } श्री { श. १६७३ वैशाख शुद्ध ८
इ. १७५१ एप्रिल २२

राजेश्रिया विराजित राजमान्ये राजेश्री बापूजी माहादेव गोसावी यासि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान......येथील कुशल जाणोन स्वकी........ विशेष तुम्ही पत्र छ २४ रालाखर........ छ २५ जाावली पावले पठाण व हि [दायेद मोहि ]दीखान यासि तंबी करावयाचा मनसुबा स्वामींनी करून पठाणनिति व हिदायेद मोहिदीखान यात कलह लाऊन पठाण व हिदायेद मोहिदीखान परसपरे मारविले फते अ................केली या गोस्टीचे भाटी व............पातशाहाच्या भाशणाचा............[नवा]ब बाहदुरांच्या बोलण्याचा............व दक्षेणच्या सुबदारीचा सिरपा...........फेरो [ज] गास दिल्ह व स्वामीस असफज्याप्रा दि[ल्ह] फर्मान वालाशानसहित इनायेत...........गाहून येऊन पोहचतील म्ह........ बहु लिहिले ते अक्षरशाहा........औशास पातशाहाची मर्जी.........त शाही काम करून दाखवावे........असफज्याचा आमचा वडिलापासून श्नेह चालत आला नवाब नासरजग यानी श्नेह चालविला त्यास दगा करून मारिले त्याचा तदरूक करावा म्हणौनच अम्हो कमर बाधली होती जुनी फौज होती त्याखेरीज नवी फौज ठेविली व राज्यातीलही तमाम सरदार जमा करून सामील करून भागानगराजवल पोहचलो तो पठाण व हिदायेद मोहिदीखान मारले गेले या गोस्टीचा मजकूर आम्ही तह खर्चाखाली आलो त्याची बूजकदरदानी नवाब निजामनमुळूक गाजुदीखान फेरोजंग बहादूर यानी करावी येविसी तुम्हास लिहिलेच आहे ती पत्रे पावली असतील त्याप्रो ते........उचित आसे फेरोजग बहादूर ............त येविशी लिहिले तर उतम...........[ फेरो ]जग त्याचे बधू दौलतीची कार ........ [ ब-]दोबस्त सलतनतचा करितात याच समयात फेराजगानी यावे...........आसेल तर येत आसतील आमचा त्याचा श्नेह त्यात दुसरा विचार तिलप्राये नाही.........दाह हजार पठाण सरदारानी मोड...............मान लिहिले क [ल*] ले पुढे वर्तमान लिहीत जाणे जाणिजे [नि.*] छ ६ जमादिलाखर बहूत काये लिहिणे

---

ले. ५५ } श्री { श. १६७३ वैशाख वद्य ७
जखर २० } पौ छ २६ जमादिलाखर { इ. १७५१ मे ६

श्रियासह चिरंजीव राजश्री दादा व नाना यासि बापूजी माहादेव अनेक आसीर्वाद उपरी येथील कुशल ता। छ २० माहे जाखर मु॥ इंद्रप्रस्थ जाणून स्वकुशल लिहिणें विशेष तुमचें पत्र बारवे तारखीचें आलें त्यानंतर राज्या लछमीनरायेणास नवाबांही बहूतसी तुमची तारीफ लिहिली होती त्यावरून पातशाहास अर्ज जाहाली पातशाहानी तुमची तारीफ बहूतसी केली त्यास नवाब वजिराचे सर्व प्रकारें यश घेतल्यावर थोडकें काम ठिवल्यास आणख्यानी यश घ्यावें हे सलाह नाही कां की पठाणाजवली च्यार हजार स्वार आठ हजार प्यादा त्यासही खायास नाही त्याहीमधें कमाऊवाल्यास कासीपूर रुद्रपूर दिधले म्हणून मात्र त्यासी परवाणा नवाबाचा गेला म्हणिजे तिकडून ते इकडून आपली फौज दबावास गेली म्हणिजे ते मारले पडतात आतां परस्परें पठाणच या गोष्टीचा विडा उचलितात मुरादाबादकरच मारू म्हणतात त्यासी मारतील यांत सदेह नाही त्यासी हें यश हातचें न द्यावें रोकडे निजामन मुल्काकडे दोन हजार स्वार मात्र पाठवावें हे चालतच आहेत तो तुम्हास यश येतें नवाब बहूत तुम्हासी राजी आहेत त्यासी राजी राखून पातशाहातची छडी आपल्या हातीं राहिल्यास विलायतवाले यांची कांच खु( टू ? )न जाते त्यासी सरदारांही निदानी वजिराजवळी छावणीही करावी यासी मुजाका नाही खंडेरायासी अथवा फौज ठेविलियासी फजिता आहे यापेक्षा न ठीवणें उतम आतां यहसान केलें तरी पुर्ते करावें नवाबाही राज्यास लिहून पातशाहांकडून तुम्हांस शिफारस करवावी यापेक्षा आणीख कोणतें मिळवणें यांतच आपल्याही म्हणिजे खाविंदाची उपयोगी गोष्ट असेत नुस्ती फौजच ठिवली तर जाट दुसरे तिसरेच जलील करतील त्याजवर उपकार केला तोच शत्रू होईल येसें संकष्टांत तेथें राहून गंगापलीकडे पाय पडला तो कायम करावा आणि वजिरास विकत घ्यावे [ नि.* ] बहूत काय लिहिणें हे असीर्वाद [ नि.* ] उभयता श्रीमंताचे शेवेशि भाईचा साष्टांग नमस्कार [ नि.* ] रा। त्रिंबकपंत यांसि नमस्कार रा। वेणाजीपंत बाळकृष्णजी यासी नमस्कार

---

ले. ५६ } श्रीशंकर { श. १६७३ ज्येष्ठ शुद्ध १५
पो रजब १४ } पो रजब १४ { इ. १७५१ मे २९

सो सा। नमस्कार विनंती राजे जुगल किशोरची अर्जी आली कीं सरदार पारही उतरत नाहींत व छावणीही करीत नाहींत हरकाऱ्याने लिहिले कीं काल रात्रीं सुभेदारानी राव दामोदरपंतास आपाकडे निश्चयास्तव पाठविले होतें राजा व नरसिंगदास तों नवतेतच घरीं होते दोन घटका आपासीं व राव दामोदरपंतासीं मसलत

जाली त्यानंतर गंगाधरपंतासीं मशवरत जाली गंगाधरपंत व राव दामोदरपंत बाहेर निघाल्यावर राव दामोदरपंत यानी अमरसिंगाहातीं सांगून पाठविलें कीं पारही उतरत नाहींत व छावणीही होत नाहीं याप्रकारे हरकाऱ्याने लिहिले नवाब पुसों लागले कीं तुम्हांस राव दामोदरपंती काय लिहिले आहे आम्हीं अर्ज केला की जें लिहिले होतें ते काल रात्रीं अर्ज केलाच आहे म्हणो लागले कीं जितकी मिनत करायाची व समाजत करायाची हद होती तितकी केली त्याहीवर जे जे तकलीफ त्यानी केल्या त्याही मकदुराप्रमाणे कबूल केल्या पठाणाचा मुलूक व निमे रोहिल्याचा देऊन सरदारांची छावणी करावी पठाणास व रोहिल्यास जडपेडीहून उखडून काढावें येतद्विषई पातशाहांचाही हुकूम आणविला येसेंही असतां छावणी नच करीत व पार न उतरत व सामखा जाऊंच म्हणतात तर म्यां कोठवर नां म्हणावे मुख्तार आहेत बरें कधीं कूच कधीं करितात त्यानी आपली छावणी कोठील नेमस्त केली व आम्हांस तजवीज छावणीची कोणे ठिकाणची सांगतात भेटीस व निरोप घ्यावयास ते येथें येतात कीं आम्हीं तेथें चलावें आमच्या दसखती खुर्दा राव दामोदरपंतांपासी अमानत आहेत त्यातर मजपासींच आहेत या गोष्टीचा जावसाल मजपासीं लिहून आणावा तशासारखे जें करणे तें जलद केले पो आम्हीं अर्ज केला कीं हजरतनी रावजीस पत्र येतद्विषई ल्याहावें ते मुनकेकरून लेहतील त्याजवरून नवाबानी स्वामीस पत्र लिहिले आहे वाचून सलाह आसली तर व कामात रसायन पड जैसें आसिले तर सरदारांस दाखऊन जावसाल करून पाठविला पो तेणेप्रमाणे नवाबास सांगू बहूत काय लिा कृपा केली पो हे विनंती

---

ले. ५७ सावान २५ | श्री पो छ २२ रमजान प्रयाग | श. १६७३ आषाढ वद्य ११ इ. १७५१ जुलै ८

श्रियासह चिरंजीव राजश्री नाना यासि बापूजी माहादेव अनेक आसीर्वाद उपरी येथील कुशल ताा छ २५ माहे साबान मुा इंद्रप्रस्थ जाणून......कुशल लिहिणें विशेष तुमचे पत्र ढलयताबरोबर आलें तें पावोन लिहिलें वर्तमान कळों आलें तेच दिवसीं चिरंजीव दादाची पत्रें आली अद्यापिवर रुकसती जाली नाहीं आठ चौं दिवसा सनद असनाद हस्तगत होऊन आलियां चालणार त्यास चालले असतील अथवा चालतील राा असृतराव पटण्याऊन आले वजिरापासून रुकसत होऊन सरदाराकडे येतात ते काय निमित्य येतात कोणता मनसबा नवा उत्पन्न केला व करूं इछितान हा भावार्थ कांहींच चिरंजीवानी न लिहिला तुम्हीं तपसीलवार लिहाल तेंव्हा कलेल माधोसिंगाकडे अकबराबाद जालियामुलें सरदार बहूत नाखूश जाले व होतात सरदाराकडे जालियां सर्वप्रकारें आपले व पातशाहाचे होऊन त्यांचे मर्जीनुरूप कर्तव्यार्थ करतील म्हणून वारंवार तुम्हीं लिहीत गेलेस त्यास नाना

आजीपर्यंत स्वामीकार्यें कसकसीं केली व करितों हे ईश्वर जाणत असेल यैसें असोन सरदार नाखुशीच मानतील तर सुखरूप मानोत यास उपाय काय करावा राजेधिराजची आजची सुबेदारी नाहीं कदीमीपासून त्यांचा विरसा त्यांजकडे करून घेतल्यास याणी किंनिमित्य वाईट मानावें त्याहीवर आधीं सर्वप्रकारें आम्हास सरदारांची राजीव करणे उचीत म्हणून तोडजोड करून याप्रो ठैराव केला व होतो ज्याप्रा ग्वालियरांत जाफरअलीखां होता व मुतसदगिरी आपली कुल अख्त्यारमदार आपला होता त्याप्रा माहाराजे माधोसिंगाचें नाम मात्र शहरांत तेथें दखल त्यांचा मुतसदगिरी आपली बाहेर कलेल त्या रीतीने अमल करारवाके करावा यैसे योजिले आहे तर तुम्ही सरदारांसीं चांगली पोख्तगी करून हुजुरांत लाख रुा भरिले आहेत मागाहून हसबुल हुकमही तयार करून पाठवितों तुम्ही कबुलात दो लाखा रुपयाची हुंडी सरदारापासून घेऊन अतित्वरने पाठवावी [ नि.* ] बहूत काय लिहिणें हे आसीर्वाद पा। छ ४ रमजान

---

ले. ५८ } रमजान २१ } श्री { श. १६७३ श्रावण वद्य ८ { इ. १७५१ आगस्ट २

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री दामोदर माहादेव गोसावी यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीयें लिहीत जाणे विशेष तुम्हीं पत्र छ ११ शाबानचे पाठविले ते छ १७ रमजानी प्रविष्ट जाहालें सरदाराची छावणी व्हावीं न व्हावीं हा संदेह वजीरुल ममालिक यांस होता त्यास सरदारानी वजिराचा खातरजमा केला वजिरानी छावणीचा खर्च दाहा लक्ष रुपये व पठाणाचा मुलूक सरदारास द्यावयाचा करार करून हजुरात लिहिले हजूरच्या सालजाबाकरिता इंतिजार होते त्यास सालजाब आला अतःपर सनदापत्रा करून देतील त्या घेऊन सरदाराकडे जाऊन सरदार मऊसंमसाबादेस छावणीस गेलें वजीर प्रयागच्या ताळुकियात आले पंनास साठ नाव बा। आहे आणि दोन अडीचसे नाव जमा करून मौजे करावलीचें घाटीं पूलबदी करणार पठाणराहिले कुमाऊच्या पाहाडात गेले होते फौजा पलीकडे जाऊन बंदोबस्त न केला याजकारिता फिरोन येऊन आपलाली स्थळे बळाविली गंगातीरास पठाणाच्या फौजा जमा होऊन राहिलें असेत करावलीचा पूल तयार जालियांवर वजीर पलीकडे उतरतील अगर फौज तोफखाना पाठऊन जमींदार दोही सुभाचे फितुरास मिळाले होते त्याचे पारपत्य करून पैकाटका घेऊन दोही सुभाचा बदोबस्त करितील बादज बरसात सरदार गंगापार जाऊन पठाण रोहिले यांचे पारपत्य करितील म्हणोन विस्तारे लिहिले ते कळलें अैशास सरदारानी छावणी केली नबाबानी कराराप्रो द्रव्य व मुलूक सनदा करून दिल्हाच असेल कमावीसदार मुलकाल गेलेच असावें त्यास मुलकाची आबादी होते

न होते कसें वजिराचा पुढें विचार कसा व पठाणरोहिले नवाब व सरदार गंगापार उतरल्यावर लडाईस नमूद होतील की पळून जातील त्याचा जोरा कसा आहे तो लिहिणे तुम्ही सरदाराजवळ सनदापत्रा घेऊन पोहचलियावर सरदारानी बंदोबस्ताचा विचार कसा केला तो लिहिणे पातशाहा सादातखानावर इलराज होऊन मीरबक्षी-गिरी फेरोजंग गाजुद्दीखानास दिल्हीं खानखाना बहादूर खिताब इंतिजामु[द्दौ]ला यांस देऊन अजमेरची सुबदारी व नारनोलची फौजदारी दिल्हीं अकबराबादची सुबदारी शाहाज्याद्यास मुकरर करून नियाबत माधोसिगास सागोन फर्मान व खिल-अत सिरोपाव हतीघोडा समशेर खोज्याबा पाठविली सा लाख रुपये दरसाल मुकरर केले ते द्याव , बख्तसिग व रामसिग यांची लडाई लागोन राहिलीच आहे म्हणोन लिा ते कलले या उपरीही दिलीकडील व लाहोर मुलतान इरा[न*] व तुरा[न*] व हिंदुस्तानचे राजेयाचे नवलविशेष वर्तमान आढलेल ते वरचेवर खरे तहकीक लिहीत जाणें [नि.*] छ २१ रमजान बहूत काये लिहिणें [ब.*] लेखन । सीमा

[पाठीवर*] पौ छ ३ जिल्काद

---

ले. ५९
पौ रमजान ५ व २२

श्री

इ.१६७३ श्रावण शुद्ध ७, वद्य ९
इ. १७५१ जुलै १८, आगस्ट ४

पौ छ ५ माहे रमजान पौ छ २२ रमजान प्रयाग

विनंति उपरी राजे बख्तसिंग यानी येकायेकीं जोधपुरासी जाऊन किल्यासिवाये वरकड वस्ती बाहेरील मारून लुटली व किल्यासी मोरचे जाऊन लाविले हे तों वर्तमान पहिलें सो लेखन करून पाठविलें असे त्याजवरून श्रुत जाहलें असेल सांप्रत वर्तमान श्रीजीचेथें वर्तमान ऐकिलें गेलें बलके लिहिलेंही आलें कीं जोधपूरचा किला हस्तगत करून कुल तोपखाना व खजाना व जवाहीर जे काहीं त्यांची जोडी त्या ठिकाणी होती ते सर्व कबजेंत अणिली व कुल जनाने महलावरी चौकी बसून बंदोबस्त केला द्वाही अपली फिरविली रामसिंगजीची माये अंत होती तिचे नमस्कारानिमित्य गेले तों तिजला हें वर्तमान ऐकून मूर्छा आली तदनंतर न कले काये अवस्था जाहली येवंच बख्तसिंगजीनी तर शर्त केली अतां तो तर बलकावला तेथील खजाना वगैरे कुली त्यासी भगवंते अनायासें दिधला मागती दोनी महिने वरशाकाल बसल्याठाई कायेक तद्बीर करून मजबूती न धरील अहेही साहेब तद्बीर यासिवाये अजमेरचा गडही अमरसिंग गौड याने घेतला रामसिंगजी कडील किलेदार याच्याने तग न धरवला गेला खाली करून निघोन गेला येणेमुलें अजमेरेंतही दखल बख्तसिंगजीचाच जाहलासा अहे हा भाई व वरकड रजपूत लोक कुली बख्तसिंगजीस येऊन भेटले अतां रामसिंगजी तीनी च्यारी हजार स्वारानिसीं कसबे मेरतियांत मुकामात करून राहिलें आहेत भक्षायाची निश्चिंतता असलियां

महिना पंधरा दिवस मजबुतीने राहिल्याने गुंजायेश अहे परंतु जर बख्तसिंगाने नीट रूख धरिलियां या तर भाडणात मारिला पडतो किंवा गुरेज करितो अ

२ पो छ २२ रमजान प्रयागी.

थवा दस्तगीर होतो याहून दुसरी गोष्ट ध्यानांत येत नाही इतकियावर भवितव्य न कळे परंतु येक मेरतियांचा मात्र तड यांजसमीप राहिला अहे राजश्री पुरोहित जगंनाथजी छोटपडद्यासी येऊन पावले आणि सहजरामाचे मारफतीने अर्ज करविला कीं विद्याधरजी व दिवान हरि गोविंद हे सकलही वाकिफ होते त्याप्रमाणे जरी वर्तणूक येथायोग्य करणे असेल तर तैसाच द्रीढ विचार करावा कीं मीं तेथवर येऊन भेटेन नाहीतर माझे आल्याचें फल काय त्याजवरून यानी विचार केला कीं बख्तसिंगजीसीं व अपणासी स्नेह त्याचा काबू या रीतीचा जाहला व कर्णीदान चारणही त्याजकडील पहिलेच येऊन बसला होता सातरदारी तोंवर जरूर होती कीं या गादीवरी न बसलों अतां जे मनसुब्याने त्यांचे स्नेहांत अंतर न पडे अणी टिकैताची म्हणजे जोधपूरकरासी अंबेरच्यासी पूर्वांपर जे रीत चालली आली त्यांतही शब्द न लागे तैसी तजवीज करावी म्हणून सिष्टाचारें उतर पाठविलें व दिवान मुरलीधरजीस व हरिहरजीस कन्हीरामासुधां सामोरें पाठवायाची ठहराविली कीं येथें आल्यानंतर जे तदबीर करायाची ते केली जाईल त्यासी पाहावें पुरोहितजी आल्यानंतर काये तजवीज ठहरते बापूसाहेब श्रीजीस मोठें धर्मसंकट येऊन प्राप्त जाहलें अहे जर कदांनचित रामासिंगजीसीं व बख्तसिंगासीं युध्यप्रसंग होऊन त्याचा जये जाहलियां मग तमामी मारवाडेंत बख्तसिंगच जाहला विना खोडाली केल्यावाचून केव्हां राहाणार जर पळून परभारें सरदारांसमीप गेला तरी फटकाळ जर येथें आला तर पक्ष न केलियां गत नाही या गोष्टीस वि

३ पो छ २२ रमजान प्रयागी

ना फैज व विना द्रव्य व विना पुस्तपंनाह कसी हिंमत धरवते व लौकीकही कसा रक्षिला जातो व ज्याच्या कबजेंत राज्यस्थान येऊन चुकले तोही येकायेकी कसा सोडितो जर बादशाहजीकडील प्रसंग म्हणावा तर पूजनीक दैवतांतुल्य अहेत जो विजयी होऊन उभा राहील त्याजवर पुष्पवृष्टि करायासी सिध होतील बरकड खानदानीवर अथवा टिकैतावर काहीं मदनजर अजीकालच्यांची जे अहे ते सर्वत्रासीं ठाउकी अहे मगर राणाजीचा भरवसा मोठा होता कीं ये समई जर रामसिंगजीचे येणे मजसमीप अथवा त्यांजसमीप घडतें तर ते अपल्याकडून लक्षावधि खर्चून चाल घेऊन मधे पडून जसे बनतें तैसें बाजी सर नेली जाती अतां राणाजीही नवे वे सर्व प्रसंग नूतन दिलीकडील रजावंदी रखून दक्षण्यासी साधना करून स्वस्थलाची मजबुती करून सर्वासी सरबसर राहावें साजसामान येथायुत्क केल्याखेरीज निव्हा नाही या सर्वांसी द्रव्य

मूळ त्यासी जो काहीं खजाना अहे तो कललाच मगर दंडद्रोह तर खातरखाह जेव्हां म्हटलें तेव्हा कसे हस्तगत होते माणूस बिघडे व स्वकार्ये साधे तरीं येक कार्ये तेही न होये व माणूसही जायां होये तरी लौकीक खोटा तर यासी प्रस्तुत तीन तजविजा दिसोन येतात येक तर जगंनाथ पुरोहितासीं गोष्टमार्तेत लाऊन ठेविलें इतकियांत ते उभयेता

४

भिडून चुकले म्हणजे निवाडाच करून चुकलासा जाहला कदांनचित रामसिंगजी येथें अले तर सामोरें जाऊन घेऊन यावें येथें ठेऊन त्यांजकडील मातबर व अपला मातबर मिळून दिलीस पाठवावा यासिवाये सरदारांकडें पाठवावें तोंवर अपले ठिकाणी मजबुती करावी जिकडील साहिता मजबून अडलेल त्यासी जाऊन उभयेतांही भेटावें व पाठीवर घ्यावे जरी कदांनचित दिलीवाले सर्वांही गोष्टीने भक्षभोज्याची व देशाची निश्चिंतता करून देतील तर त्यांस पुस्तगर्मीवर घेऊन चाल घ्यावी यांत तर लौकिक सर्वोपरच संपादिलासा होतो त्यासी वेतर दिलीच्यांत हिमत कैचीं अस्तु मानाची अक्षे [दा*] द्यायासी न चुकावें इतकियांवर त्यांच्यानेही काहीं न होये व न अमीरुल उमरा याच्याने हिमत बांधवे तर सेवटीं नीट सरदारांकडें चाल घ्यावी त्यांही वजिराची वजिरात थाटलीच थाटली व रोहिल्यासी पादाक्रांत केलेंच केलें तथापि रोहिल्याने बल धरिलें तरी उतम सरदारांचे शामील होऊन आ– जाहालियां करून द्यावी नाहीं तर सर्वांही मिळून पराजये पावावें जसे बनेल तैसें वजिराची व सरदारांची रजावंदी साधून तमाम फौजेस हमगीर करून अजमेरेस घेऊन यावे इतकियांत जो कोणी शामील न होईल त्यासी पादाक्रांत करून पुढें जोधपूरचा बंदोबस्तासी प्रवर्तावें वजीरजीही व सरदारांही अजमेरेंत

५

बसले असावें राणाजी वगैरे कसें तमाशा पाहतात व कोण कसा येत नाही हेही सर्व मनासी आणावें ऐसीही धून दिसोन येते त्यासी जर अमीरुल उमरावजी हे सर्वही मरातब द्रिष्टीस अणून बादशाहजीस पल्यावर अणून पुस्तगर्मी विचारून अपल्या भाऊचंदासी नरमदेपावेतों अणून श्रीमंत [मो. जा.*] स्वामीही हे राज्य स्थापून इकडील थाट त्यांजकडील बंधिला गेला हे तजवजि करितात किंवा ज्याचें तो जाणून घेईल म्हणून मसनदचे बुटे होऊन राहतात हे सर्व ध्यानांत अणून सेवटीं सरदारांकडें तरी अपल्या विरहीत अनुसधान न लागे ऐसी तजवीज करावी बलके हेंच पत्र सलाह दौलत असिलियां श्रीमंत दादासाहेबाकडें पाठऊन तिकडीलही अनुसधान अणावें तोवर येथीलही रसरंग सर्व कलतो तश्यासारिखे केलें जाईल जगू पुरोहिताचे सामोरें सहजराम व दिवान मुरलीधरजी दोनी कोस जाऊन घेऊन अले श्रीजीहीं सेरदरबार करून भेटी घेतली व राजा रामसिंगजीकडील टिका येक हाथी व दोनी घोडीं व

येक रकम जवाहीर व चारी तोरे पर्खे पुरोहितजींनी गुजराणिली तदनंतर श्रीजी स्वार होऊन बाहेर सैरेस गेले व पुरोहितजी श्रीगोविंददेवजीचे दर्शण संपादून मागती खोटपड्याचे डेन्यासी गेले करणीदान चारण बख्तसिंगाकडील निराला प्रथमेपासून येऊन बसला अहे अजी तर प्रथम भेटी पुरोहितजीची जाहली अता जे काहीं तदवीर होऊन येईल ते मेवेसी लिहिली जाईल बख्तसिंगजींनी जोधपूरच्या गादीवर सुमुहूर्तेकडून बसून जे कोणी रजपूत मातबर होते त्या सर्वाकडून टिकाही करून घेतला दुसरी गोष्ट हे कीं कदाचित

६

रामसिंगजी येथें अले त्याजमार्गे नीट त्याने चाल घेतली कीं काहडून देणे तरीं कठीण जरी स्थल सोडून सुभेदारजीकडें जावें अथवा अन्यत्र स्थलीं हरकत करावी तरीं जागा खाली पडते यास्तव मजबुतीने अपल्या स्थलींच प्रस्तुत राहणे उत्तम जर कूच करून सरदारांकडेंही जावें तरीं जागा खाली होते यास्तव तूर्त तर त्यांजकडीलही सरदारांसमीप वकील राहतो दोनी महिने वरशाकालाचे त्यांचेही फिरणें दुस्तर रोहिल्यासी व पठाणासीं कसा सलूक बनतो तिकडील मोहीम टाकून कसें फिरवतें जरी तिकडील फैसलात जाहली तर अनायासें सहस्त्र कामे टाकून रामसिंगजींची मदत करितीलच करितील व जर तिकडेंच गुंता जाहलियां येकायेकीं कसें त्याच्याने उठवतें त्यासी सेवटीं उभये पक्षीचे मातबर पाठऊन जबाबसवाल मात्र तोलीत जावा व अपल्या ठाईं मजबुती करावी मग जसा प्रसंग बनेल तसें करावें राणाजीकडेंही मातबर पाठऊन त्यांचेही मानस घ्यावें जरी राणाजी व हाडे व कछवाये यां सकलांची तजवीज येक ठहरिली अणि दक्षण्यांचा तिकडें गुंता जाहला तरी हे गोष्ट येखादा अमीरुल उमरावासारिखा तोरा काहडून हिमत धरिलियानेही मोहीम सर होऊं सकते पुरोहितजी यांसी लागू अहेत कीं दाहा हजार फौज अम्हाबराबर द्या त्याचा रोजीना मुकरर जाहल्यासारिखी खर्चीही येकादो महिनियाची अगोधर दिधली जाईल त्यासी पाहावें काये घडोन येतें सारांश बखेडा वरशा दों वरशाचा येऊन बाजसाला अहे सरदारांचे भाग्यासी जोडा नाही रोहिल्याचा कजिया फैसल जाहला म्हणजे हेही येका करोडीची मोहीम दरपेश जाहलीसी अहे इताकियावर भगवतइछा कलत नाही

---

| ले. ६० आश्विन वद्य ३ जिल्काद १६ गुरु | श्रीशंकर पौ छ २१ जिल्काद | श. १६७३ आश्विन वद्य ३ इ. १७५१ सप्टेंबर २६ |
|---|---|---|

श्रियासह चिरंजीव राजश्री राव पुरुशोतमजी यांसी दामोदर माहादेव कृतानेक आसीरवाद उपरी येथील कुशळ ता। छ १६ जिल्काद आश्विन वद्य ३ गुरुवार मुकाम माणिकपुराहून पुढें प्रतापगडच्या मार्गावर पांच कोस जाणून स्वक्षेम लिहिणे विशेष

तुम्हांकडील बहूत दिवस पत्र आलें नाहीं याकरितां पत्रागमनी चित सादर होतें तों छ ४ माहे मजकरचें पत्र छ १३ मिनहूस पावलें वर्तमान सविस्तर अवगत होऊन बहूत समाधान जाहालें इतके दिवस किंनिमित्य पत्र येत नाहीं या चिंतेत होतों आतां कळलें कीं च्यार दिवस मिजाज दुरुस्त नव्हती अतःपर मागील पत्रांचे जाबसाल सरदारांस विचारून सर्व उगऊन लिहालच श्रीमंती कोण्ही येक मूल राज्याचे वौंशीचे जाणून ठीवलें होतें ते ताराऊपासीं वलखायास पाठविले तिणे येक डाव कपाळावर व दोन दोन्हीं जांघावर देऊन काढून दिधलें हे वर्तमान नवाब वजीराकडेही आलें होतें आतां तुमच्या लिहिल्यावरून ठीक कळलें श्रीमतानी सर्वत्रांसीं विरोध संपादिला मकारपूर्वकांचे समजाविसीस गेले होते त्यांचा त्यांचा जाबसाल जाला तो विस्तारें लिहिला सर्व ध्यानास आला येसियास श्रीमंत स्वामी थोर प्राक्तनवान जें कार्य करतील ते ईश्वर सुधरणार आहे मकारपूर्वक व ते येकच आहेत उभयथांचा रिणानबंद जन्मांतरीचा आहे तो आजपर्यंत उतमच चालला म्हणूनच सर्व बंदोबस्त राहिला आतांही ईश्वर तसाच रिणानबंध चालवो म्हणजे नित्यानी बंदोबस्त विशेषच होत जाईल सलाबतजंग फौज नवी मऱ्हाट्याकडून ठीववितात श्रीमंतासीं मुलकाचे वसुलाचा जाबसाल लाविला आहे याकरतां यांस त्यांचे पारपत्याची तदबीर पडली आहे म्हणून लिहिलें ते कळले श्रीमंत स्वामीचीं पत्रें आ कारणविषई अंतस्ते सरदारांस आलीं आहेत अंतरवेदीच्या पायेबंदाकरतां जावत नाहीं गोविंदराव सखाजी गंवारांचे हंगाम्याकरतां फिरून आले रो बालाजीपंतीं चाळीस हजार रुा पाठविले होते ते गवारांनीं मार्गी लुटिले राजश्री सुभेदार खुद गढीवर गेले ते फते करून आले म्हणून तपसिलें लेहले तें कलले काय चिंता आहे गोविंदरायाचाही सूड घेतील रुाही ज्यानी लुटिले असतील त्यांस ठिकाणीं लाऊन दुचंद घेऊन शासनही करतील हा भरवसा आहे करतीलच करतीलच फते अलीस काढून दिधले बहादूर

२ छ २१ जिलकाद

सिंगास कायम केलें कांहीं रुाही तीन च्यार लक्ष बहादूरसिंगानें कबूल केले व बहादुरसिंगापासून लिहून घेतलें म्हणून बहुधा हरकाऱ्यानी वर्तमान लिहिले होतें त्याजवरून नवाब बहूत श्रमी जाले व श्रमीच आहेत म्हणत होते कीं म्यां सर्वप्रकारें हामी भरून पातशाहकडून यांस अंतरवेदीत कायम केलें असतां यानी खालसाच बुडविला जेंव्हां बहादुरसिंगापासून च्यार लक्ष रुा यानी नजर घेतली तेंव्हां तो खालशांत काय देणार तें हा ते पैसे मजला देणे लागतील म्यां यांजपासी मुजरा मागावे तेंव्हां यानी मसीं बिगडावे लोकांचे हासे व्हावें यांजपेक्षा उतम हेंच आहे कीं मी आतांच सर्व सोडून देतों यानी सर्व अमल करून घ्यावा फेरोजाबाद वगैरे याप्रकारें खराबी केली कोल वगैरेची ते गती सिकंदरा अनूपशहराकडे मऱ्हाट्यांचे स्वार जातात येवंच खालसा या प्रकारें गेला वाराणसीची सनद जे दिवसीं देईन ते दिवसीं या प्रांतातही धूमधाम होईल जसा खालसा बुडविला तसा हाही मुलूक बुडल येत•

द्विपई फर्मानही आला तो आम्ही आपल्या डोळां पाहिला शान रद केल्या आहे येवंच या गोष्टीकरतां परम श्रमी आहेत रो। उभयथा नम्बुर कांही सालशाचा उपद्रव कम करून चास समाधान पूर्वक लिहीत व पुढें सालशाम उपद्रव न देत तर उत्तम आहे याजवर ते जें करतील तें सर्व गुजरायचे वर्तमान लिहिले ते सर्व कळले ईश्वर काम संपारणार आहे इकडील वर्तमान तर यांच्या दोन्ही सुभ्यांतही बंदोबस्त नाहीं मोइ-जुद्दीन्नो रामनारायण प्रतापनारायण आलाकुलीला इसमाईलला फौजेमुळे फिरत असतां गवार गवारपण करितच आहेत पैका येत नाहीं याकरतां नवाबानीं छ १५ जिल्कादी बुधवारीं माणिकपुराजवळून कूच पांचा कोसाचा केला प्रतापगडावरून आजमगडाकडे जाणार आमचा भोग अद्याप सरत नाहीं छावणीचा पैका व श्रींची सनद देऊन मार्गस्थ करीना नुस्तेहीं निरोप देईना न पुसत उठून यावें हे तर उत्तम नाहीं सरदारांस आम्हांवांचून कांहीं काम खोलंबले नाहीं कीं त्यानी दबाऊन लिहून चोलवावें वरें जेव्हां भोग सरेल तेव्हां निघणे होईल नाहीं तर याजमार्गे फिरतच आहों रिणानबंध प्रमाण श्रीकृपेने जे समई जे होणार ते होईल अम्ही आपले तरफेने कमी करीत नाही बहुत काये लिहिणे हे आसीर्वाद

---

| | | |
|---|---|---|
| ले. ६१<br>पो जिल्हेज ६ | श्री<br>पो छ ६ जिाज | श. १६७३ कार्तिक शुद्ध ७<br>इ. १७५१ आक्टोबर १५ |

नवाबानी सत्वर इकडे यावे राजश्री सुभेदार ताकीद करीत होते की कार्यांचे दिवस जातात आम्हास दक्षणचा वोढा अहे— अजुर्दा जे करणे ते सत्वर करावे म्हणून आपण प्रतापगडाकडे चालले तरी काये म्हणावे येक करावे येक येसे न करिता सत्वर इकडे यावे पूल जोवर तुम्ही याल तोवर तयार होईल तुमच्याने जितका सरनजाम पोहचाविला जाये तितका सत्वर पोहचावणे जे काम केले जाये पठाणास रोहिले काढून देत व पनास लाख रुा कंबेश देईल तर सळूस होईल नाहीतर पार उतरतो मारून घेतो फिकीर काये अहे मुख्य नवाबानी पारचे सुमारे सत्वर यावे म्हणिजे जे करणे ते नवाबाचे अमचे विचारे सत्वर होईल यामा नावाचा सरजाम अ [ नवा* ] नवाबही — सत्वर येत ते गोस्ट करावी नवाबाही पारपारचयांचे पुलाचे सुमारे यावे हे सागून सत्वर इकडे कूच करणे म्हणून सुभेदाराही स्पस्ट सांगितले अहे की समय गेल्यास खाविंदाचा आम्हास बोल लागेल ते न करणे दिरंग लागल्यास अम्हावर शब्द नाही यामा जलद लिहून पाठवाल म्हणून तातडीने सर्व जाब मागून लिहू लिहिले अहे भेट होईल तो सुदीन कृपा केली पाहिजे हे विनती

---

| | | |
|---|---|---|
| लें. ६२<br>पो. जिल्हेज २० | श्री<br>पो छ २० जिाज | श. १६७३ कार्तिक वद्य ७<br>इ. १७५१ आक्टोबर २९ |

व सरदाराकडून बोलवा व ते लिहावे व वजीरजीस कदांचित हा गरूर असेल की येकदां सरदाराकडून पठाणास मारविले तैसे फिरूनही मारवावे तर गरूर राहणार राहणार नाही हे ध्यानात असू देणे पठाण तो साफ याच पल्यावर अहेत की वजिरासी कदापि न भेटावे व सरदारासी दारमदार करून भेटावे न भेटेल तर रोहिल्यास मिळून झुंजावे परतु वजिरास कदापि न भेटावें हा इत्यर्थ त्यानी करून वकिलास येथे पाठविले सरदाराचेही चितात अहे की अगोधर हेच गोस्ट कबूल करून त्यासी सळूख करावा मग वजिरासही धमकाऊन ठिवावे व पठाणासही त्याप्रोच ठिऊन देशास जावे त्यास हेच गोस्ट करवणे अहे तर अम्हासी हर येक मुकदमा चोरीत जाणे अम्ही विना खेरसलाही दुसरी गोस्ट करणार नाही मुख्ये रोकडे जाबसाल लागले अहेत निदर्शणास येईल ते खरे बहूत काये लिहिणे हे विनती

---

| | | |
|---|---|---|
| ले. ६३<br>मोहरम ६ | श्रीमोरया<br>पो. छ ७ मोरम | श. १६७३ मार्गशीर्ष शुद्ध ७<br>इ. १७५१ नोव्हेंबर १४ |

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री दामोदरपंत स्वामींचें सेवेसीं

सेवक गंगाधर येशवंत सां नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष तुम्ही पत्र पाठविले पावोन वृत्तांत कळू आला बिठूरच्या मुकामी वजिराच्या लस्करास सामील जाळो पुढे येत होतों परतु येऊ न देत सत्वरच येऊन पोहचतो म्हणून लिहिले उतम आहे इकडील वृत रोहिले येकत्र होऊन रामगंगेस पूळ बांधोन आपल्या पुळापावेतो आळे त्यासि पुळापासी अळे त्याच्या दुसरे दिवसी पठाणांसी लढाई जाली पठाण – रोहिलें मोडून माघारा घातलें जरब ते दिवसी उतम त्यासि बसली रसद त्याजळा न पावली रुपयासि सेर न मिळे येसे त्याच्या लस्करांत जाले तेव्हा दुसरे दिवसी कूच करून माघारा चालिला जागा जागा मार ढासणें धरून दिव्हा दीड कोंस भा(भो)वे संध्याकालपावेतो जात होता संध्याकाली रामगंगेस जाऊन राहिला पठाण थंडा उतम प्रकारें केळा बाहेर निघोंन यावे हा होश त्यांत राहिला नाही काल, छ ५ मोहरमी कूच करून दहशत मनात आणून रामगंगेपार जाऊन राहिला आहे श्रीकृपेकरून पारपत्ये उतम त्याचे होईळ [ नि.* ] तुम्ही नवबास सत्वर घेऊन यावे वरचेवरी वर्तमान लिहित असिलें पाहिजे बहूत काये लिहिणे हे विनंती

---

ले. ६४ पौ मोहरम ११ | श्री पाो छ ११ मोहरम | श. १६७३ मार्गशीर्ष शुद्ध १२ इ. १७५१ नोव्हेंबर १९

विनंती उपरी छ ७ मोहरमी संध्याकाली राो गंगाधरपंत व सेट्याजी सरारे व संताजी वाघले पार पुलापासी आले इकडून राो सुभेदार व राजश्री रामाजीपंत भाऊ व पुरुशोतमपंत मुनशी येसी सर्व मंडळी येकत्र जाली तात्या वगैर पारून जे ग्रहस्त आले होते त्यानी पठाणरोहिल्याकडील संदर्भाची गोष्ट सांगितली की पठाणरोहिल्यात कांही आवस्ता रा[हिली] नाही बहूत घिघावले आहेत व आजिजी करून पायां पडतात तामस्रा कोण्ही पाय येऊन धरील त्याचा वधच करावा हेही विहीत मार्ग नाही याहीवर जसी आम्हास आज्ञा कराल त्याप्रमाणे करू म्हणाल तर पार उतरून जाऊ जसे बनेल तसे त्याजला तेथूनही सिदेहून देऊ सुभेदारानी येकून उतर दिधले कीं तुमचे श्रमाचे सार्थक इतकेच की वजीरही जवल येऊन पावला आतां थोडक्या-साठीं जलदी काशास करावी त्याजलाही येऊ द्यावे त्याचे चितांत काय गोष्ट आहे व तो कोणती वाट सागतो हेही विचारूं तामसा त्याची हेच मर्जी असली कीं पठाण-रोहिल्यास नेस्तनाबूद करावे मग च्यार गोष्टी ज्या उमजून सांगायाच्या त्या त्याजला सागू परंतु वजीर आल्यासरीज आम्ही हरगीज सलुकाची गोष्टी बोलत नाही इतक्या गोष्टी होऊन सर्व आपलाले ठिकाणास गेले राो आपा व तात्यानी विचारिले की सुभेदार तो काणेही प्रकारे वळत नाहीत त्यास त्याजला सलुकाचाही आग्रह होये येसी तजवीज केली पाहिजे तेव्हा सर्व पारचे मंडळीने मनसुबा करून लंगड्यास सांगून पाठविले कीं सुभेदार तो कोणेही प्रकारे वळत नाहीत त्यास येक तजवीज आहे कोण [अपूर्ण*]

---

ले. ६५ पौ मोहरम ११ | श्री पाो छ ११ मोहरम | श. १६७३ मार्गशीर्ष शुद्ध १२ इ. १७५१ नोव्हेंबर १९

विनंती उपरी रूपराम मोहनसिंग पार काल जाऊन आपा व तात्यास भेटून दोनच्यार घटका खिलवत करून सध्याकाली आले त्यानी आगोधर संताजी सेट्या-जीचे विद्यमाने आगोधर पैका दिधलाच होता सांप्रतही मागील झाडबाकी परभारेच द्यावी येसी यांची तजवीज दिसते कुवरजीस मागेच सरदारांनी आ कारणीविशई पत्र पाठविली होती त्यानी उतर लिहिले की माझी फौज येमुनापार होत जाते मीही लवकरीच येतो खुद कुवरजी डिगेंत आहेत त्याची काहीक फौज येमुना उतरून माहा-घनाकडे आली आहे म्हणून वर्तमान आहे कुवरजीचे पत्र रूपराम मोहनसिंगानी आपले नावचे दिधले ते व राजश्री गोविंद तमाजीचे पत्र सेवेसी पाठविली आसेत हे विनंती

ले. ६६
मोहरम २४ } श्री { श. १६७३ मार्गशीर्ष वद्य ११
इ. १७५१ डिसेंबर २

राजश्री दामोदरपंत गोसावी यांसी

अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य [ मो. जा.* ] श्री जयाजी सिंदे दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिा विशेष तुम्ही कासिदासमागमे पत्र पाठविले ते वाटेत नदीमधे झोलणा कासिदाचा वाहून गेला त्यात कागद गेले कासीद आम्हापासी पोहचला येथील वर्तमान तर छ २४ मोहरमी सोमवारी कासीपूर मागे टाकून पुढे दोन कोस आलो येथून पठाणरोहिले दोनतीन कोस आहेत पुढे काही फौज पाठविली आहे उदईक त्याची आमची गाठ पडेल पुढे जे वर्तमान होईल ते लेहून पाठऊ जाणिजे रा छ २४ मोहरम बहूत [ नि*] काये लिहिणे हे विनंती [ ब.* ] श्री । मोर्तब । सुद

[ पाठीमागें डाव्या हाताच्या कोपऱ्यांत * ]। श्रीजोति । लिंगचरणि त । मर राणोजिसुत । जयाजि सिंदे । निरंतर [ असा व. शि.* ] पो छ २७ मोहरम

---

ले. ६७
सफर २५ } श्री { श. १६७३ पौष वद्य १२
इ. १७५२ जानेवारी २

पुरवणी राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसि

उपरी पहिले तुम्हीं लिहीत गेलेस कीं नवाब फेरोजंग निजामन मुल्क व नवाब बहादूर सर्व प्रकारे आपल्या पल्यावर आहेत दक्षणचे कामकाजास सर्वस्व स्वामीस मुत्गा(रुता)र जाणतात पातशाहाही स्वामीचा स्तव वारंवार करितात म्हणोन कितेक गोष्टी लिहीत गेला व नवाब सलाबतजंग याचे विरुध फेरोजग मानितात व नवाब बहादूरही मानितात म्हणोन लिहिली येत गली त्याचे निदर्शन मनास आणिंता तुम्हीं लिहीत गेला त्या गोष्टी किमपि नाहींत हुजुरांत सलाबतजगाचे मुखी नवाब बहादूर आहेत व फेरोजेंगही बालाइश करितात तुमच्या लिहिल्यावरून फेरोजगाची ममता चितात आणून लिहिल्या पढल्यात लिहिले तुम्हींही लिहीत गेला ते विरु[ द्ध* ] सलाबत-जेगानी चितात आणिले सलाबतजेगाजवल कुल येख्तियारी राजश्री रामदासपंत आहेत आम्हांसी तो गोड गोष्टी बोलत गेले स्नेहच दर्शविला आणि मातबर तीस च्यालीस हजार फौज व तोफखाना जिनसी तयार केला कीं कर्नाटकात फौज बुडाली त्या येवजी फौज ठेविली असेच लौकिकात आणून येक येके औरंगाबादेतून कूच करून पारनेरचा घाट चढलें आम्हींही पुढे गेलो त्या दिवसात आम्हाजवळ फौज थोडी जथली नव्हती सलाबतजंग नीट कोरेगाव भीमातीरपर्यंत आले आमचीही फौज जथली व हुजरातची फौज राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा व राजश्री फतेसिंगबाबाची फौज व राजश्री निंबाजी नाईक सारलष्कर वगैरे लाहान मोठे सर-

धूर येऊन सामील जाले पंनास साठ हजार फौज जमली आहे औरंगाबादचाच मुकामी सलाबतजंगाचे फौजेस बंद करून दर रुपयास दोन सेर दाणे जाले होते पुढे निभाव नाहीसा देखोन भागिरथीचे पाण्याशी येक वाजेस पाणी देऊन येडगावास आले तेथून पोहनदी हा मा[र्ग] नदी धरून नगरास जातात मराठ्यांच्या फौजा चोगिर्द, त्यापैकी राहील्या आहे शत्रू ... अर्जीम करून थोडक दिवसात बुडविले जातील अगर सल्ला करीतील तर तकुसही केला जाईल जाणिजे छ २५ सफर [च.] लेखन । सीमा

---

ले. ६८ ) श्री ( श. १६७३ माघ शुद्ध १
सफर २९ ) ( इ. १७५२ जानेवारी ६

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री दामोदर माहादेव गो।

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करणे विशेष पत्र पाठविले ते पावले नवाब वजीर याचा निरोप घेऊन श्रीस जाऊन मागती नवाबाची व नरवरगची समीप्ता जाहाली तेथे गेलियाने पठाणाचे लढाईचे वर्तमान सविस्तर लिहिले ते कळले यामागोन पत्रे आली त्याची उतरे पाठविली आहेत व इकडील वर्तमान लिहिले असे मोगल नगरास आला सदा होऊ लागला आम्ही निंबदेव्हारियाचा घाट उतरून नगरचा येश धरिला त्याउपरी कुमारे तमाम शहरपर्यंत पोहचले लूट आणू आ लागले हे पाहोन मोगलाने राजश्री माहाराव जानोजी निंबालकर व राजश्री हणमंतराव निंबालकर यास बोलीचालीस पाठविले त्याणी पाच लाख रुपयाची जागीर द्यावयाचा करार करून छ २९ सफरी सला केला हे वर्तमान कळावे याजकरिता लिहिले असे याउपरी गुजरात कर्नाटक हिंदुस्थान याहीतून जो मनसुबा पडवणे तो पडविला जाईल जाणिजे छ २९ सफर [चं.] लेखन । सीमा पो छ १३ जासर

---

ले. ६९ ) श्री ( श. १६७३ माघ शुद्ध १५
रवल १२ ) ( इ. १७५२ जानेवारी १९

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री दामोदर माहादेव गो।

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहिणे विशेष नवाब असफज्याहा याचा आमचा येखलास चालत आला तो तुम्ही जाणतच आहा त्यामागे नवाब निजामुद्दौला नासरजंग याणी आम्हासी स्नेह येकरंग चालविला त्याचप्रमाणे नवाब सलाबतजंग यासी स्नेह चालवावा याचप्रकारे आमचा मद नजर होती नवाबाने आम्हाकडे [illegible]

जसवंत निबालकर पाठविले जाहिरा येखलासाची बायेस दाखऊन किनेक गरजगो लोकाने सागितले तेच चितात आणून फौज व तोफखाना व फिरंगी गाडदी जमा करून राहिले आम्ही तो माहारायाच्या येण्यामुले फरामोष असता येक बयेक नवाब बा-फौज आमचे मुलकात आले लाच्यार आम्हासही पुढे लडाईस उभे राहावे लागले त्याचे आघाडीस पशाडीस इकडील समशेर बाहादुरानी बज्यावली पाच सात हजार फौज बुडविली त्याजकडील जे हमनसीन होते त्याच्या नजरा खुलल्यावर तेही गार होऊन गोलातून बाहेर पडू सकले नाहीं त्याउपरी आमची फौज व राज्यातील फौजा जमा जाहाल्या चौगिर्द नवाबाचे फौजेस लागोन रुपयास सेर अन्न मिलेनासे जाहाले अटा बंद केला तेंव्हा पुढील कस्त सोडून माघारे गंगातीरास आले आम्हींही चौगिर्द फौजा लाविल्या आहेत ईश्वररूपेकडून घडेल ते लिहिले जाईल नवाब बाहादुरासी आम्हासी फारसी उमेद असता त्याही जमान्याचे गर्दिसीने दुसरेकडे चितापासून येखलास केला यास्तव त्यास पत्र पाठविले आहे ते त्यास देणे व नवाब फेरोजंग यासही पत्र पाठविले आहे तेही त्यास बापूजी माहादेव देतील तुम्हीही बापूस लिहिणे बरंकड सरदारानी पातशाही कामावरी कोणकोण तऱ्हेने हिमत करून कोसीस केली पातशाही नक्ष केला तो वजीर अजमाही पाटि(हि)लाच आहे येविसी वजिरासही पत्र पाठविले आहे त्यास पावते करणे जाणिजे छ १२ रबअवल [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

---

| | | |
|---|---|---|
| ले. ७०<br>रवल १६ | श्री<br>पो छ २० रावल | श. १६७३ माघ वद्य ४<br>इ. १७५२ जानेवारी २३ |

चिरंजीव राजश्री दादा व नाना यासि बापूजी माहादेव अनेक आसीर्वाद उपरी येथील कुशल ता। छ १६ माहे रोवल मुा। इंद्रप्रस्थ जाणून स्वकीये लिहिणें विशेष नवाब अमीरुल उमराव निजामन मुल्क बाहादूर याची पत्रें सरदाराचे व तुमचे नांवे पाठविले अहे ते पावोन सविस्तर कळो येईल दक्षेणेकडील खबर मिर्ष्याचे घरी अली ते वजिनस तुम्हाजवल पाठविली असे त्याजवरून कलेल श्रीरुपेकरून पेत्र पळाला तो खरा मागून जे वर्तमान येईल ते लिहून पाठऊ [ नि.* ] बहूत काय लिहिणे हे असीर्वाद [ नि.* ] रा। त्रिंबकपंत यांसी नमस्कार

---

| | | |
|---|---|---|
| ले. ७१<br>पो रसर २ | पो छ २ रासार | श. १६७३ फाल्गुन शुद्ध ३<br>इ. १७५२ फेब्रुवारी ७ |

लागलेच रुखसत होणें येविशीं शुकाही लिहिल्या गेला असे लोकरीन येनो तुम्ही आपल्या पुत्रास व दामोदरपंतास पाठऊन अतावत देणें न येकतील तर मी निरोप तुम्हास मुलाजमतीस बोलावीन हे लिहिलें असे त्यास याचा अदब ठेवितील ते करणें

तुम्ही सुभेदारांजवळी सत्वर येणें रा। सवाई माधोसिंग यासी आफरीतहसींचा शुका लिहविला असे तयार होऊन आलियावर पाठऊन देऊं तेथील कामही हाताखालें घालावें आणि जोसोही न यावी आणि हजुरांत माहाराजे यांचा आणायाचा विचार करायाचा तो करावा लागतो निजामनमुलकांही सायत पाहिली दोचो दिवसां च्यारबागास येतील हे जाणतात दामोदरपंत आले आम्हास दक्षणेस घेऊन जातील माहाराजे माधोसिंग म्हणतात हजूर नेऊन मुलाजमत करवितील सफदरजंग जाणतात सळूख करवितील पातशाहा नवाब बहादूर हरकोणास पुसतात अमित्रास दुख होतें त्यासी पहिले वजिराचा पठाणाचा सळूख सुभेदारांही केला हा तुका मारून निजामुनमुलकास पेश्वा यावें सुभेदारांही मुकाम तुम्हाकरितां इत्के केलें हे पातशाहा आदिकरून सर्वांस कळलें त्यामा। हे काम आहे जर रंग न पाहाल तरीं चितास येईल ते सुभेदार करोत सफदरजंगही करोत येथें निजामनमुलकास पेश्वा यावें येथें आलियावर सलह असलियां आम्हास याबरोबर पाठवावें अथवा कर्तव्यार्थ तो करावा त्यासी तुम्ही सुभेदारांजवळी आलियावर त्यांचे विचारें ठेरल त्यामा। तुम्ही कराल त्यासीं निजामनमुळूक च्यातकन्यायें मार्गप्रतीक्षा करीत होता तुम्ही जेपुरास आलियाची खबर येकतांच याणीं कुचाची तयारी केली उमदेजादे साठ अमीरजादे उठविले आहेत पातशाहानी म्हटलें जे निजामनमुलक तुजकरितां मजला आराम होतों आतां मजला फिक्र करणें पडली निजामनमुलकांही उतर दिधलें जे नवाबसाहेब हजरत फिरदोस आरामगाहासी किचले यात विरोध पडला याकरितां हिंदुस्थानचें काम अबतर जालें मीं दक्षणेंत बसून हिंदुस्थानचें काम करीन सा महिन्यानी अवघ्या फौजेसी व बाळाजीरायासी घेऊन हजूर येईन यावरून बहूत आफरीतहसीं करितात यासी आपले प्राण जाणतात इंतजामुद्दौलास इलाहाबादचा सुभा देऊन व पंज हजार मोगलिये सिरहंद देऊन बराबर घेऊन जाणार निजामनमुळकानी तो सळूख करून घ्यावयास पातशाहास उभे केलें आपल्यास येश देतात त्यासी येश आलियासी श्रमही वाटत नाहीत येंदा दोन कामें दक्षण हिंदुस्थानची तें तुमच्या हातून जाहाली म्हणजे आपल्यासारखा तुका मारिलासा होतो बाकी आम्हीं आपले जीवित्व म्हणावे आणि तुम्हास गेल्यामागें फिरावें त्यासी फिरणेंही जाहाले आणि येश मिळविलें तरी तोच दिवस प्रापंचित जाणावा ते उमेद तुमचे आलियाने जाहाली जैपूरची मिलमलच होती तुमच्या आलियाने नीट होईलच व करावें पुढें माधोसिंगास आणायाचा डोल करावा जैपूरचें कामही देतील तरी घ्यावेंच कां की इत्के दिवस श्रम केले त्याहीमधेंही तुमचे विचारास येईल ते करा आणि कधीं चालणार काय करणार व येथें काय सलह तें लिहिणें आणि लौकर येऊन भेटणें म्हणजे कोडो [मिल]विले येक दक्षणचे सुभेदार घरीं निद्रा करूनही राहिलों तरी ईश्वरप्रीत्यर्थंही देईल तरी ईश्वर कोणाचे मोताज करणार नाही जर निराळेच असून तमाशा पाहावा हे सलह असली तरी [illegible]

येणें माधोसिंगास म्हणावे जे पातशाहा तुम्हावर बहूत राजी व तुम्हास तुमचे बापाप्रमाणें करावें आणि माझे वत्साचा माधोसिंग येसा करून दाखवावा जे अकबराचे वेलेस फलाणा व फरोखसेराचे वेलेस जैसिंग तरी माझे वेलेस हे त्यासी मजला आपल्या वडिलाप्रा पराक्रमी म्हणवणे असेल तरी मीं यासीही यांचे वडिलाहून अधीक करीन त्यासी टिका घेतल्यावर त्यांजला येकदा आलेच पाहि [ अपूर्ण* ]

---

| | | |
|---|---|---|
| ले. ७२<br>रखर १५ | श्रीशंकर<br>पौ छ ९ माहे जावली | श. १६७३ फाल्गुन वद्य २<br>इ. १७५२ फेब्रुवारी २० |

पुरवणी राजश्री बापूजी माहादेव गोसावी यासी

उपरी साप्रत दिलींकडील मजकूर काये आहे पठाण चालून येणार म्हणौन आवाई पाहिली जाहाली होती ती अद्याप हिकडे आहेच ऐसियासी पातशाहानी त्याची तनूंद काये केली आहे खोजे जावेदखान व गाजुदीखान याचा मनसुबा काये वजिराचा मनसुबा काये पातशाहाची इतराजी आहे किंवा लडाईचे मोकदम यास्तव त्याजवर रूपा व मीर मनूचा आशये काये पातशाहासी रुजू आहे किंवा त्याणेच पठाण आंणिले ते सविस्तर कचे वर्तमान तहकीक व बाजारी दोन्ही लिहिणे वजिराचा आशये काये हे तुम्हास दामोदरपंताच्या लिहिल्यावरून कलतच आहे तोही लिहिणे पातशाहा ताफखान्याची व लोकाची उस्तवारी करितात किंवा खबरही नाही ते लिहिणे दुसरे पठाण पातशाहीवरी येऊ लागले तरी आमचे फौजांची मदत इछितात नाही [ इ ]छीत तर असतीलच परंतु कदाचित फौज पंचवीस हजार तीस हजार चागली मदतीस आली तरी तिला पोटास का [ ये दे ] तील व जागीर काये देतील अंतर्भाव काढून लिहिणे हा जरी मातबर पैका देत असिले तरी पंचवीस हजार फौजेनसी चाकरीस हाजर होऊन पठाणास तंबी करू तुम्ही तेथे फौजेची च्याहा असली तरी लिहिणे नाही तरी वर्तमान मात्र लिहिणे च्याहा असलिया काये देणार तेही लिहिणे पातशाहानी मीर मनूस सागून मनसूर आलीवरी तंबी करावयास पठाण आणणार किंवा पातशाहावरच येणार ते लिहिणे जाणिजे छ १५ राखर बहूत काये लिहिणे सरदाराचा मनसबा काये कोठे अहेत ते सविस्तर लिहिणें

---

| | | |
|---|---|---|
| ले. ७३<br>रबि (जमादि) लावल २ | श्री | श. १६७४ चैत्र शुद्ध ४<br>इ. १७५२ मार्च ८ |

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव गो

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणौन स्वकीय कुशल लिहिणे विशेष छ २३ राबिलौवलची पत्रे पाठविली ती छ २० रबिलाखरी प्रविष्ट

जाहाली वारीक मोठे वर्तमान सर्व अवगत जाहाले त्रिंबकावरून फिरलियाचे पुणियास जातो ते कुल वर्तमान पहिले लिहिले आहे आलीकडे तरी जुनरास आलो पुणियास लौकरीच जाऊ तुम्ही दिलीतील वर्तमान पातशाहाचे काये पठाणाचे काये सरदाराचे राहिलेपठाणाचा सलूक जाहाला न जाहाला त्याचे काये वरकटही गेर लाहान थोर मजकूर व सलाबतजंगाचे ठाई मर्जी काये आमचे ठाई भाव कसा हे सर्व वरचेवरी लिहीत जाणे जाणिजे छ २ रबि(जमादि)लावल [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

---

लें. ७४ } श्री { श. १६७४ चैत्र वद्य ६
जवल १९ } { इ. १७५२ मार्च २५

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री दामोदर माहादेव गोसावी यासि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्का...थील कुशल जाणोन स्वकी... विशेप तुम्हीं पत्र छ ५ ... जाहले रो ... द केलियांची वर्तमानेंही आली तर [ सुलू ]ख कसकसा जाहाला तो विस्तारयुक्त लिहिणें इकडील वर्तमान तर सला-बतजंग भागान[ग*]रास जावयांचे विचारे पोहनेरासाली गंगातीरानीच जात आहे आम्ही छ १– जालोवली पुण्यास येऊन दाखल जाहालो तुम्ही तेथील वर्तमान वरच्या-वर लिहीत जाणे छ १९ जालावल बहूत काये लिंहिणे [ब.*] लेखन । सीमा

पौ छ २३ जाखर

---

लें. ७५ } श्री { श. १६७४ अ. आपाढ शुद्ध ७
हि. ११६५ शावान ५ } { इ. १७५२ जून ५

नकल आहदनामा बमोहर गाजीउद्दीनखान बहादर फिरोजजंग [ मो. जा.* ] आहदनामा याप्रमाणे लिहिले जाते की उमदतुल सरदारान राव मल्हारराव होलकर व राव जयाजीराव सिंदे रफकाय आमारत व आयालत मरतिबत राव पंडित प्रधान बालाजी बाजीराव माफीक हुकम मोहकम हजरत वास्ते तंबीह पठानआबदालीचे ज्या दिवसांत कीं हुजुरांत पहुचून हाजर जाले सबब पूर्व दोस्तीचे वास्ते सोपणे सुबेदारी सूबजात दक्षणचे बीच आरज आकदस आलाचे पहुचाऊन पीछे बक्षीस खिलआत व हसूल रुकसत जिनांचें बालापसूनें बमय फौज आपली आमचे बरोबर रवाने दक्षणचे जाले बीच सफाई दिल आणि खरे आंतःकर्णातून आहद व पैमान आनाची व कुरान मजीदची मजबुती इमानधर्माची करून करार केले जाते की जो पैका मदद खर्च फौज राव पंडित प्रधानचे माफीक दस्तावेज आलाहिदाचे ठरले आहेत ते हैदराबाद व औरंगाबाद वगै[रे*] सुबेजातांत दाखील जाल्यावर आणि फैसले तंबीह किंवा सफाई सलाबतजंगासी प्रथम आमदनी मालिया मुलकी यातर के

हजरतापासून जेथून हातास आली म्हणजे देऊ आणि सनदा जागीरात व इनामाची की आपले रजामंदीने करून दिल्ही आहेत त्याजवर कार्बाज व मुतसरफ व्हावे त्यांत तफावत हर्गीज होणार नाही जर सलाबतजंग सलूक करून आमचे हजुरांत आला आथवा युधास मुस्तआद जाला तर उम[द*]तु[ल*] सरदारान व राव पंडित प्रधानांनी आम्हासी मुतफीक होऊन कार्यास आनजाम करावा कदाचित सलाबतजंग पंडित प्रधानासी व उमदतुल सरदारानसी मिळून पैका फार दिल्हा आणि सूबेजातही सोडले तर आपसात आहदपैमान सफथप्रमाण आपले आपले धर्मइमानाप्रमाणे दरम्यानात आहेत म्हणैन त्यासी कार्य न ठेवावे ज्यात आमची मर्जी होईल त्याप्रमाणे आमलांत आणावे आणि जे सफथा आणि धर्म बेलभंडार दरम्यानात आले आहेत त्याजवर कायम रहावे आपले कौलकरारासिवाय आणीक लाळूच आणि उमेद न करावी व आम्हपासून यावदजीव पुत्रपौत्र कोलकरारांत तफावत होणार नाही आपले आहद-पैमान आणि नान व कुरान मजिदावर साबूत आणि कायम राहूं तुमचे मैत्रास आपले दोस्त व तुमचे शत्रूस आपले शत्रू जाणू छ ५ शाबान सन ११६५

---

| ले. ७६<br>शव्वाल २० | श्री<br>पो छ २५ जाखर | श. १६७४ श्रावण वद्य ६<br>इ. १७५२ आगस्ट १९ |
|---|---|---|

श्रियासह चिरंजीव राजश्री दादा यासि

बापूजी माहादेव अनेक आसीर्वाद उपरी येथील कुशल ता। छ २० माहे शवाल मु॥ इंद्रप्रस्थ जाणून स्वकुशल लिहीत जाणें विशेष पेशजी अजूरदार कासिदासमागमें पत्रें तपसीलवार लिहून पाठविले आसेत त्याजवरून सविस्तर कळो येईल सांप्रत सुरजमलजी पेमसिंगासहीत खोज्याचे सरायेसमीप पांच सात दिवस जाले मुकामात करून राहिले आहेत ज्या तुर जुमाने स्वकार्ये साधावी हे मानस इछून आले वजीर आजम या गोष्टीचे बाजीकार होऊन मतालब सर्व करून यावे म्हणून पाचारिले असतां त्यांस आपल्या सुबा राखावयाचे संकष्ट पडले आलाकुलीने शिकस्त खादली पंधरा राउतानसी पळोन गेले तमाम फौज व खजाना व बहीर बुनगाह बलवंड-सिंगाचे हातीं लागली सांप्रत त्या प्रांती जमीदाराचा हंगामा विशेपसा दिसतो अला, कुलीही फौज जमा करावयास लागला आहे च्यारपांच हजार जाली आहे पाहावें काय निदर्शनास येतें याप्रमाणें सुब्याकडील वर्तमान जालें असतां वजीर आजम दुसरा विचार कोण्याप्रकारें करूं सकतील व सुरजमलजीचे व रजपुताचे मतालब कसे हासील होतील वजीर आजमाचें मानस जे रा। अंताजीपंतास सुब्याकडे पाठवावें व नबाब बहादूर साहेबाची मर्जी हजुरांत यावें अद्यापांवर त्यांचे आगमनच होत नाही

ग्वालेर प्रांतीच आहेत पर्जन्यही अतिशय नदीनाले उतरावयाचे फौजेचे सकट त्याहीवर आमची पत्रावर पत्रें जातात पंत मानिले यावेसे आहेत येतील तेव्हा खरें [ नि.* ] नवाब अमीरुल उ[ म* ] रायासी पटु व खिलत शस पारचे नवाब बहादुराकडे रवाना जाला असे त्याचा आदाब बजाऊन अणून नवाब बहादुराचे सेवेत तत्पर राहेत येसा वेध (?) करीत जाणें बहूत काय लिा हे असीर्वाद रा त्रिंबकपंत यांसि नमस्कार

---

ले. ७७
जिल्हेज ५

श्री

श. १६७४ आश्विन शुद्ध ६
इ. १७५२ आक्टोबर १३

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री दामोधर माहादेव गोसावी यांसि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी, येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जाणे विशेष नवाब अमीरुल उमराव व निजामनमुल्क गाजुदीखा बहादूर फेरोजिग यांचे इनायेतनामे कृपायुक्त अमीरास असावे त्यांची याददास्त पारसी पाठविली असे त्याप्रो पाठऊन देणे व नवाबाचे कूच शहरातून कधी होणार ते लिहून पाठवणें [ नि. * ] जाणिजे छ ५ जिल्हेज [ ब.* ] लेखन । सीमा

पौ छ ९ जिल्हेज

---

ले. ७८
जिल्हेज ७

श्री

श. १६७४ आश्विन शुद्ध ८
इ. १७५२ आक्टोबर १५

राजश्री दामोधर माहादेव गो

उपरी तुमचे पत्र जानबाचे यादीसहवर्तमान पावले सविस्तर अर्थ अवगत जाहाला सैद लस्करखान याजकडील जाबसाल कोणेप्रकारे जाहाला हाफीज महेमद आलीखान सैद लस्करखानास लिहीत त्याज······पूर्वी लिहून पाठवणे लौकर जाबसाल लिहीत जाणे नवाब कधी निघणार तोफखान्याचीं व गैर तरतूद कसी केली ते सविस्तर लिहिणे [ नि.* ] जाणिजे छ ७ जिल्हेज बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. ७९
पौ जिल्हेज ८

श्रीभवानीशंकर
पौ छ ८ जिल्हेज

श. १६७४ आश्विन शुद्ध ९
इ. १७५२ आक्टोबर १६

विनंती शेवक आपाजी त्र्यंबक सां नमस्कार ........... येथील कुशळ तां छ ६ माहे जिल............[ मुक्काम आव]ला जाणून स्वक्षेम लिा आज्ञा केली ........दिवस जाले श्रीमंत राजश्री.........व आपले वर्तमान कलत नाही

या........नुचित आसे तर सविस्तर वर्तमान....... पाहिजे यानंतर छ ३ रोजी येथे दो.....यैकिले की छ २८ शवाली नवाब बा.........नवाब वजीर मुमालीक याणी आपले........सलामसलत करावयास बोलाऊन ये......तीत नवाब बाहादूर व जाट सुरजमल व ब......सिंग व इस्मालबेगखान या पाचाजणा .........दगा करून मारिले यैसे वर्तमा[न*] अले हे......आयोग्ये केली पातशाहाचा मुख......आपले घरी बोलाऊन हे काम......आहे दुसरा यैसे कर्म न करी......मीदार प्रतापगडवला तो......दगा करून मारला बरे तो जमीदार... ...यांस हे गत करावी यैसे न होते मर्दुमीचे काम न केले पुरा बेइमान याचा विस्वस इतबार नाही स्वामीनीही याचे इतबारावर न राहाणे निमित्य की आपला जाबसाल बहूत सख्त अण हा अविवीकी दूरआंदीशा विचार नाही चालू जाटाणे नवाब बहादूरावर हात केला हे गोठ जाटायोग्येही न होती तिथला प्रसंग काये आसल तो ने कले आपण यैकिले वर्तमान सेवेसी लिा आहे येर्थाल वंर्तमा[न*] पूर्वी इनामी कासिदाबरोबर सविस्तर लिा आहे त्याजवरून विदित जाले आसल सांप्रत्य अजपा......तिघा भावचा झगडाच होता अ......आहे वाटे तीन जाले वजिराची......तिनही सेह येरलेत मुरादा......मुलाखान दुदेखानाचा ता...... पासू[न*] ताळुका तमाम आवदु......मुलाखान दोघे भाऊ राहिली तीन......ते या तिघांमागे ती वाख्यावर आबदुला......येमुलाखान दोघे येकच आहेत येक कतु (?) ......त्र वेगला वांटे जालियावर हफज रहमत......बसला की तुम्ही आपले वाटे करून...... अता मऱ्हाट्याचे पयेशाची वांटे......पंत मजकुराबरोबर दक्षेणेस... ... जातो माझाकडील वचन गुतले अहे यै......मा अज पधरावीस रोज पडला होता......सून काही वाटेवर गोस्ट अली अ...... तीन लाख रुा तिघई करून द्या.......खरीफावर द्यावी यैसी तजवीज.......आहे हाच बर करार जाला तर थोडे बहून येंदा आठापधरा रोजात सेवेसी पावतील निमित्य की हे हारदम ख्याली अहेत याचे बोलाचा विस्वस नाही काही तागादा कराश्यास कोन्हेही गोस्टीची कमी केली नाही जेथवर उपाय करावयाचा तेथवर केला च्यार च्यार उपास धरणी जाली रुसवेही किती वेळा जाले दोन दोन कोस जीन ठेऊन उठोनही गेलो समजाऊन वायेदा करूंने ठेऊन फिरोन प्रथमच दिवस केवळ तोडून उठोन आलियांही आज गोस्ट कार्याची नाही याजनिमित्य विचाराचे वाटेणे......अन आपली आबरू व खावंदाचा नक्ते... मि[त्य*] की अज केवल यांसी विघा......चे पारपत्ये होणे नाही फौज ......माव व हे गोस्ट उतम नाही.......ता काही थोडाबहूत येवज आला...... फौजाची आमदानी जालियावर......पयेसो देतील अन आपलाही जोर क...... आहे ईस्वरइछ्य आहे तर थोडा बहून......रा रोजात पावेल हफज रहमतखान वाहा......ले कामानिमित्यच अज दोन महिने......अडून राहिला आहे याजकडून कसूर......नाही आम्हासीही ब्हूत खातरजमे......[गो*]स्टी करितो को राजे राव

दामोदरपंत या......विसरणार नाही हरयेक विशई दूर......इत जर यांही रुा दिल्हे तर बरे......बरोबर राव मल्हार व पंत मार......की त्यांसी कधी बेइमान हो... ...शे वचनावर इमानावर कोन्ही जामीन या मातबरी बोल न घेतली तर मीही पठाण आसन तर वचनात अंतर करणार नाही पयेसा माझे घरात नाही कीं मी देऊ रुा देणे येख्तियार या सरदारांचा आहे देतील तर याचेच बरे आहे न देत तर आपले केले पावतील तुमचा पयेसा सुटतो यैसे नाही परतु सलूखाने देऊन तुम्हास राजी करून रुकसत केले तर आमचाकडील मातबरी राहाते नाहीतर फजीत होऊ नतर देतीलच यैसे वर्तमान आहे सेवेसी कलावे राय पाहाडसिग......न मुरादाबादेस गेले हफजीचीही......स जावयाची होती परतु अता......राहावे यैसे केले आहे समाधान......आपले पयेसे द्यावे हाच जा......आमच्या हाता अण आपली बुन......राखोच्या हाता तर मऱ्हाठ्याचे..... करून देणे म्हणजे सर्व काही तुमचे द......हे जर यांचे रुा देत नाहीत तर तुम्हास......रा कोठेही उभ राहावयास जागा मिलणार......बहुताप्रा कायेल करून रुा आपलाले ही...... द्यावे यैसा करार केला आहे पाहावे कोन्हेप्रा...सेवेसी कळावे बहूत काये लिा लोभ कींजे हे......[ पुढे १५ ओळी खाजगी मजकूर* ]

---

| | | |
|---|---|---|
| ले. ८० रमजान २३ | श्री पो छ २४ रमजान | श. १६७५ आषाढ वद्य १० इ. १७५३ जुलै २५ |

तीर्थरूप राजश्री [ मो. जा.* ] दादासाहेब वडिलाचे शेवेसी

अपत्ये पुरुषोतमाने कृतानेक सां नमस्कार विनंती येथलि क्षेम ताा छ २३ जाणोन् वडिली लेखन अज्ञा करीत आसिले पाा विशेष तीर्थरूप रा बापूसा अपले पत्रे जाटकडे पाा तो मधे पत्रे धरले ते बजिनस नजीबखाकडे गेले त्याणे नवाब वजिरास अर्जी हे पत्र पाा त्यावरू [ न* ] वजीर बहूत दुखी जाला कितीक लोक समीप होते त्याही नवाबापासी भाशन केले की फितूर राजे बापूसा करितात याणीच अमचे घर बुडविलें यैसे बहूत दुखी जाला तो विस्तार कोठपरयेत ल्याहावे तैसाच तोफखानियास बोलाऊन घेतात त्यास हेच भासन करितात तुम्ही अमचे रफीक व्हा तेंच लोक वजिरासी गोष्टी सागात येणेकरून मोठा फितूर दिसोन येतो वजीर अपले कामास काही कमी करीत नाही यैसे असोन तीर्थरूप हे विचार करितात यांत त्याजला श्रम जातो यास कोनाता उपाये करावा दुसरे अज प्राथःकाली जकारनामा येऊन रिसाल्याचे ठीक केले दोन हजार स्वार व तीन हजार प्यादा येणेप्रां ठैराविले मऱ्हठी स्वार दर ३५ हिदुस्तानी ३० याप्राो करार जाला त्याचे कागजपत्र तयार होणार त्यांअधी वडिलाणीं पत्रे राा केले यैसे बहूत संकष्ट जाले

वडील करणार समर्थ अहे अपण त्याचे मणोग्यासारिख्या गोष्टी सांगितल्या परंतु त्याचा विचार हच की पहिले जत्रात जुज द्यावे मग पुढे जाटसी जुज करावे हे विचार अहे पाहावे श्रीरामचंद्रजी काये करितो वडिली केवळ घर बुडवयाचे केले [ नि.* ] ते काये कोठवर लिहावे बरे श्री रुपा करणार समर्थ व लज्या राक्षिणार श्रीरामचंद्र समर्थ अहे वजीरे अपल्यास बोलाविले अहे तर अवलिया-खानास पाचाशानिसी व जांनिसारखानास दोशानिसी व कुतुबखान व गुलाम मुस्तफाखाना[ स * ] तीशानिसी व पठाण मालवियाचे चिरंजीव तात्यांपासी अहेत ते सत्वर पाठवणे जैसे इत्का खर्च केला तैसा अणीख पंधरा दिवस कराल तर मोठे काम होईल काही भर श्रीकृपेने निघेल वजीर राजी होईल शत्रूची शामसुखे होतील ते करवणार वडील समर्थ अहे सत्वर पो हैगै न करणे येथे तीर्थस्वरूपासी कजिया जाला तर हेच जमियत कामास येईल नाही तरी साला.... फौज आलियावर सर्व उस्तवारी होईल श्रीरामचंद्रजीचे कृपेने करीत तर सत्वर पो... राहते श्री कृपा करणार समर्थ आहे हे विनंती

---

| ले. ८१ | श्रीगजानन | श. १६७५ भाद्रपद शुद्ध १४ |
| --- | --- | --- |
| जिल्काद १३ | पो छ ३० जिल्काद | इ. १७५३ सप्टेंबर ११ |

श्रीमंत राजश्री दादा स्वामीचे सो

पो गोविंद तमाजी कृतानेक सां नमस्कार विनंति उपरि येथील कुशल तागाईत छ १३ माहे जिल्काद मुकाम कसबा नारनोल लस्कर सवाईजी स्वामीचे कृपाकटाक्षें येथास्थित असे विशेष इकडील प्रसंग तर सकलही पूर्वी लोहागडचे मुकामीहून लेखन करून सो मुजरद कासिदाबा पाठविलें असे त्याजवरून सर्व अवगत जालें असेल सांप्रतचा प्रसंग तर राजश्री सवाई माधोसिंगजी दिलीचे उद्देशे निघून आजीपावेतों दोनी अडीच महिन्यांत या ठिकाणी पावले...सावाटी व तुवर घाटी वगैरे या जिल्यांतील मामिलत हरयेकासीं फैसल करून सर्वत्रांसी येकत्र करून समागमे घेतलें बार पंधरा हजार पर्यंत जमाव फौजेचा धरिला श्रीमंत राजश्री बापू यांजसमीप बाल मुकुंदासी पाठऊन सार्वभौम इत्यादिक अरकान हजूरचे यांसी जाबसाल लाविला त्याही वरकड मतालिब तर हजूर पावल्यानंतर सर्व होऊन राहतील म्हणून उमेदवार करून फौजेचा खर्च दाहा लक्षापावेतों द्यावा हजूर पावल्यानंतर पांच लक्ष व बाद फते वजिरासी मोडल्यानंतर पांच लक्ष या रीतीने ठहराऊन लिहिलें त्यासीं यानी प्रेशगी संपादायानिमित्य बहुत काहीं बजींदी केली व श्रीमंत बापू यांसही बहुता-प्रकारे लिहिलें लिहो बरें आपल्या...न कमी न करावी राजे थोर आहेत माग.....शाही कामावर...रितां उदास न होऊ द्यावें म्हणून पातशाहजीस अर्ज मारूज

करून रेवाडी पावेतो पावल्यानें दोनी लक्ष रुपये द्यावेत बाकी हजूर आल्यानंतर द्यावे कदांनचित रुपये घेऊन न येणे जालियां परतून द्यावे या गोष्टींचे हामी कोण म्हणून हुजत केलियासी श्रीमंती अपला जिमा करून खर्चासही काहडविलें आहे जरी हे नारनोलेहून पुढें चालून रेवाडीस जाऊन पावतात व पेशकदमी करितात तर अलबते ज्या गोष्टींत श्रीमंत बापू आले आहेत ते अमलांत येऊन राहील वे समयोचित पावलियां सर्व मतालिबही होऊन राहनील जरी हे गंव गाठतील तर यांचे ते पातशाह आहेतच वजीरजी तर इत्के दिवस फरीदाबादेसमीप जाटासुधां पडून राहून पुढें मोरचे कायेम करून नित्यानी मोरच्याची लडाई घेत होते व अंतस्तांस [सलू] सही करूं इछीत होते इंतजामुदौला जे...वा यासिवाये तोपखाना व येमुनेपारीं चोदा कोसाचे अंतरायें खुरज्यासी पठाणीन व अहमदखान पंधरा हजारा स्वारानिसीं येऊन पावले तेही येमुना उतरून त्यांचेच शामील होणार व पातशाहजीसमीप इंतजामुदौला वगैरे मिळून पंचेवीस तीस हजार फौज व तोपखाना आहे यासिवाये हेही दाहा पंधरा हजार स्वारानिसीं जाऊन पावतच आहेत येका दों दिसांत मागती वजीर व गाजुदीखान यांत मोठे जुंझ पडल्यासेरीज राहत नाही अणीसी अणी तर येऊन भिडली आहे जयेदाता भगवान समर्थ आहे परंतु गाजुदीखान याचे वये काये परंतु जसा खानदान तसीच हिमत या समयांत चालविली व नेकनामीही संपादिली श्रीमंत [मो.जा*]यांचे घरीं गाजुदीखानानी दिलींत येऊन मेजमानी खाली दोनी प्रहर पावेनों [ना]चरागरंग पाहून अकरा तोरे व पांच घोडे......रकम जवाहीर व हाथी नजर केला त्या...तोरा घोडा व येक रकम जवाहीर पाने खुशवोये घेऊन बहुत खातरजमा करून रुकसत होऊन दुसरे दिवसीं वजीरजीवर स्वारी केली व जाते वेळेस म्हटलें कीं दिलीकडील सर्वप्रकारें तुम्हामुळें निश्चितता असे बहुतेक रा अंताजी माणकेश्वर यासीं श्रीमंत नाना यांजसमागमे देऊन गाजुदीखानाचे हमराह हजुरून करून दिधले ये रीतीचे वर्तमान असे मागून जे काहीं नवीन वर्तमान येईल ते सा विनंति केली जाईल येंदा सरदारांचे येणे जालें असतें तर येका करोडीची मोहीम अनायासे होऊन महद येशाचे कारण होते न कले किं निमित्य विलंब जाला बहूत काये लिहिणे कृपा असो दिधली पाहिजे हे विनंति

काये पठाण व गुजर व रोहिला व राजे जे कोणी हजूर येऊन पावले व पावतात त्यां सर्वांसी श्रीमंत बापू यांचेच वियमाने खर्चवेच पावत जातो...हिरा होये श्रीमंत रघुनाथरावसा व सुभेदार थालनेरी येकत्र इकडील जाबसाल सर्वांचा तूर्त...यांसीच येऊन बाज खातो व अपण अण्यासमई नाशकी अहेत त्यासी खाली मैदान ...टाकणे सलाह दौलतेहून दूर असे श्रीमंत स्वामीसा आज्ञा संपादून फडी असणे सलाह दौलत असे यास्तव विनंति केली असे अतां विजयादशमीही समीप येऊन पावली विजयादशमीचे मुहूर्ते चाली घेतील समयोचित असणे सलाह असे यास्तव

वारंवार विनंति केली जाते बसईचे राहदारींचा प्रसंग पहिलें लिहिलाच होता त्याजवरून श्रुत जाहलें असेल येंदा धान्य केवल सवंग याजकरितां विकलें न गेले अतां पाऊस उघडला म्हणजे धान्य भावानसार विकून हुंडी चिरंजीव धर्मरावसो पाठवील म्यां ताकीद लिहिली असे बहूत काये लिहिणे रूपा असों दिधली पाहिजे हे विनति

राजश्री बावा स्वामींचे सो॥ सां नमस्कार विनंति उपरी सविस्तर श्रीमंत स्वामींचे सो॥ विनंति केली असे त्याजवरून अवगत होईल मज पदरचें जाणून सदैव स्मरणपत्रीं सांभोळीत असिलें पाहिजे रूपा असो दिधली पाहिजे हे विनति

---

| ले. ८२<br>जिल्हेज १० नंतर | श्री<br>पो छ २४ जिल्हेज | श. १६७५ आश्विन शुद्ध ११<br>इ. १७५३ आक्टोबर ८ |
|---|---|---|

विनंती की राजे माधोसिंग बाहादरसिंगाचे गढीस होते तेथे पातशाहानी नागरमलास पाठविले आहे व खानखानाचेथे टिकवयाची जड कायम करू लागले तेव्हा अम्ही बकशीकडे याप्रकारे लाविले की पातशाहा रणथंबोरचा किला न देत व त्याच उमेदीवर अले अहेत व खानखानाच्यानेही सनद न देवे ते बकशीचे मोहरेनिसी रणथंबोरचे किल्याची सनद देऊन त्यासी व बकशीसी पगडी बद केली अजे सुहेलचे सरायेस अले उदईक दिलीजवल अले म्हणिजे बकशी मारच्यातून उठोन घेऊन पातशाहाचे भेटीस नेतील खानखाना खफीफ होतील तीर्थरूप बापूचे समागमे अकबत महमूद व अंताजीपंताचे पुत्रास अम्ही देऊन राज्याकडे पाठविले बकशीसी कौल करा[र] करऊ काल रात्रौ तीर्थरूपही अले अहेत व नागरमल अझूण त्याजवलच अहे पुढे जे अमलात येईल ते [लि*]हू वरकड व्रत येथास्थी [त*] व समस्त सुखरूप असो सरकारातून रा॥ अंताजीपंतासमागमे नारो रूस्ट नामे मुजुमदार मोठे कामकर्ते माणूस होते व अजपर्यंत त्यानेच लढाई मारिली व कधीही लाचवला नाही व अंताजीपंतास मोरच्यात जाणे पडले नाही मोठे दिलगर्मीचा माणूस जाणून जाटाने छ १० जिल्हेजी डेरियात फरीदाबादेपलीकडे मोरच्यात निद्रस्त असता व च्यार घटका रात्र मागील राहाताना दगल करून सुरी पोटांत घातली व जिवे मारिले मोठे कार्यकर्ते व भला माणूस गेला अनुचित जाले त्याचे मुलेमाणसाचा समाचार श्रीमंत स्वामी घेणार समर्थ अहेत हे व्रत श्रीमंतासही व सुबेदारासही निवेदिले पाहिजे हे विनंती

चिरंजीव तात्यास असीर्वाद समस्तास असीर्वाद अनुकर्मे नमस्कार सागणे हे असीर्वाद

ले. ८३ } श्री { श. १६७५ आश्विन वद्य १२
जिल्हेज २५ } { इ. १७५३ आक्टोबर २२

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री आपूजी माहादेव गोसावी यांसी

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष सरकारचा रुपया राजश्री राजे माधोसिंग यांजकडून बेमुबलग येणे याजकरितां येथून राजे मशारनिलेस लिहिले होते कीं रुपयाची तरतूद करून पाठवणें त्यास त्याणी उतर लिहिले कीं रुपयाची तरतूद करून कणीरामाबराबरी पाठविली आहे त्यास कणी-राम येथे आले माधोसिगजीचे लिहिल्याप्रमाणें त्यास रुपयाची ताकीद केली याणी साफ उतर केले की रुपयाची तरतूद करून मजबराबरी पाठविली नाही मजला पाठविले मीं स्वामीपासी आलो येसी विनती केली त्याजवरून याचा वकूच कलोन आला आशास सवाई जयसिगापासोन त्याचा आमचा स्नेह घरोबा येसे असता मृषा लिहिणें त्यास अयोग्य बरे हाली माधोसिग दिलीस आले आहेत तुम्ही सरकारचे रुपयाविसी त्यांस उतम रीतीने सागोन तरतूद करऊन त्याचे दिवाण हरगोविंद यासी सिताबीने आम्हाकडे रवाना करणें जाणिजे छ २५ जिल्हेज [ नि.* ] बहूत काय लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. ८४ } श्री { श. १६७५ कार्तिक शुद्ध ७
मोहरम ६ } { इ. १७५३ नोव्हेंबर २

तीर्थरूप राजश्री दादा वडिलांचे सेवेसी

आपत्यें पुरुषोत्तमाने कृतानेक सां नमस्कार विनंती येथील क्षेम ता छ ६ मोहरम वडिलांचे असीर्वादे करून यथास्थीत असें विशेष येथील सायंत वृत पेशजी आजूरदार जोडीसमागमे लेहून पाठविलें आहे त्याजवरून विदित जालें असेल सांप्रतचें वर्तमान तरी रोहिल्यांस दाहा लक्ष रुपयांचा जिनस पूर्वी देणे कबूल केली होती व रोज साडे दाहा हजाराचा मोकरर केला होता त्यासी राजाचे..........देऊ केली ते रुपये त्यांजला पाहिजेत त्याजकरिता ते आडून बसले रुा मागतात पातशाहाचे तों घरात दाहा लक्षाचा येवज नाहीं बक्षीचें लोकास भक्षावयासी नाहीं याजनिमित्य कोण्ही तन देत नाहीत म्हणोन भलतीसी बलाय काढावी येतनिमित्य करार ठहराविला कीं सफदरजंगांस खिलत देऊन सुब्यास मार्गस्त करावें जाटाची तकसीर माफ करून त्याचे घरी त्यांजला पाठवावें अम्ही विनंती केली की श्रीमंत सरदारांसहीत सन्निध आले आठा दाहा दिसांत येऊन पोंहचतील त्यांची हजरतनी काय विल्हे केली त्यांजला भक्षावयासी हजरतला द्यावें लागेल तरी सांप्रत सख्य न करावें सहजच रघुनाथराव आले म्हणजे जाटांसी व

सफदरजंगासी समजून घेतील आपण आपला खर्च घेऊन सरकार वालाची किफायेत ज्यांत होईल तें करतील त्यानी उतर दिधलें की सांप्रत या रीतीनें केलें जाईल मग रघुनाथराव आले म्हणजे जाटावरी त्यानी मोहीम करावी आम्ही शामील होऊं मुबलग पैसा त्यानी घ्यावा व अम्हास देवावा त्याप्रमाणेच सफदरजंगास सुभ्यामधें गांठून त्याचेही पारपत्य करावें येसें कितेक प्रकारें बोलले सेवटी अम्ही साफ म्हटलें की हजरत कैसेंही करोत सख्य जाले म्हणजे खर्चास रुपया द्यावा लागेल देसीं करोडो रुपये सोडून हजरतचे कार्यावरी नजर देऊन रात्रीचा दिवस करून समीप येऊन पोंहचले असतां सख्याचें चितावरी धरिलें हे आती अपूर्व आहे त्याजवरून त्यानी आज्ञा केली की अम्ही सोन्याचे तख्त देखील मोडिलें जर अम्हास पैसा मिळता तरी हे काम काय सुख जाणून कर्तों या समयांत अमचे घरांत खर्च घालावा की उफराटें मागावें येसेंही असतां तुम्ही आपला दस्तावेज लेहून द्याल तरी सख्य न करूं दस्तावेज येसा जे फौजा आल्यावरी खर्चास मागणार नाहीं व सख्य करणार नाहीं व जाटाचे व सफदरजंगाचे येथून जें काहीं हस्तगत होईल तें निमें देऊं तुम्हापासी पैसा मागणार नाहीं येसा मुदा घातला त्याजवरून अम्ही विचारिलें कीं जर यांसी ना म्हणावे तरी हे आजीच सफदरजंगास सुब्यास वाटे लावितात त्याजला सुब्यास वाटे लाविलें म्हणजे जाट आपले देशांत कायम होईल मग आयोधेस सफदरजंगास मारावयासी दोनसे कोस आणीख श्रीमंतांस धावावें लागेल व जाटाची मोहीम दुहिरी पडेल नफा किमपि होणार नाहीं जाट सफदरजंग येके ठाई असलियां दोन्ही सिकारा हातीं लागतील याजकरितां त्याचें बोलल्याप्रमाणें लेहून देतों म्हणून मान्य केलें आणि सख्याचा डौल मोडावयाची तदबीर करितों अति निकड देखूं तेव्हा लिहिलें देऊं लढाईची थांबाथांब करितों श्रीमंत सत्वर येऊन नुस्ते येश तऱ्हीं मेळविते तऱ्ही उतम अतां पातशाहांत कांहीच हालत राहिली नाहीं की फौजांस खर्च पुरवील वडिलीं पूर्वी विनंती लिहिल्या-प्रमाणें दो ती हजारां स्वारानसीं व अमचे नावें नेमणुकेची सनद घेऊन यावें [ नि.* ] जरूर जरूर सत्वर अले पाहिजे ये विशई हैगै सहसा न करावी दर्शणाचा लाभ होईल तो सुदीन विशेष गोस्ट हेच की समय नाजूक अहे जर पातशाहाचे म्हटल्याप्रो लिहून न द्यावे तर अतापासूनच त्याचे चितात दहशत पैठते जर द्यावा तर त्याप्रा खाविंदानी अमलात न आणिल्यास अब्रु कैसी राहील येविशई ढीलढाल व ढालढकल अठच्यार दिवस करीन म्हटल्यासी पाहचा हंगामा अजच येखादा सरदार म्हणिजे ईस्वर न करो मीर बकशीच मारला जातो व दिलीवर अफत येते याची तजवीज काये करावी ते वडिली लिहिले पाहिजे सत्वर उतर पाठविणार वडील समर्थ अहेत येथे जैसा समय देखू तैसे करू खाविंदास निवेदन केले पाहिजे श्री लज्या रक्षिणार समर्थ अहे कृपा केली पाहिजे पुढे जे टैरल ते सत्वरच स्त्रो लिहू हे विनंती

चिरंजीव राजश्री तात्यास अनेक असीर्वाद तुम्ही पत्रदेखील लिहीत नाहीं याचें

कारण काये लिहिता येत नाही किंवा अम्हास विसरलेस ते लिहिणे वहिनीस नमस्कार सागणे हे असीर्वाद

राजश्री त्रिंबकपंतास नमस्कार समस्त मंडलीस नमस्कार अनुक्रमे असीर्वाद सागणे राजश्री गंगोबा तात्यास व राजश्री सखारामपंतास सां नमस्कार सागणे अम्ही पूर्वी पत्रे वरचेवर पाठवीत गेलो येक उतर येत नाही हे उची[त"] नाही म्हणून जरूर सागणे हाजत काये

श्रीमंत नानासाहबाचे सां सविस्तर वर्तमान लिहिले पाहिजे अम्ही येथून निराली जोडी पाठविली नाही व दोन च्यार पत्रे पूर्वी पाठविली त्याचाही मजकूर लिहिणे अम्ही वडिलाचेच पत्रावर हवाला दिधला अहे हे विनंती

---

ले. ८५ } श्री { श. १६७५ मार्गशीर्ष शुद्ध ४
सफर ३ }      { इ. १७५३ नोव्हेंबर २९

कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागाईत छ ३ माहे सफर मुकाम जेनगर स्वामीचे कृपाकटाक्षें येथास्थीत असे विशेष आजी पंधरा दिवस जाले मीं काम्याहून मुजरद कासिदाबा। सविस्तर वृत लिहून नित्यानी इनामी कासिदाबा।ही सविस्तर विनंती करीत गेलों त्यासी अद्यापीवर येकाचीही रसीद न आली राजश्री लालाजी येथवर येऊन पावले अपल्याकडे नवाबची पत्रें पाठविलीं त्याचे उतराची मार्गप्रतीक्षा करितात हा कालवर श्रीजीसीं भेटलेही नाहीत अतां भेटून, श्रीमंताकडें व सुभेदारांसा। लवकरच जातील श्रीजी डिगेस जाऊन भरतपुरीं जाऊन मेजमानी राणींसुधां घेऊन दोनी हाथी व घोडे वस्त्रें व जवाहीर व सेंपनास मोहरा नजरनियाज सपादून बहिरेस शामील होऊन दरकूच देवस्यावरून आजी त्रितीये प्रहरीं जयेपुरीं दाखल जाले व लस्कर व सिपाहाचे डेरे कोटाबाहेर होऊन श्रीजीचाही डेरा उभा राहिला उदैक श्रवण नक्षत्रीं -- श्रीजी डेरेदाखल होणार अैसें वर्तमान असे श्रीमंती शेरपूरचे जिल्यांत अमल दखल करून चारी परगण्यातील पंचेतालीस गढ्या मारून खाणून टाकिल्या व वाडाणियासी जाऊन मोर्चे लाविले होते चारी दिवस तेथील रजपूत भांडला सेवटीं निघून गेला त्या ठिकाणीही नेस्तनाबूत करून ठाणे कायम केले पुढें नेवाईस येऊन अग्निदग्ध करून पुढें गुणसीस येऊन पावले अतां पाहावें हेही घरासी पावले अहेत जरी हे बाहेर निघाले तर तेही पुढें येऊन घेरल्या ...ज राहणार नाहीत जरी कोणासी पाठऊन सरो...तील तर तेही तूर्त उतावली करणार नाहीत......यांचे......अद्यापि नूतन दिन......आणि...काहीक देऊन वरकड......करारदाद करून देईन व सुभेदारजीसमीप बिदा करीन अैस्या अनेकाप्रकारे ममता लाविताात पाहावें काये करितात व अतां कसा काये कोणाचा काबू पडतो जाटानेही बहूत काहीं सिष्टाचार ममता लाविली परंतु सेवटीं तेथल्या तेथेंच बिदा

होऊन राहिला व सफदरजंगजीनीही अपल्या सुब्याचीच वाट धरिली कोणीही दोनी कोस सरहद्देपावेतों पावते करायासीही न आला इत्कियावरं जे काहीं होऊन येईल ते विनंती केली जाईल बहूत काये लिहिणे रुपा असो दिधली पाहिजे हे विनंती

बल मुकुंदासी भरतपुराहून बिदा दिलीस केले त्याजबा। सफदरजंगाबाबत पालखी व रथ बकशीनिमित्य नेमून दिधला अहे कीं बकशीस देऊन श्रीमतांसमीप राहून जाबसाल करून बकशी वगैरेची साधना करित जाणे म्हणून सांगितले अहे बहुतेक दादासो नांवे पत्रही लिहून दिधलें अहे तपासिले भेटल्यानंतर सांगतीलच हे विनंती



ले. ८६
सफर ८ मार्गशीर्ष शुद्ध १०

श्री

श. १६७५ मार्गशीर्ष शुद्ध १०
इ. १७५३ डिसेंबर ४

श्रीमंत रुपावंत माहाराज राजश्री दामोदरपंत दादा व रा। त्रिंबकपंतदादा स्वामीचे सेवेसी

सेवक आज्ञाधारक येशवंत पुरुशोतम साकिन जैसिंगपुरा अवरंगावाद सां नमस्कार विनंती उप्री येथील क्षेम मार्गेश्वर सुध १० जाणौन स्वानंद लेखणार्थ आज्ञा कीजे यानंतर सेवकाने विनंतीपत्रें पाठविली परंतु अज्ञापत्र सादर न जालें तरी विनंती उदास न कीजे आपण स्थापित असोंत जे आज्ञा कराल ते अमलांत येईल व पुढेही प्रसंग अहेत व आपणही सेवेसी ततपर असोत येथील वर्तमान तरी स्वामींकडील सळूक जालियानंतर त्याप्रा। श्रीमंती चालविले परंतु किले फिरून याच्चा हातास अले नाहीत मधें फिरंगी हैदराबादेहून येथें आलेत न्यामतुलाखान व मीर मा। हुसेनखान वगैर अलेत सलाबतजंग शिकारीस जाऊन निमेचा डेरा देऊन परस्परे भेटी शिष्टाचार हाती घोडे वस्त्रे भूशणे दिधली वचनप्रमाण जालियानंतर मुसा भुसीं नसीरजंगाचे घरास येऊन वचनप्रमाण केलें यानंतर फिरंगियानी सवाल केला कीं अम्हस तरी महिना दोन लाख नगद पाहिजेत खजानियात पेसा नाही तरी मछलीबंदर पहिलें अम्हाकडे अहे तैसें राजबंदरी सिकाकोल वगैर माहाल तिसा लाखाचे जयेद अहेत ते अम्हास सनद करून द्या येथें तनखदारांचा उगा करून बाहेर मुलखगिरीस चला खजाना लागल तो मेलऊं तुम्हास अम्ही काहीं मागत नाही तोरा मात्र सागाते द्या करनाटकास जाऊं मीर मा। हुसेनखानास बुडऊ हा मुद्दा घातला व नसीरजंगाचे चितात व सलाबतजंगाचे चितात यावयाचें नाही तरी सुखे येथें राहणे निजाम अलीस अमचे समागमे दीजे येसें करून राजबदरीचा सवाल लि॥ मुसा भुसी नवाबापासीं येऊन दसखत करून नसीरजंगापासी हा येकरारनामा सवाल बयेज करायाशि पा। त्यानी विशम मानिलें जरी बयेज करीत नाहीत तरी शत्रु होतात यास्तव बयेज करून मोहर पादऊन दिधली व वकीलीचा इस्तफा दिधला कीं अवघा मुलक सावं-

दाने दिधला अम्ही कोन्हासी वाईट व्हावें व बदनामीचे घर आपल्या माथा घेऊन सिंवंदीचे लोक गिळूगीर करावे यास्तव सोडलें परंतु मुसा भुसी व नवब येऊन समजाविश करनार हे कबूल जरूर करितील नाही तरी शाहनवाजखान मीर मा हुसेनखान पाहावें कोण होतो येसा रंग येथील जाला अहे कीं लिहिता येत नाही अवघे मालीमुलकी काम मजमुल अपतर जालें अहे नाव दुलमलिते पाहावें श्रीमंत लमे करून निघनार उतरेकडील धड नेम आहे तिकडील अमद येकतों तरी तेथील मतालबचे कागदपत्र पा उतरें प्रतिउतरें अवघें घडीत करून पा हे विनंती तुमचा वकील येथे पनासा लाखाचा जबसाल करायास अला त्याने काम—लवकर केले हे विनंती छ १० फिरंगी व न्यामतुलाखान नवब सलाबतजंगापासी येऊन शाहनवजखानाचे घरास जाऊन वकील मुतलकी ठहराऊन अलेत तेरा रोजी करून छ १४ खिलत होनार जानोजी वगैर यासि नसीरजंग यानी पाचारिलें अहे श्रीमंताचे तरी मनोगत आता इकडे दिसत नाही तेही मार्गेश्वर सुध ४ दोन्ही लमे करून अवरंगाबादेवरून नरमदेस येताल फौजा रवाना करितात हे विनंती पौ छ २१ रावल

---

ले. ८७ } [सफर] १ [४] }

श्री

{ श. १६७५ मार्गशीर्ष शुद्ध १५
{ इ. १७५३ डिसेंबर १०

......सो कृतानेक सा न........येथील कुशल तागाईत छ १ [४ सफर] सोमवार मुकाम लस्कर श्रीमंत व सुभेदार सो मुतसील मौजे चंदलाई स्वामीचे कृपाकटाक्षे येथास्थीत असे विशेष श्रीजी जैनगरीं पावल्यानंतर किरपाराम [illegible] ग्रहस्तांसी विदा करायासी नेले त्यांची म्हणजे दिवाणजी[चीं] [illegible] विदा मज करावें हे नव्हती परंतु मज श्रीमंतापावेतों पावणे जरूर [illegible] नो मागती यानी तर उतावली केली व त्यांस निराले राजकारण [illegible] निघून गेले रा॥ लाला नरसिंगदासजी सुमुहूर्ताकरितां राहिले [illegible] निघून शहराबाहेर लस्करांत येऊन उतरलों दुसरे [illegible] दिवान[illegible] घरासीं येऊन बहूत काहीं सिष्टाचार माशणी [illegible] तर सर्वा प्रकारें निस ............ होऊन [illegible] दुसरी गोष्ट सर्वथैव न जाणावें हाप्रकारे [illegible] येवंच लालाजीसहवर्तमान श्रीमंत [illegible] संपादिला व लालाजीसही सन्मानपूर्वक [illegible] करविला आजवर तर अगाहीन [illegible] अपा व विष्णु माहादेव व [illegible] मिसर व पांडुरंग शंकर [illegible] नाटाणी तर दिवान[illegible]

लोकांत होतो त्यांचा ते जाणोन तूर्त राजे म्हणतील कीं दाहापांचाने टाळावे तर हे विना वीस पंचेवीस मुबादला घेतल्यासेरीज कसे उठतात........

---

ले. ८८ } श्री { श. १६७५ पौष वद्य ८
पौ खल २१ } पौ छ २१ रावल { इ. १७५४ जानेवारी १६

तव दिवानजीही कसी काये हिसेबाची रुजुवात करितात विना हिसेबाची रुजुवात मोकळीक नाही दोनी लक्षाचे हुंडीबदल राज्यापावेतोंही दिवानजीनी अर्ज मारुज करून सरकारची माणसे ढलाईत बसवावे येथवर केलें व नित्यानी याच तरतुदेंत आहेत महस्तसी निराला उपदेश करितात कीं तुम्ही वोढता – करून मीं बाकी सांगतो ते निकडीने घेणे [ सा ] रांश काये दिवानजी व काये इतर महस्त सर्वा [ ची ] रीन सराटातुल्य भासतों वरकड मानिलत – करोत परंतु वकीलीही बनली न ठेवावी आपल्या लगामी लाऊन घ्यावी या तरतुदेंत आहेत इतकी [ गुम ]राही खाली मैदान जाणून दिवाणजीनी केली हरयेकाचा हात सितल करून अपली बाजी सरसी दाख-विली अस्तु अखेर हिसेबाची गोष्टी हिसेबेंच होईल तूर्तीये तुफान घेतल्याने काये पेश जाणार परंतु अतां ये -- स्वरूप गंमाऊन तर राहण्यात रुच नाही व द्विवानाचे चालेल तोवर हे ... शुद्ध रीतीने आपणासी वर्ततो ऐसा प्रसंग नाही कीं [ मीं* ] दोनी महिने तर दिवानजीची वाट पाहतों जरी हिसेबाची रुजुवात करून देतात तर उतम नाही तर विना रुकसतही उठोन श्रीमंत [ मो. जा.* ] दादासा समीप पावतों तोंवर पुढें देवाजीपंतासी पाठवायाची तजवीज केली आहे येथील सेवा आजीवर केली आतां आणखी येखादी जागा मजकरितां निरालीच न्येमून ठेवावी दुसरी गोष्टी सर्वथैव न जाणावी दादासोस किंवा हे पत्रें पाठऊन त्यासी ल्याहावे कीं उतम रीतीने दिवानजीस रुजुवातेकरितां ताकीद लिहून पाठवीत चलके यांजकडील जो कांही राहील त्यासी ताकीद करीत राजश्री अंताजी माणकेश्वर यानी खानखानाकडील सूत्र लाऊन सखारामपंत व गेरेयांसी ममतेत घेऊन गोष्टरूपें भेटून राजकारण लाविल्यानीं श्रीमंताकडून त्याजला ताकदिपत्रें पाठऊन मार्गावर येऊन बकशीकडे दौल देऊन बकशीचेच निघणे अपले विद्यमाने जाहले श्रीमंत दादानी बोलमाला जाला [illegible] दंतभग्न जाले श्रीमंत खंडेरावबाबा व तात्या या सर्वांची मुलाजमत करऊन सरकार बादशाहजीनी केले व विदा बकशीसमागमे केले व गुद दादानी बकशीस[illegible] आहेत म्हणून वर्तमान ऐकून चीन मोहीत जाले परंतु स्वामीनें लिहिलें येईल [illegible] चितासी पुर्ते समाधान होईल तर सविस्तर स्वामीनी आज्ञा लेखिकामी करावी [illegible] वर्तमान मागून जे काहीं अमलांत येईल ते विनंति केली जाईल बहुत काये लिहिणे रुपालोभाभिवृधी करावी हे विनंती

राजश्री बाबास्वामीचे सो सां नमस्कार विनंती सविस्तर वर्तमान श्रीमंत [ मो. जा.* ] स्वामीस लिहिलें आहे त्याजवरून सर्व अवगत होईल सारांश आजी दोनी तीनी वरशें श्रीमंत दादासाो सरदारांसमागमे येतील कजिया फैसल पावेल म्हणजे किनारा धरला जाईल म्हणून अज्ञातवास करून राहिलो त्या [ स ] भगवंते या प्रकारें योग घडविला डेरादांडा सर्व [ लु ]टला गेला बहुत नुकसान जाले तो अर्थ का [ ही प ]त्रीं लिहितां पुर्वत नाही जे कांही जालें ते उतम ... परंतु अतां हा वाणी निसूरही बसूं देतां दिसत [नाही] पाहावें भगवान काये करितो सारांश अरोधें अ[थ]वा विरोधें ज्या रीतीनें येथून निघणे होतें त्या रीतीने साो येऊन पावतों मजविशई निश्चितता जे विचारायाची ते श्रीमंत दादासाो विनंती करून निराली करावी मी दावनगीर हेच गोष्ट समजावी निश्चिंत सर्वथैव नसावें बहूत काये लिहूं हे विनंती

---

| ले. ८९ | श्री | श. १६७६ चैत्र शुद्ध २ |
|---|---|---|
| जवल ३० | पौो छ ५ जखर | इ. १७५४ मार्च २५ |

श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] दादासाहेब स्वामीचे शेवेसी

विनंती शेवक आपाजी त्र्यंबक सां नमस्कार विनंती येथील कुशल ताा छ ३० माहे जावल मुा आवळा जाणून स्वक्षेम लिा आज्ञा केली पा विशेषे येथील वर्तमान सविस्तर पुर्वणीपत्री विनंती लिा आहे त्याजवरून ध्यानास येईल दुसरे वर्तमान येक छ मारी दोप्रहरा दिवसा लाला रामप्रसादचा चोब{र}दार आपले लस्करांतून खबर घेऊन चव रोजा चाळून येथे छ मारी दोप्रहरा आला त्याणे वर्तमान सागितले की श्रीमंत राजश्री खडेराव होलकर याचे दुशमानाची वाईट वार्ता सागितली व येक ग्रहस्त मातबर कोन्ही येसे उभयेताचे दुशमानाचे वर्तमान जयानी आइकिलिया दो प्रहरा सागोन बरेलीस हफजी व बक्षी आहेत त्यांजपासी गेला हे वर्तमान येकोन बहूत चित दुचित ऐकोन शेवेसी मुजरद कासीद पा आहे काये वर्तमान ते त्याहा-वयास आज्ञा केली पा ईस्वर सर्वा सदेव ब्राह्मणाचे भाग्ये कुशल करो वरकड वर्तमान पुरवणी पत्री लिा आहे कलले पा बहूत काये लिा शे[ व* ] कावर रुपा करीत आसिले पा हे विज्ञाप्त फुलव[ र* ] तीन सेर [ पा ] आहे तो पावेल कासिदास उतर देऊन सत्वर रा केले पा कासिद छ ३ तिसरे तारखेस पावलिया इनाम रुा १ देविला पाहिजे हे विज्ञाप

रा त्रिंबकपंतबाबा व रा बाबूरावजी व रा दिनानाथजी स्वामीचे शेवेसी सां नमस्कार विनंती लिा परिसोन सविस्तर वर्तमान लिा कासिदास सत्वर जाब देऊन रवणा केले पा की तेणेकरून चित स्वस्त होये क[ ळ* ]ले पा बहूत काये लिा हे विनंती

---

ले. ९०
चैत्र वद्य ९ मंगळ.

श्रीशंकर

श. १६७६ चैत्र वद्य ९
इ. १७५४ एप्रिल १६

विनंती उपर स्वामीच्या आज्ञेप्रमाणे नवाब साहेबांस विनंती केली म्हणो लागले कीं नांव-नवसीवार यादी करून द्या मजला जे देववणे असेल तें देववीन तेंव्हां स्वामीनी तपसील सांगितला होता तेणेप्रमाणे यादीही लिहून दिधली वाचून आज्ञा केली कीं मीं आपल्या मनांत विचारून जे देववायाचें ते त्रितीय प्रहरीं दसखत करून देईन त्रितीयः प्रहरीं जागृत होतांच स्वार होऊन कोण्या ठिकाणीं किती पाणी आहे हें पाहात पाहात महमूदगंजा-पर्यंत पाहून आले कोठे पयाब आगर थोडके पाणी न सांपडले काल लोंक उतरले होते याजपेक्षा उणे पाणी न देखिले संध्याकाळीं डेरेदाखल जाहाले आम्हीं विनंती केली कीं यादीवर दसखत करून द्यावे बोलले कीं दोंप्रहरापासून हे मंडळी गेली आहे अद्यापी उतर आलें नाहीं मी त्यांचे जाबाचा इंतजार आहे येक गोष्ट ठैरून आल्या-सारखे जे मजला देववणे तें देईन आम्हीं विनंती केली त्या ठेरण्यावर हे गोष्ट मौकूफ ठिवावीसी नाहीं येव्हड्याने त्याचे चित खूश होईल काम लवकर निघेल म्हणो लागले कीं आज मीं न्याहायेत खफा आहे त्यानी मजला खूश केलियां मी त्यांची रजावंदी करीन किंवा न करीन हे तुजला ठावके आहे कीं नाही असो आतां दिवसगती फार जाली अतःपर राजश्री सुभेदारानी व आपानी व कुंवर बहादुरानी व राव दामोदरपंती येकत्र बसून येक निश्चय करावा जर पार उतरणे तर विलंब काय उद्यांच रो गंगाधरपंती स्वार होऊन पांचा सा हजारा फौजेनसीं यांवे दोन तीन हजार फौज मीं आपलीं देतो पार उतरोन जावें आम्हीं विनंती केली कीं कुंवर बहादुरानी कबूल केलें होतें त्यानी पुढें उतरावें हेही मागें उतरतील म्हणो लागले यमुना उतरायास पुढाईत तुम्ही शादील मारावयास पुढाईत तुम्हीं मऊ वगैरे जालून खाकशा करायास पुढाईत तुम्हीं पठाणास कोंडायास पुढाईत तुम्हीं मोरचे बांधायास घोडीं माणसें मारावयास पुढाईत तुम्हीं येव्हड्या गोष्टीस जाटाचें नांव कां घेता त्याच्यानें काहीं होतें तर तुम्हांस दक्षणेहून कां बोलावितों दक्षण हिंदुस्थानांत यशाचे आधिकारी तुम्हीं जालेत येव्हड्या गोष्टींत काशास त्यांचे नांव घेता तुम्हीं पुढें उतरले माझी फौज तुम्हांमागें उतरली म्हणजे देखादेखीने जाटही उतरेल यास्तव उदई गंगाधरपंतास पांचा सा हजारांसी पाठऊनच द्या मीं दर्याचे कांठी उभा राहून तमाम हती व उंटे व नावा आहेत त्या देऊन त्यांजला व मीं आपली फौज पार करितों मागें जाटही जाईल याहीवर न जाये तर न जाव जर हे गोष्ट पार उतरायाची यनत नसली तर औवे येकत्र बसून औध्याच्या संमते जुंजच ठैराऊन मजला बोलावा मीं आपल्या फौजेसुधां येऊन उभा राहातों तुम्हीं सर्वही माझ्या आस

२

पास आहाच सर्व मिळून चालून घेऊन फतेसिकस्त ईश्वराचे स्वाधीन आहे ईश्वरास माझें बरें करणे आहे तर तुम्हांस येश येतें माझी फते होते मुदई

मारला जातो नाहीं तर जें होणार आसेल तें होईल उगेंच कालहरण कार्याचे नाही यास्तव या दोंही गोष्टीतून म्हणजे पहिली गोष्ट पार उतरणे दुसरी गोष्ट जुंजणे या दोही गोष्टीतून येक गोष्ट जे ओध्याचे संमत्ते ठैरल तें ठैराऊन मुफसल लेहून पो मी इंतजार आहे याप्रमाणे {न} नवाबानी नरसिंगदासजीचे रोबरो आवश्र दोन घटका सांगितले यास्तव मुफसल लेहले आहे जर आज मंगलवारीं कांहीं जांचेसाल ठैरला आसिला तर उतम नाहीं तर च्यार घटका आपण तसदी करून रा़ सुभेदारांस व आपास येकत्र करून आधीं त्यां उभयर्थांस हा सर्व आर्थ निवेदन करून तेथेंच कुवरजीस बोलाऊन ओध्यांचे संमते या दोन्ही गोष्टीतून जे ठैरल तें ठैराऊन ओध्यांची पत्रें पाठवणे कीं येणेप्रमाणे ठैरले यैसीं पत्रें पाठवावी व जे ठैरल तें लागलेच नमूदांत आणावे येव्हडे येप घेतले आसतां काशास म्हाणावें कीं तू पुढे होय आम्हीं मागून येतों यैसें नवाबानी फर्मावि्ले आहे यास्तव हे पत्र लिहून रा़ नरसिंघरावजीची जोडी हें पत्र देऊन पाठविली आहे लवकर याचा ठैराव करून सविस्तर लेहले पो कीं पेक्याटक्याचे काम याच ठैरावा [वर] मौकूफ आहे बहूत काये लिहिणे हे विनंती चैत्र वद्य ९ मंगलवार प्रहररात्र जातां नवाबाचे दिवाणखान्यांत वसून लिहून रा़ नरसिंगरावजीचे हवाले पत्र कले आसे लवकर उतर आले पो [ सांकेतिक* ]हे विनंती

---

| | | |
|---|---|---|
| ले. ९१ सु. ११५५<br>साबान १६ ( अव्वल साल ) | श्री | श. १६७६ ज्येष्ठ वद्य ३<br>इ. १७५४ जून ८ |

पुा राजश्री दामोदर महादेव गोसावी यासिं

सुा खमस खमसैन मया अलफ येक दोन पत्रे व हाली पत्र विस्तारे लिहिले तेथे भावार्थ की सखारामपंतानी व्याही अताजीपंत त्याचे अगत्यवादाने आम्हावर अकस करून व्यर्थ पेचात आणून वकिली काढलीसी करून दबाऊन आम्हाजवळून तेरा लाखाचा कतबा लिहून घेतला म्हणून लाब विस्तार काघावे करून लिहिला अैसियास तुमचे बाप शाहाणे प्रामाणीक योग्य होते त्यासाठी तुम्हास वकिली करार केली काही दिवस तुम्ही भिऊन चाकरी करीत होता त्यासाठी तुम्हास वाढविले साप्रत बापूजी माहादेव तो केवल कामातूनचं गेले काहीसे दरबार तुम्ही जाणत होता जे समई सरदार सलाबतजगाचे वेलेस हुजूर आले तेव्हा उभये सरदारानी तुमचे वाकडे वर्तणुकेचा अर्थ सागितला तथा तथापि ते समई क्षमाच केली तुम्ही न समजला हरप्रकारे निकाल काढून गेला साप्रत खावंद प्रत्यक्ष चिरंजीव दादा त्यासीही तुम्ही नीट न चाला अताजीपंताचे अकसामुले सरकारचे नुकसान मनसब्याचा नास घटकेत इकडे घटकेत तिकडे अैसे करू लागला हे पूर्ण चिरजीवाचे प्रत्ययास आले व सरदाराचे प्रत्ययास आले त्यानी जे केले असेल ते विचारूनच केले असेल पुढे

चिरंजीवाचे मर्जीप्रा वर्ताल तरच उतम आहे नाहीतर उतम नाही ज्याचा तो आपले बनाऊन लिहितो परतु प्रत्यक्ष सावंद चिरंजीव तेथे आहेत त्याचे प्रत्ययास आले असेल तेच आम्हास प्रमाण असे परकी दरबारी घटकेत इकडे घटकेत तिकडे येकाचा आश्रा करून येकासी क्षणात पेच करावा मागती झटयाने फिरोन त्याकडे व्हावे ह्या तुमचा वकिलीच्या युक्ती आहेत परतु त्या येथे चालणार नाहीत सारांश पेचपाच लबाड्या टाकून सर्व प्रकारे चिरंजीवाचे आज्ञेनरूप वर्तणे तेणेकरूनच जे उतम होणे ते होईल छ १६ साबान बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

पो छ २६ रमजान

---

लें. ९२ सु. ११५५ साबान १६ ( अव्वल साल ) } श्री { श. १६७६ ज्येष्ठ वद्य ३ इ. १७५४ जून ८

पुा राजश्री दामोदर माहादेव गोसावी यासी

सुा खमस खमसैन मया अलफ पातशाहासी पुर्ता दावा मनसूर अलीसी पडला आम्ही तुमचे लिहिल्यावर पातशाहाचा पक्ष केला बक्षी सर्व प्रकारे योग्य त्याचा बाप दक्षणेस येऊन मेला त्याचे बरे व्हावे हे उतम पातशाहाही जोवर मनसूर अली जुझत होता तो त्याजवर कृपा करीत होते येकायेकी फिरोन मनसूर अलीवर कृपा केली सलूख केला चिरजीवास हलके पाडून मनसूर अलीचे दावेदार केले फिरोन मनसूर अली दिलीत आलियावर वजीर पातशाहास मारून नवे करील यात संशये नाही तुम्ही घटकेत बक्षीकडे घटकेत वजीराकडे होता आता चिरंजीवानी हुजूरचा जाबसाल तुम्हास मुकरर केला असला तर वजीर बक्षी सर्व शाहाणपण वेचून येक करणे बक्षी येऊन पदरी पडला त्याचे वाईट जाहालिया लौकीक राहात नाही पातशाहा तो अप्रमाणीक घटकेत इकडे घटकेत तिकडेसे पूर्ण प्रत्ययास आले असो श्रीकृपा आहे तरी सर्वही उतम होईलच परतु कुचोद्य लबाडी अताजीपताचे अकसामुळे करून सर[ कार* ]काम नासाल तेवढे अपेश मात्र तुम्हास येऊन कामातून जाल हे पुर्त समजून वर्तणूक करणे छ १६ साबान बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

पो छ २६ रमजान

---

लें. ९३ रमजान १२ } श्री { श. १६७६ आषाढ शुद्ध १५ इ. १७५४ जुलै ४

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव गोसावी यासि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहिणे विशेष तुम्ही पत्र छ १६ शाबानची पाठविली ती प्रविष्ट जाहाली

अहमदशाहास कैद करून नवा पातशा केलियाचा बयान सविस्तर लिहिला तो अवगत जाहाला ऐशियास सहजात महद चेप आले आहे हे सर्वा प्रकारे चिरंजीवाचे मर्जी-नरूप तेथील जोडतोड करून देऊन तुमचे येकनिष्ठतेची अभिवृधी होऊन रूपा चिरंजीव करीत ते करणे निरंतर कचे वर्तमान लिहिणे येविसी सविस्तर आला-हिदा लिहिले असे त्याजवरून कलेल [ नि.* ] जाणिजे छ १२ रमजान [ नि.* ] बहूत काय लिहिणे [ ब.* ] लेखन। सीमा पो। छ २२ माहे शवाल

---

ले. ९४ रमजान २१ } श्री { श. १६७६ आषाढ वद्य ९ इ. १७५४ जुलै १३

राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसी

उपरी दिलींतील कारभारास वकफ तुम्ही असतां आजी महिना दीड महिना जाला रुपयाचा निकाल होत नाहीं हे गोष्टी अपूर्व आहे त्यांस त्याजउपरी सरकार कामावरी निकड करून राजश्री गंगाधर येशवंत व तुम्हीं मिलोन जे गोष्टीने रुपया लौकर हातास ये येसे करणे नागरमल व मजलसरायें आणिलें आहेत येसे तुम्हीं लिहिले होते त्यास नागरमल व मजलसराये आसाम्या सागतील त्याप्रमाणे वजिरा-पासोन मागोन घेऊ गंगोबा व तुम्ही मिलोन जे गोष्टींने सध्या रुपया हातास ये तें करणे जाणिजे छ २१ (?) रमजान [ ब.* ] लेखन। सीमा

पो। छ १९ रमजान

---

ले. ९५ रमजान २२ } श्री { श. १६७६ आषाढ वद्य ९ इ. १७५४ जुलै १४

चिरंजीव राजश्री बाजीराव सिवराम यांस प्रती पुरुषोतम माहादेव असीरवाद उपरी येथील कुशल ता। छ २२ रमजान मु। लस्कर नजीक दिली येमुना द[क्ष]ण-तीर जाणोन स्वकीये लिहिणे विशेष तुम्हांकडील वर्तमान कलत नवते सांप्रत तुमचे पत्र छ ९ रमजानचे नवलाईचे मुकामचे आले ते येथे छ २१ माहे मारी पाऊन सविस्तर कलले तुम्ही लिहिले की पत्रच पाठवीत नाही त्यास जाबसाल काहीच नाही लस्कर दिलीकडे चालले यास्तव पत्र न पाठविले आता पत्रे वरचेवर पाठवीत जाऊ तुम्हीही वरचेवर लिहीत जाणे तुम्ही खर्चविसी लिहिले त्यास श्रीमंत राजश्री दादाची परवानगी घेऊन खर्चसही पाठऊ काही चिंता न करणे जाबसाल आपले-कडील करीत जाणे इकडील वर्तमान तर आज छ २२ तारखेस श्रीमंत व होलकर सड्या फौजा करून...............फौजेवर जुन्या किल्या ... लागले आहेत तेथे पातशाहाकडील फौज दाहा पंधरा हजार व प्यादे व तोफखाना जुन्या किल्याचे आसरियाने बसले आहेत आज टांटू थोडीबहूत होईल व आठा चहू दिव-

सानी येथील गुता उरकून मागती येमुना उतरून आंतरवेदीतून फरुकाबादेस येणार तेथे कामाचा उलगडा पाडावा व वजिराकडीलही कामकाज करावे हा मनोदये सरदाराचा आहे मागाहून होईल ते लिहू प्रिथ्वीपती आपले हवेलीत बसले आहेत काहीच ताल नाही पाहावे श्री काये करील हे न कले ( अपूर्ण )

---

ले. ९६ सन्वाल-१२ } श्री {श. १६७६ श्रावण शुद्ध १४ इ. १७५४ आगस्ट २

राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव स्वामी गोसावी यांसि

उपरी तुम्ही चिठी पाठविली ती पावली सारे कारभारी जमा केले आहेत म्हणून लिा ते कलले मज[ल*]सरायेस पाठवावे म्हणून लिा त्यास वरकड कारभार जाला आणि याजकरितांच तटला यैसे नाही आ......साची टीप व जवाहीर कोठे आले टीप व जवाहीर लौकर पाठवणे मज[ल*]सरायाचा कारभार तरी त्या... रुपये करार कराल ते येथे मागू दिल्हे तरी उत[म ना]ही तरी तुम्हा-कडे पाठऊन देऊ आकरा लाखाचा वाइदा टलला व जवाहिराचाही वाइदा ट[ल*]ला याचा विचार काये या उपरी कराराप्रमाणे टीप व जवाहीर पाठवणे वरकड कारभार कहाडुन केला आहे त्याप्रा लौकर करणे जाणिजे छ १२ सौवाल [ ब.* ]-लेखन । सीमा

---

ले. ९७ पौ सन्वाल १८ } श्रीशंकर {श. १६७६ श्रावण वद्य-५ इ. १७५४ आगस्ट ८

राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव स्वामी गोसावी यांसि

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार उपरी तुम्ही टीप घेऊन ठेविली आहे म्हणोन ऐकितो त्यास टीपेचे रुपये सध्या आम्हास घेतले पाहिजेत व जवाहीर पातशाहानी साता लक्षाचे बाहेर काढिवले म्हणौन ऐकितो त्यास आम्हास जवाहिराचा दरकार काये आम्हास तूर्त कर्जदारास रुपया दिल्हा पाहिजे व लोकाची नालबंदी वाटली पाहिजे त्या कामास जवाहिराचा दरकार काये आहे परंतु पातशाहाचे घरी रुपया नाही म्हणौन साता लक्षाचे जवाहीर घ्यावयाचे माहाप्रयासे कबूल केले त्यास ते जवाहीर किफाईतवार काढणे की आज बाजारात विकिल्यास त्याचे च्यार रुपये आधीक येत निदानी बरोबरीचे तरी येत ते काढणे नाही तर काये काम शालाचा मजकूर तरी तीस चालीस हजार पावेतो गंगाधर येशवंत याणी काढिल्या आहेत म्हणौन कलले त्यास त्या जर नव्या चागल्या किफायतवार आसिल्यास घेतल्या जातील तुम्हास रोज पत्रे लिहितो त्याचे स्मरणही रातीन नाही हे उतम नाही जेणे

काम लौकर होय ते करणे नाही तर तुम्हावर काम सोपिल्याने तुमचा उपहास व आमचाही होय अैसे न करणे तुमचे कारागिरीचे दिवस हेच आहेत या दिवसात न केल्यास पुढे काये कामाचे जर कदाचीत तुमच्याने कारभार होत नसला तरी नागरमलास तरी घेऊन येणे आम्हास कलेल ते रीतीने करू बापू रात्री आम्हासी बोलून गेले त्यातील येकही गोष्ट दृष्टीस पडत नाही त्यास तुम्हास कलेल तसे करून रुपये घेऊन येणे अथवा नागरमलास {लास} घेऊन येणे मागील आठ जाहाले त्यापैकी दोन लक्ष वैद्याकडील रुपये ते तसेच आहेत त्याजवर आम्ही वराता करणार आहो तुम्ही अश्वीन शुध प्रतिपदेस पावेसे ठीक करणे त्याच मुदतीने सावकाराच्या वराता करू व आकरा टिपेचे व सात जवाहिराचे येकूण सारे मिलोन सवीस होतात बाकी चवदा राहिले त्याची कसकसी निशा केली ते लिहिणे येका दिवसाचे मुदतीने टीपेचे काम कबूल केले त्यास पंधरा दिवस वाट पाहिली पुढे चवदा राहिले त्यास दोनेक महिने लागतीलसे दिसते तुमचे दिवस ब्रह्मदेवाप्रमाणे आहेत ऐसा कारभार न करणे चवदा लाख रोख व हे आठरा अैसे घेऊन येणे मुदती आगोधर येक दिवस पोहचत ते करणे नाही [तरी*] नागरमल घेऊन येणे फिरोन तपसील लिहिला तरी उतम नाही [ ब.* ] लेखन । सीमा पा छ १८ सवाल

---

लें. ९८
सव्वाल २० } श्री { श. १६७६ श्रावण वद्य ७
इ. १७५४ आगस्ट १०

राजश्री बापूजी माहादेव गोसावी यासी

उपरी तुम्ही चिठी पाठविली ते पावली साकल्य लिहिले त्यात खुलासा की वजीर मोहर करून देत नाही तरी तुम्ही त्यास साफ पुसोन उठोन येणे उपरांतीक तो जाणे आम्ही जाणो तुमच्या लिहिल्यावरून आम्ही स्वस्त राहातो तुम्हास तो कोठे ठिकाण दिसत नाही तेव्हा कामाची पैरवी कसी होणार अथःपर वजीरच रुये देत नाही येसेच का...ईना कार्य होत नाहीसे दिसते तुम्ही दाटून अशेस लागून गुतला कुच्योदे करीत असतील तर दिलीचा प्रकार दुसरे लाहान मोठे माणूस लबाडी करिते परंतु सारे कारभारी येक करून भार तुम्हावरी याजसाठीच दिल्हा येसे असतां तपसीलच जाला तर काये गुंता आहे तुम्ही येणे जसे बनेल तसे केले जाईल जवाहीर देतात ते अमच्या अनुमताखेरीज परभारे खडणार ते अम्हास कसे पुर्वेल जवाहीर वाजवीचे रूईने होईल तसे घेऊ त्यारी विचार पाहून जे करावयाचे ते करणे जाणिजे छ २० [ नि.* ] सवाल बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. ९९ सव्वाल २१ } श्री { श. १६७६ श्रावण वद्य ८ इ. १७५४ आगस्ट ११

राजश्री दामोदर माहादेव गोसावी यासि

दं आखंडीत लक्ष्मी आळंकृत राजमान्य [ मो. जा.* ] श्रा मलारजी होळकर दंडवत विनंती उपर येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणें विशेष तुम्ही मागे राहिला आद्यापि नबाबास घेऊन आला नाही कितेक कामाचा खोलंबा आहे खोज मकुलीखान आनवरखान आदिकरून सर्वांची खातरजमा करून भेटीस आणवावे लागतात नबाबही जलद पावे त्यासि तूर्त खोज मकुलीखान याजला खातरतसळेचे पत्रे उतम प्रकारें लिहून पाठवणे बहूत समाधाने करून लिहून जेणे करून त्याची खातर तसले होये यैसी आधी आम्हाकडे पाठऊन देणें म्हणजे येथून त्याची रवा(वां)नगी करूनं सत्वर पत्रें लिहिल्याप्रा पाठवणें आणि नबाबाचे कूच होऊन जलद येत ते करणे नबाबाच्या लस्करातून कोन्ही खोज मकुलीखान यासि पत्र लिहिले आहे की येथे तुम्ही भेटीस याल म्हणजे दगाबाजी तुम्हासी करतील आबरू जाईल यैसे लिहून त्याच्या मनांत संवशये आणिला आहे त्यासि खोज मकुलीखान याजला खातरतसलेची पत्रे उतम प्रकारें नबाबाची लिहून सत्वर पाठवणे छ २१ सवाल [ नि.* ] बहूत काये लिहिणे हे विनंती [ वा.* ] मोर्तब । सुद

[ पाठीवर डाव्या हाताच्या कोपऱ्यांत मल्हारराव होळकराचा शिक्का* ]

पा छ २३ शवाल

---

ले. १०० जिल्काद १ } श्री { श. १६७६ भाद्रपद शुद्ध २ इ. १७५४ आगस्ट २०

राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसि

उपरी तुम्हीं लिहिलें वृत कळलें यैशास टीप तो येतच आहे परंतु बाकी यैवज राहिला तो क्षेपनिक्षेप येतोसें असले तरी निशा घेऊन लेहून पाठवणे मजलसराये व बाइको वजिराचे हवाला करतो तुम्ही याप्रा करणें नाही तरी सर्व मंडली पेशजीप्रा घेऊन येणे जाणिजे छ १ जिलकाद बहूत काये लिहिणे वाइदा जाला आथःपर अम्ही यैकत नाही रोख पैका येईल तरी खरे नाही तरी उदईक मंडली घेऊन तुम्ही येणे छ मजकूर [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. १०१ } श्री { श. १६७६ भाद्रपद शुद्ध १२
जिल्काद १० } { इ. १७५४ आगस्ट २९

राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसि

उपरी वजीर तर गैर माहाल पातशाहास अर्ज करणे की रुपयास तीन मास जाले अथःपर रुये येणे तेव्हां येतील अम्ही कूच करून यमुनेवरी जातो रा गंगाधर येशवंत यांसही बोलाविले आहे तुम्हीही त्रिवर्ग भाऊ येणे वजिराचेही कानावरी घालणे जाणिजे छ १० जिलकाद बहुत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. १०२ } श्री { श. १६७६ भाद्रपद वद्य २
पो जिल्काद १५ } { इ. १७५४ सप्टेंबर ३

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री दामोदर माहादेव गोसांवी यासिं

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणौन स्वकीय कुशल लिहिणे विशेष तुम्ही पत्रे पाठविली ती पावली जाटाचे लबाडीचा व दिलीतलि येवज जमा करणियाचा व आपले येकनिष्ठेचा वगैर कितेक अर्थ लिहिला तो सर्व अवगत जाहाला ऐशियास येथून विस्तारे त्या प्रांतीच्या मनसुबियाचा अर्थ लिहिणे तो चिरंजीवास लिहितो ते आज्ञा करीत असतील तदनुसार तुम्ही निदर्शनास आणून देऊन आपले चाकरीचा मजुरा करून दाखवणे पैका पुर्ता मिले फौज फिटून कर्ज वारावयास पनास [लाख*] पाऊण करोड रोकड येई तो अर्थ करून दाखवणे जे जे पाचपेच असतील ते सर्व चिरं}वा}जीवाचे मर्जीमाफक ठीकसा करून ज्यात तुमची फिरोन तारीफ लिहीत व जनातही दिसे ते करणे हे तुमचे वडिलाने मेलविले तुम्हासही पाहिजे निरंतर कचे सर्व बारीक मोठे वर्तमान लिहीत जाणे [नि.*] जाणिजे छ १५ जिल्काद [नि.*] बहूत काये लिहिणे [ब.*] लेखन । सीमा

पौ छ २४ जल्हेज

---

ले. १०३ } श्री { श. १६७६ भाद्रपद वद्य ५
जिल्काद १८ } { इ. १७५४ सप्टेंबर ६

राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसि

उपरी तुम्ही चिठी पाठविली ते पावली वजिराचे व पातशाहाचे फारच विटलेसे जाले याउपरी कोणता प्रकार होतो तो पहावा म्हणून लिहिले यैशास तुमचे लिहि-ल्यावरून हंगामा तो कलला परंतु पुढे कोणता प्रकार होतो पातशाहाची मर्जी कसी वजिराचा प्रकार कसा लावेल किवा विझेल सारांश ध्यानात आणून प्रहराप्रहरास

वर्तमान लिहीत जाणे पुर्ता विचार पाहून लेहून वरचेवरी पाठवणे जाणिजे छ १८ जिल्काद बहूत काये लिहिणे [ब.*] लेखन । सीमा

पौो छ २१ जिल्काद

---

ले. १०४ जिल्काद १८ } श्री { श. १६७६ भाद्रपद वद्य ५ इ. १७५४ सप्टेंबर ६

राजश्री बापूजी माहादेव गोसांवी यासिं

उपरी तुम्ही दोन पत्रे कासिदाबाा लिहिल्या त्या पावोन वर्तमान कळले तुमचे लिहिल्याप्राो फौज पाठविली आहे लकेतपे करून समजावावे हे मर्जी वजिराची व लिखल्या कामाची काये या प्रसंगी पातशाहाची मर्जी राखून मातबर काम आपले करून घ्यावे यैसे आहे तरी जो मनसबा उतम दिसोन पातशाह राजी होऊन आपले काम त्वरीत होये ते करणे, हजार संशेये चितात न अणणे जाणिजे छ १८ जिलकाद बहूत काये लिहिणे [ब.*] लेखन । सीमा

पाा छ १९ माहे जिलकाद

---

ले. १०५ जिल्हेज १ } श्री { श. १६७६ आश्विन शुद्ध ३ इ. १७५४ सप्टेंबर १९

राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसी

उपरी तुम्ही मुसवर पाठविला होता याजपासी तसबिरा सरकारच नीट करावयाबदल दिल्या त्या आदपी त्याणी आणून दिल्या नाहीत याजकरितां मुसवरास ताकीद करून तसबिरा पाठऊन देवणें जाणिजे छ १ जिल्हेज बहुत काये लिहिणे [ब.*] लेखन । सीमा

नवाब गाजुदीखान यासी च्यार नावांविसी लिहिलें त्याणी दोन नावा पाठविल्या [त्या*]स बाकी दोन राहिल्या पाठऊन देणे याजखेरीज आणखी येक दोन नावा नवाबापासी मागोन तीन नावा जलदीने येथें पाठऊन देणें जाणिजे छ मार सान्या मिलोन पाच पाहिजेत त्यापैकी दोन आल्या आणिक तीन नावा पाठवणे छ मजकूर [ब.*] लेखन । सीमा

---

ले. १०६ पौो जिल्हेज १९ } श्री { श. १६७६ आश्विन वद्य ६ इ. १७५४ आक्टोबर ७

राजश्री दामोदरपंत स्वामी गोसावीं यांसि

पौो सखाराम भगवंत साा नमस्कार विनती उपर रामाजी मोरेश्वर याचे गावाविसी

आपणास सांगितले गावाचे नावाची चिठीही दिल्ही आहे त्याप्रो काम करून पत्रे देवावी हा पदरचा आहे जरूर काम करून देवावे हे विनती

पो छ १९ जिल्हेज

---

ले. १०७ मोहरम १० } श्री { श. १६७६ कार्तिक शुद्ध १२ इ. १७५४ आक्टोबर २७

राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसी

उपरी तुम्हीं आजींच्या दिवसांत सध्याकालपावेतों अवघे कारभाराचा निकाल करून टीप घेऊन येणे जरी आजींच्या दिवसांत निर्गम करीत नाहीत तरी कार्यास येणार नाहीं आमचे चितास येईल तैसेच करून त्यास तुम्हीं यैसेच साफ वजिरास पुसोन टिपेसुधा निकाल करून घेऊन येणें जाणिजे छ १० मोहरम धोडावा नाइकाची टीप पराऊ च्यार महिन्या अलीकडे रुपये द्यावे पैकीं पांचसात सध्या द्यावे यैसे तुम्ही कबूल केलेंच आहे त्याप्रमाणे होत असेल तरी करून घेऊन येणे नाही तरी आम्हास पुरवत नाही त्यास कराराप्रमाणें निकाल घराघरू टिपेचा करून घेणें आजी दोन प्रहरा अलीकडे येणे नाहीतरी हा कारभार अवघा तोडोन येणे पुढें आमचे चितास येईल ते करूं जाणिजे तुम्हीं दिलीत राहणें याजकरितां नबाबाची मर्जी तुम्हांस राखणें याजकरितां बेधडक बोलत नसाल तरी यैसी गोष्टी कार्याची काये त्यास बैद्याचे कामापासोन मातबर कामे देखील अवघींच करून घेणे त्यातून काहीयेकं काम राहिल्यास परिछिन्न कार्यास यणार नाहीं जाणिजे [ नि.* ] छ १० मोहरम बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा पो छ १० मोहरम

---

ले. १०८ मोहरम २० } श्री { श. १६७६ कार्तिक वद्य ६ इ. १७५४ नोव्हेंबर ६

राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव स्वामी गोसावी यासि

उपरी जाटांचे राजकारण वजिराकडे लागलें आहे त्यास आपले मारफतीने करावे म्हणून लिा त्यास आमचे रुपये येणे आहेत ते जाटानी द्यावे नाही तरी आम्ही व वजीर मिळून त्याचे पारिपत्य करावे यैसेही ठीक करून ठेवणे याचा विचार करून त्यासी बोलून लेहून पाठवणे म्हणजे रूपरामास वजिराकडे पाठऊन देऊ आपल्या मारफतीने सलूक करून देऊ याचा जाबसाल पाठवणे म्हणजे तुम्हाकडे पाठऊन देऊ [ नि.* ] जाणिजे छ १९ मोहरम जाणिजे छ २० मोहरम व नबाब निदानी काये बोलतील ते लिहिणे आम्ही यासी बोलून मग तुम्हाकडे पाठऊ छ मजकूर [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा पो छ २० मोहरम

---

ले. १०९ } श्री { श. १६७६ कार्तिक वद्य १४
मोहरम २७ } { इ. १७५४ नोव्हेंबर १३

राजश्री बापूजी माहादेव व राजश्री दामोदर माहादेव गोसावी यासि

दं अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य [ मो. जा.* ] स्नों। जयाजी सिंदे दंडवत विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लेखन करीत जाणें यानंतर पत्र तुम्हांकडून छ १३ मोहरमचें आलें तें छ २६ मोहरमी प्रा जालें तेथें तपसीलवार वृतांत दिलींकडील वगैरे लिहिला त्याप्रमाणें कळलें या उपरीही वर्तमानविशेष आढळेल त्याप्रमाणें वरचेवरी लेहून पाठवीत जाणें आम्हांकडील वृत तरी सांप्रत आम्हीं नागोरावरीच असों बिजेसिंगाच्या बोलीचालीचा विचार बनोन येत नसे सबब ठाणें मारासही उपद्वाप करणें जरूर आहे जोदपूर व जालोर येथेंही फौजा महाराजा राजे रामसिंगजी यांजकडील पुरोहित जगंनाथजी व सारेच रजपूत पां आहेत त्यांणी तेथें मोर्चे लाविले असेत पुढें होईल वर्तमान त्याप्रों मागाहून लेहून पाठऊन देऊं जाणिजे छ २७ मोहरम [ नि.* ] बहूत काये लिहिणें हे विनंती [ वा.* ] मोर्तब। सुद

[ पाठीवर डावे अंगास जयाप्पाचा शिक्का* ]

---

ले. ११० } श्री { श. १६७६ मार्गशीर्ष शुद्ध १
मोहरम २९ } { इ. १७५४ नोव्हेंबर १५

राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसि

उपरी तुम्ही शहरातील हंगामा जालियाचे वर्तमान लिहिलें ते दोन तीन चिठ्या पाठविल्या त्या पावल्या या उपरी गाजदीखानाचीहीं नजर फिरलीसी जाली अथःपर जो निश्चये करणे तो करून राजश्री त्रिंबक मलारी पाठविले आहेत. सागतील त्याप्रा आमलात आणून काम सत्वर करणे खकारनामकाचे काम होये व पैकाटक्याची निशा सुभेदारासी बोलिल्याप्रो होऊन यैवज लौकर ये ते करणे छ २९ मोहरम बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन। सीमा

---

ले. १११ } श्री {

राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव स्वामी गोसावी यासि

उपरी तुम्ही चिठ्या पाठविल्या त्या पावल्या त्यांत लिहिले कीं, उत्तर काय होते ते येऊन निवेदन करितों म्हणून लिा तस्मात कांहीं गुंता आहे तरी हे गोष्ट ठीक नाहीं आर्ज्यांही पाठविल्या आहेत तरी यादीप्रा काम करून सत्वर उद्या येणे याउपरी विलंब न लावणे विलंब लाविलियास हिसका बसेल यैसे न करणे येव्हडी कामे

जाहाली म्हणजे आम्ही दिलीचे कारभारातून सुटलो गंगेकडे जाऊ बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. ११२
सफर १२ } श्री { श. १६७६ मार्गशीर्ष शुद्ध १३
इ. १७५४ नोव्हेंबर २७

राजश्री दामोदर माहादेव गोंसि

उपरी तुम्ही चिठी पाठविली ते पावली येक वेल फिरोन यावे लागेल म्हणून लिहिले तरी वारंवार दिकत काये म्हणून घेतात यादीप्रमाणे काम होत आसेल तरी करणे नाही तरी साफ जाब घेणें येथून कूच व्हावयाचे येथील कामावरी आहे गंगास्नानास जावयाचे आहे यासाठी त्वरा करणे नाही तर काये होते ते करणे उगेच लावणीखाली न घालणे जाणिजे छ १२ सफर बहूत काये लिहिणें [ब.*] लेखन । सीमा

---

ले. ११३
सफर १२ } श्री { श. १६७६ मार्गशीर्ष शुद्ध १३
इ. १७५४ नोव्हेंबर २७

राजश्री दामोदर माहादेव गोसावी यांसि

उपरी तुम्हीं गावांत जाऊन दोन दिवस जाले आम्ही येथे किती दिवस बसावे तुम्ही कामाकाजाची पेरवी कसकसी केली हे लिहिणें लौकर निर्गम करणें खान खानाची समजावीस त्याणी परभारीच करून त्यास गावात न्यावे याचा विचार याणी कसकसा केला आहे ते लिहिणें त्याणी परभारे त्याची समजावीस करून न्यावे उतम आहे जाणिजे छ १२ सफर [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. ११४
सफर १२ } श्री { श. १६७६ मार्गशीर्ष शुद्ध १३
इ. १७५४ नोव्हेंबर २७

राजश्री दामोदर माहादेव गोंसि

उपरी चिठी पाठविली ते पावली जलालदीखान वजिराकडे गेला आहे आलियावरी सेवेसी येतो येकदा तेथे येऊन फिरोन येथे यावे लागेल म्हणजे फडशा होईल म्हणून लिहिले तरी यांउपरी गुंता न ठेवणे केल्या करारयादीत गुंता आसिला तर तसेच लिहिणे नाही तरी यादीप्रो काम करून येणे गंगास्नानास जावे लागते फिरोन माघारें येते वेलेसही कामे फार आहेत दिवस येथेच फार गेले याउपरी विनाकार्य उरकल्याखेरीज उगेच न येणे जाणिजे छ १२ सफर बहूत काये लिंहिणे आग्याप [ लि.* ] कारभार सुस्त करिता हे काये आम्हास दिलीचा कटाला आला आहे

लौकर होये ते करणे तुम्ही येथील राहाणार तुम्हास कंटाला न ये त्यास आम्ही कसे करावे तरी लौकर कारभार करून येणे [ ब.* ] लेखन। सीमा

पो छ १३ सफर

---

ले. ११५ सफर १४ } श्री { श. १६७६ मार्गशीर्ष शुद्ध १५ इ. १७५४ नोव्हेंबर २९

राजश्री दामोदर माहादेव गोसावसी

उपरी तुम्ही गेलिया उपरी दोन प्रहर रात्री गंगाधर येशवंत आले ते कितेक मजकूर बोलिलें यैशास तुम्ही व जलालदीखान मोठे प्राथःकाली उठोन अधी येथे येणे नवाचाकडे न जाणें करारमदार निश्चयात्मक ठहराऊन अस्तमानी जाणें म्हणजे गुता उरकेल जरूर जरूर येणे जलालदीखानास अधी घेऊन येणे जाणिजे छ १४ सफर [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन। सीमा पो छ १५ सफर

---

ले. ११६ सफर १५. } श्रीशंकर { श. १६७६ मार्गशीर्ष वद्य १ इ. १७५४ नोव्हेंबर ३०

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसि

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्ही पत्र पाठविलें ते छ १४ रोजी प्रविष्ट होऊन सकल आर्थ ध्यानास आला सारांश बक्षीस हाती घ्यावे हे गोष्ट येथार्थच अहे येविसीचा मजकूर तपसीलवार रा। सखाराम भगवंत व रा। गंगाधर येशवंत यांसि लिहिले अहे ते सांगतील त्याप्रा। वर्तनूक करून स्वामीकार्ये उतम रीतीने होये तो विचार करणे [नि.*] तुम्ही सखाराम भगवंत व गंगाधर येशवंत याचे विचारे काम करणे सारांश तुम्ही विचार केला तो यथार्थच आहे त्याआन्वयेच त्यास लिहिले आहे जाणिजे छ १५ सफर बहूत काये लिहिणे [ब.*] लेखन। सीमा

---

ले. ११७ पौ सफर २४ } श्री पौ छ २४ सफर { श. १६७६ मार्गशीर्ष वद्य १० इ. १७५४ डिसेंबर ९

राजश्री दामोदर माहादेव व बापूजी माहादेव गोसावी यांसि

उपरी तुम्ही लिहिले ते विचार सर्व कलले यैशास जे ईश्वरे नेमिलें आसेल ते तरी होतच आहे परंतु मोठा विचार येक आहे की गाजदीखानाने या वेलेस अम्हावरी टाकिलें आहे तरी फारच उतम आहे अमचें हे यैकावें काये म्हणाल तरी आपण थोडेच

स्वारानसी जातीने उठोन सुभेदाराकडे यावें म्हणजे सर्व रसायेन होऊन येईल कोणासही काकुलती यावे लागणार नाही सुभेदाराकडील उपद्रव किरकोळी आतील बाहेरील काही लागणार नाही अमच्या लोकात दग्याची गोष्ट सहसा नाही हे नवाबाने खातरजमा राखोन बापूकडुन त्याची निशा पाडून या गोष्टीवरी येईल तरी फारच वरें आहे कुरुक्षेत्रास च्यार हजार फौज देऊन रवाना करावयाचे जाले तरी फारच बरें आहे तेथून पुढे फौज गेली तरी नवाबाने अमचा रुपया न द्यावा येसा करार पाहिजे तरी करावा पुढे आमची फौज माघारी दाहा बारा रोजात येईल तो स्नान करून येऊ रुये घेऊन जयेनगरास जाऊ यांत आंतर नाही काहीच तोड न निघे तरी जे ईश्वरे नेमिले आसेल तें होनच आहे तूर्त आम्ही आपले तर्फेने बेमानी करीत नाही केवल गाजदीखान माजोरीपणच करील तर पाहातच आहों [व.*] लेखन। सीमा

पौ छ २४ सफर

---

| | | |
|---|---|---|
| ले. ११८<br>सफर २४ | श्रीशंकर | श. १६७६ मार्गशीर्ष वद्य १०<br>इ. १७५४ डिसेंबर ९ |

राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसि

उपरी तुम्हास कारभार मलमलीत करणे कसा म्हणाल तरी मागे दवलतरावास पत्र लिहिले होते ते तुम्ही वाचले किंवा नाही हे कलले नाही असो खुलासा इतकाच कीं जर नवाबास लाहोर सरहद्द देणे असते तरी आम्ही पोहचाऊन दिल्हे तरी काये चिंता होती तो भलत्या प्रकारे लाहोर काईम करिता आथवा हरप्रकारे समाधान करावयाचे होते तुम्ही म्हणाल कीं सर्वप्रकारे समाधान करीत असता तोच आइकत नाही ऐसियासि समापत्रा[प्रो*] सारे मातबर मेळऊन करावे कीं जर या गोष्टीत गाजुदीखानानी तफावत केली तरी सारे लोक खानखान्याचे सोबती तेव्हा कदाचीत निशा पडेलसे वाटते तुम्ही म्हणाल कीं सारे लोक खानखान्याचे हवाले केल्यावर मग आमचा जीव तरी कसा वाचतो ऐसियासि गाजुदीखानास बेइमानीच करणे नाही तेव्हा मग यास चिंता काये मग लोक खानखान्याकडे कशास होतील तस्मात लबाडी कोणाकडे हे पाहाणे इतकेही असून आमचा पैकाही देत नाही आम्ही सर्व गोष्टीस नवाबाचे राजी आम्हास नवाबानी पैका द्यावा परंतु येका गोष्टीस मात्र गैर राजी आहो येक खानखान्याचे हात बाधून देणे हे मात्र आमच्याने होत नाही यासिवाये आम्ही राजी असता नवाब रुये न देई तरी आमचे समाधान कसे राहाते तुम्हीच च्यार घटका मनन करून पाहाणे कीं आम्ही सर्व प्रकारे राजी असता तीनही प्रकारास राजी असता रुये न देई तरी आन्याचे कोणाकडे पहिल्या दोन्ही गोष्टी न होत म्हणौन म्हटले कीं आम्ही दक्षणेस त्यास घेऊन जातो – रुये देणे तेही होत नाही

हे काये आहे तुम्ही सख्त चागले बोलत जाणे तुम्ही न बोलल्यास हे शब्द तुम्हावर येतील छ २४ सफर बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. ११९
सफर २४

श्री

श. १६७६ मार्गशीर्ष वद्य १०
इ. १७५४ डिसेंबर ९

राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसी

उपरी मनसब्याचा डौल संपूर्ण ध्यानांत आला वजिरांचे मते चित्तापासून लाहोर द्यावें ऐसें नाही ऐसे असल्यास अम्हीं खानखानास कुरुक्षेत्रपर्यंत पावतें केल्याने वजिरास संशये न पडता तेव्हां चित्तापासून लाहोर देणे नाही समजाविसीचा मजकूर तर आंतील आंत दलवालीसिंग व नागरमल यांची साफ चित्तापासून निशां केलियास सहजेच निकाल निघतां हेंही चित्तापासून वजिरास कर्तव्य नाही असू आमचा मजकूर तरी हरयेक तऱ्हेने खानखान्याची समजावीस व्हावी ते त्यांस मनापासून न करणे तेव्हां केवळ खानखानास हात बांधून देणे सरदारीस योग्य नाही याजकरितां तूर्त अम्ही गंगास्नानास कूच करून जातों वजिरास जे विहित दिसेल ते करतील दोन्ही तिन्ही पर्याये वजीर करीत नाहीत तेव्हां अम्ही गंगास्नानास कूच करून जातों मंगळवारी कूच नेमिले आहे तुम्हास कळावें बहूत काये लिहिणे छ २४ सफर सो कलावे [ ब.* ] लेखन । सीमा पो छ २४ सफर

---

ले. १२०
सफर २४

श्री

श. १६७६ मार्गशीर्ष वद्य १०
इ. १७५४ डिसेंबर ९

राजश्री दामोदर माहादेव गो

उपरी राजश्री दौलतराव मुरार तुम्हाकडे पाठविल्यावरी काहींच जाबसाल तुमचा आला नाहीं याजकरितां आजी मुकाम केला त्याजवरी तुमची चिठी आजी आतांच आली कीं कूच करून च्यार कोस जावें जलालदीखानास व सतारकुलीखानास आजी घेऊन येतों म्हणून तपसिलें लिहिले ते सर्व कळले आशास तुमची चिठी काली रात्रीस आली असती तरी आजी कूच कलें असतें कही मरावयासी घोडी तटे उटे गेली संध्याकाळीं च्यार घटिका दिवसा येतील याजकरितां आजी मुकाम जाला उदैक कूच करून येमुनातीरास जातो तुम्ही जलालदीखानास व सतारकुलीखानास लौकर घेऊन येणें जाणिजे छ २४ सफर -जलालुदीखानास व सतारकुलीखानास तुमचे विचारे आजीच आणावयाचे जाल्यास { घे } आजीच घेऊन येणे अथवा उदैक घे[ ऊ* ]न येणे कित्तेक मजकूर बोलणे चालणें ते तुम्हांसी बोलिलोच आहे व

दौलतरायाबराबरी सांगोन पाठविले आहेत जाणिजे छ मार काल दौलतरायास आम्हीं आपले हाते कागद दोन बंद लिहिला आहे तो तुम्ही वाचोन पाहिलाच असेल नसेल वाचिला तरी वाचोन पाहाणें त्याजवरून सर्व मजकूर कलेल [ ब.* ] लेखन । सीमा पौ छ २४ सफर

---

ले. १२१ } श्री { श. १६७६ मार्गशीर्ष वद्य १२
सफर २६ } { इ. १७५४ डिसेंबर ११

राजश्री दामोदर माहादेव गो

उपरी खासा स्वारी गंगास्नानास जाते त्यास तुम्ही बराबरी असावें त्यास आपला डेरादाडा सरंजामसुधा लौकर येणें तुम्हास जरूर नेच( आलेच ) पाहिजे रोहिल्या-कडील कामकाजाचा निर्गम होणे याजकरितां तुम्हीं लौकर येणें जाणिजे छ-२६ सफर [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. १२२ } श्री { श. १६७६ मार्गशीर्ष वद्य ३०
सु. ११५५ सफर २८ } { इ. १७५४ डिसेंबर १३

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार .उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्हीं पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले पातशाहा वजिराकडे तूर्त ऐवज येणे त्यापौ तेरा लक्ष बाकी होती त्यास नगद ऐवज तों न मिले यास्तव परगणे तोडून घेतले तेथील ऐवजावर हर कोणी साहुकार श्रीमंत राजश्री दादा-साहेबाची निशा करणार व पुढे रोहिल्याकडील जाबसाल लागला आहे येथेच मामलत विल्हेस लागेल व गुजराथ प्रांतीची मामलत स्वामीनी सांगितली आहे त्यास ऐवजही सरकारात बाकी आहे देसी लोकाच्या देणियाचे तगा{दा{दे लागले आहेत सेवकाची पत राखणार स्वामी समर्थ आहेत म्हणोन लिहिले ते कलले ऐशास सरकारात दुसरा रुपये देतो त्या प्रा [ नि.* ] तुमचे कमाविसदार कबूल न करी याजकरिता दुसरियास सांगणे लागला जाणिजे छ २८ सफर सुा खमस खमसैन मया अलफ [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

पौ छ १४ रबिलाखर

---

फले पुढेच आहेत ते फल पावल्याखेरीज झाड लाविल्याचे सार्थक काये असियासि साप्रत कलले त्या रीतीने काम निग्नून लौकर आमचे कूच होये ते करणे सारीच कामे नि[ क* ]डीची आहेत त्यामध्ये कोणते निकडीचे नाही कीं जे आठ च्यार दिवस लागले तरी कामास येईल तथापि हिंदुस्थानातीलच जे काम आहे ते तरी सर्वांपेक्षा आगोधर घेतलेच पाहिजे त्याखेरीज कूच होणारच नाही बंगाल्याचे रुप-याच्या वराता व जागीरीचे वगैर काम लौकर लौकर करून घेणें [ नि.* ] जाणिजे छ मजकूर [ ब.* ] लेखन ! सीमा

---

ले. १२६ } श्री { श. १६७६ पौष शुद्ध ८
रवल ७ } { इ. १७५४ डिसेंबर २२

राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यासी

उपरी जीवनसेटीचे पैकियाबदल येयून रा॰ कुकाजी सिवराम व त्रिंबक खंडेराव पाठविले आहेत त्यास रुपयाची ताकीद करून जीवनसेटीचा पैका लौकर वसुलांत ये तें करणें येथील कारभार विल्हेस लागला खानखाना काली गांवांत गेलें राजश्री मलारचाचे लस्करास आजी उतरावयासी सागितले आहे उतरतात बुनगे येथें ठेवावयाचे ते ठेऊन गंगास्ना[ ना* ]स सडे जाऊ समसामतदौलाकडलि पैका येणें त्यासही ताकीद करून वसुला ये तें करणें सारांश हाच कीं याज उपरी गुंता काही राहिला नाही रुपयाची ताकीद सितावीने करून रुपया ये ते करणें जाणिजे छ ७ रबीलौवल [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. १२७ } श्री { श. १६७६ पौष शुद्ध ८
रवल ७ } { इ. १७५४ डिसेंबर २२

राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसी

उपरी तुम्ही चिठी पाठविली ती पावली चंदेरीच्या चिरेखान्याची सनद पाठविली ते पावली लस्कर सारे पार जातें याजकरितां कितेक लोक नानाप्रकारें संशय घालितात याजकरिता याचा विचार करावा म्हणून लिहिले त्यास याचा विचार अगोधरच करून तुम्हांस लिहिलें आहे सुभेदार व सखारामपंत जयनगराकडे जातात आम्ही मात्र गंगास्नानास जाऊन मुलकास उपद्रव न करितां माघारे येऊ मग लटिके संश[य*] कां मानितात वजिराचे चितापमाणेंच केलें याजउपरी आमचे रुये लौकर पाठऊन द्यावे कोणेविसी इसका न द्यावा याउपरी लटिके संशय मानिल्या कार्यास येणार नाहीं धोंडावा नाईक यास येथे उदैक मगलवारी उजेडता येऊन पोहचत तें करणें खानखाना जन्नात राहिला आहे कदाचीत त्यास कोणी सला देतील आणि लस्करांत

फिरोन येईल तरी कार्यास येणार नाहीं सावध राहाणें व वाटेस चौक्या वजिराच्या ठेवणे रोहिल्याकडील मजकूर तरी तिकडे जाणे होतच आहे तिकडे गेलियावरी सारे विल्हेस लाविले जाईल त्यास तुम्ही लेहून पाठवणें की कोणेविसीं वसवास न खाणें हुड्यापाड्या ठीक करून घेणें म्हणून लिहिणे आणि तुम्ही येक जण आम्हासमागमे जावयासी येणे सारी फौज मलारबा आदीकरून गंगेकडे जावयाचा विचार होता त्यास न जावे हे तुम्ही बोलाल याजकरितां सुभेदारांचे निमे लस्कर उतरेलें असतां त्याजकडे हा विचार सागोन पाठऊन लस्कर नदी उतरे होते ते माघारें फिरविलें लटिका संशय याजउपरी घेतल्यास कार्याचा नाहीं तुम्ही मोठे प्रातःकालीं येणे कितेक मजकूर दौलतराव यासी त्याहावयासी सागितले आहेत त्याचे कागदपत्र वगैरे कामकाजे अवघेच लाहान मोठे सर्व घेऊन येणे जाणिजे छ ७ रबिलौवल सोमवार संध्याकाल प्रहर रात्र [ नि.* ] रोहिल्याकडील बाकी.फार येणे यैसे असतां तुम्ही लिहिलें कीं दोन लाखाच्या हुड्या देणार तरी हे काये दोन लाखाच्या हुड्या घेऊन चाटाव्या की काये तरी तुम्ही रोहिल्यास साफ लिहिणे की हुड्या आम्ही दोन लाखाच्या घेत नाहीं तुम्हीं जुझावयास तयार होणे म्हणून लिहिणे त्याजकडे साडे सोला लाख रुपये [ घे* ]णे त्यास येंदा त्याणी साडे साहा लाख रुपये द्यावें हा करार आहे म्हणून राजश्री मलारबाही बो{ला}लत होते व तुम्हींही बोलत होता यैसे असोन आतां दोन लाख देतात म्हणून लिहितां हें उतम नाहीं रोहिल्यानें येंदा साडे साहा लाख रुपये द्यावे तरीच त्याचा आमचा सलूख राहील नाही तरी बिघाड होईल तरी तुम्हीं त्यास हा मजकूर समजाऊन लेहून ठीक करून ठेवणे त्याचा आमचा करार तीन साला साडे सोला द्यावे याप्रा रोहिल्यानेच रदबदल करून करार केला आहे कराराप्रा यैवज द्यावा जाणिजे छ मजकूर [ ब.* ] लेखन । सीमा

पो छ ९ रावल

---

ले. १२८ } श्री { श. १६७६ पौष शुद्ध १०
रवल ९ } { इ. १७५४ डिसेंबर २४

राजश्री बापूजी माहादेऊ व राजश्री दामोधर माहादेऊ गोसांवी

दंडवत विनंती उपरी नवाब खानखानाच्या सनदा आद्यापि होऊन आल्या नाहींत दिरंगाखाले पडल्यानें आजी तागाईत जे केलें तें व्यर्थ याजकरितां त्यांजकडील सनदापत्र जलद येऊस त्यांस पोहचत आणि त्यांची रवानगी होये ते करणें येविशी श्रीमंतानीही तुम्हांस लिहिले आहे आणि नवाब वजीर व नागरमल व जलालुदीखान यांसी पारसी पत्रें श्रीमंतांनी लिहिली आहेत तरी तुम्हीं येविशी चितावर धरून त्याचे कार्य होऊन प्रयाण करीत तें करणें छ ९ रालौवल हे विनंती [ ब.* ] मोर्त । व सुद

पौ छ १० रबिलावल

---

ले. १२९ पौ रवल १० } श्री पौ छ १० रावल { श. १६७६ पौष शुद्ध ११ इ. १७५४ डिसेंबर २५

राजश्री दामोदरपंत स्वामीचे सेवेसी

पो सखाराम भगवत सां नमस्कार विनंती उपरी श्रीमंत कूच होऊन अजी दोन कोस गेले अम्ही नदी उतरून आलीकडे आलो उदईक येथून कूच करून सुभेदार-सहवर्तमान जाऊ श्रीमंत गंगेवरी गेले रोहिल्याचा सालजाब होणे तो जाला आहे अजच तुमच्या ग्रहस्तची पत्रे आली त्यात तीन लक्षाच्या हुंडया तयार केल्या आहेत फौज आली म्हणजे बाकीचीही निशा यावी येसे लिहिले आहे परंतु तुम्ही येथून जलदीने रोहिल्यास आपणाकडील ग्रहस्तास लेहून येवजाची निशा चागली पडे येसे करणे हे गोष्टीस तेथे काही हिसका बसला तरी श्रीमंत च्यार दिवस तेथे गुता करितील तेव्हां सहजच आम्हास येखादे जागा मुकाम करून राहाणे लागेल यासाठी तेथील गुता लौकर उरकून त्याचे येणे त्वरेने होयेसे करणे आथःपर त्या कामाखेरीज इकडील गुंता किमपी ठेविला नाही येवज दिलीचा समसामुदोला कडील व गेराकडून येका दो रोजात वसुलात आणून उत्तर पाठवणे धोंडाजी नाइकास जरूर आम्हाकडे पाठवणे चाल गोविंदास व रामाजी नाइकास मिलोन रुये देविले आहेत ते पावते करवणे गोविंद बलालाचा रुये दोन लक्ष येणे ते धोंडाजी नाइकाकडून सत्वर आम्हाकड रवाना करणे साडे चौ लाखाची निशा नाइकाकडे जाली आहे त्यावरी काही नालबदीच्या वराता जाल्या आहेत वरकड येवज बाकी राहिला आहे तो जमा करून ठेवणे ज्यास देवितील त्यास दिल्हा पाहिजे याउपरी नवी जाहागिरीचे कागद-पत्र पावताच आम्हाकडे पाठवावे जरूर प्रयोजन आहे लौकर पाठवावे आणीक कितेक बोलणे आहे परंतु गाठ पडता दिसत नाही आसो तूर्त रुपयाचें काम येकंदर बाकीस न ठेवावें श्रीमंताचा संतोष यात आहे विस्तार किती ल्याहावा हे विनती

---

ले. १३० रवल १० बुध. } श्री { श. १६७६ पौष शुद्ध ११ इ. १७५४ डिसेंबर २५

राजश्री दामोदर माहादेव गो। यांसी.

उपरी दौलतराव मुरार यांस हस्ती आला आहे तो व पातशाहानी अम्हास हस्ती दिल्हा तो असे दोन हस्ती तुम्हाकडे आहेत त्यांस उदईक तुम्ही हजूर येतेसमई दोन्ही हस्ती समागमे घेऊन येणे सेवट दोहींतून येक तऱ्ही घेऊन येणे शुज्याउदौला-कडे पाठविला पाहिजे जाणिजे छ १० रोवल बुधवार च्यार घटिका रा[त्र] [व.*] लेखन । सीमा पो छ ११ रावल

---

ले. १३१ } श्री { श. १६७६ पौष शुद्ध ११
खल १० } { इ. १७५४ डिसेंबर २५

राजश्री दामोदर माहादेव गो। यांसी

उपरी त्रिंबकपंतास तेथें ठेऊन तुम्ही स्वारीसमागमे येणे म्हणून तुम्हास चिठी पाठविली होती हा काळवर तुम्ही न आला म्हणून हें पत्र सादर केलें आहे तरी खानखानाचे कारभारास बापूजी माहादेव यांस दिलींत ठेऊन तुम्ही हजूर येणे त्रिंबकपंतासही दिलीचेच कारभारास ठेवणे व तुम्ही जलद येणे येक लक्ष [ नि.* ] पर्यंत ऐवज रोख घेऊन येणे आम्ही आज गाजदीनगरावरच आहो येथून दिली पाच कोस आहे आमचे कूच तुम्हासाठी राहिले आहे जर कुकाजी सिवराम व त्रिंबक खंडेराव आले ऐवज त्याणी आणिला आसिला तरी तुम्ही ऐवज न आणणे जर त्रिंबक खंडेराव व कुकाजी सखाराम भगवंत याजकडे गेले तरी तुम्ही ऐवज घेऊन येणे त्याणी ऐवज लस्करात आणावयास निघाले आसिले तरी तुम्ही रिकामे येणे येथे आगदी भक्षावयास नाही सडी फौज आहे परंतु रोजमऱ्यासिवाये लुट(उप)वासी राहिले आम्ही येमुनेहून कूच केले तेथे रोजमरा दिल्हा याजमुळे गंगेपावेतो चिंता नाही परंतु गंगेस आजयाच व फिरोन येते वेलेस खर्चास वगैरे ऐवज मातबर पाहिजे दोहमाही लोकाचा गवगवा आहे तरी येकपर्यंत ऐवज आणणे त्याणी आणिला तरी तुम्ही रिकामे येणे जाणिजे छ १० रावल तुम्ही पत्र पावेल ते क्षणी येणे छ मजकूर बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा पो छ ११ रावल

---

ले. १३२ } श्री { श. १६७६ पौष शुद्ध १३
पो खल १२ } { इ. १७५४ डिसेंबर २७

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसी

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणें विशेष तुम्हीं पत्र पाठविले प्रविष्ट जाहालें लिहिले वर्तमान सविस्तर कलले [ नि.* ] तुम्ही चाकरीत येकनिष्ट वर्तणे बालाजी सामराज याणी पत्रे दाखविली त्याजवरून [ सर्व ] वर्तमान कळले येविसी सखाराम भगवंत यास लिहिले आहे राजश्री खंडेराव याचा व बक्षीचा येकोपा करून बाहेर काढणे सविस्तर तुमच्या लिहिल्यावरून सखाराम भगवंत व गंगाधर येशवंत यास लिहि...[ त्या ] जवरून कलले तुम्ही ते सागतील त्याजप्रो ....केलियाने तुमचे कल्याण आहे जाणिजे ... [नि.*] बहूत काये लिहिणे [ब.*] लेखन । सीमा [ पो छ ] १२ [illegible]

---

ले. १३३ } श्रीशंकर { श. १६७६ पौष शुद्ध १३
खल १२ } { इ. १७५४ डिसेंबर २७

राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यासि

उपरी तुम्ही लिहिले की परगणे साडे च्यार लक्षाचे ऐवजी नबाबानी दिल्हे त्यास चंदा खरीफ तरी नबाबाचे दंग्यामुले रोहिल्यानी व गैर लोकानी खराबी केली पुढे रबीचा मात्र भरवसा आहे स्वामीचे पुण्यप्रतापे उगवेल ऐसियासि साप्रत धडक आमल खरीफाचाच चालत आहे आमची बातमी आहे मीही मुलकाचे जवलच आहे जलालाबाद वगैर परगणे घेवून आमच्या बातम्या आल्या आणि तुम्ही हे लिहिता हेच आपूर्व आहे आगोधर करार जाहाला तेव्हा ऐवजास चो महिन्याचा वाइदा नव्हता काही नूर्त काही महिन्याने काही दोहो महिन्याने काही तीही महिन्याने काही चोहो महिन्यानी ऐसे करून सारे रुये भरावे ऐसे होते ते सेवटी सारेच फाल्गुने पूर्णिमेस साडे तेरा भरावे ऐसे जाहाले असो अजून पुढे तपसील न लावणे आता तपसील कामास येणार नाही सारे फाल्गुनी पूर्णिमे आलीकडे रुये भरून घेईन नाही तरी तुमचे स्वरूप राहाणार नाही नबाब लबाडी करीत आसिले तरी आम्ही आज बिगाडास तयार येक्या पायावर आहो आम्ही ईश्वराचे दयेने चिंता धरीत कोणाची नाही तुम्ही केवल वजिराचेच न होणे लोकर समसामद्दौलाकडील रुपये व बगालियाचे वगैर तमाम कागद घेऊन येणे हे काम बापूस सोपून तुम्ही येकटे येणे बापूजी माहादेव याचे हाताखाली पाहिजेत तरी त्रिंबक मल्हारीस ठेवणे आम्ही दोन मुकाम गाजदीनगरावर पुढे तुमचे पत्राची वाट पाहात बसलो आहो त्यासारिखा सलूख आथवा बिगाड करणे तो केला जाईल जलाली व बिलराम या परगणेयाचा पहिला हप्ता भरला मुदत भरली ते रुये लोकर मुदतीचे दिवसी घेऊन येणे शंभर दिकती घेत न जाणे इतके दिवस कारभार नासला होता साप्रत ठीक जाहाला आहे आता तुम्ही आथवा नबाबानी आथवा हर कोणी दिकत घेतलिया कामास येणार नाही पत्राचे उतर साफ लिहिणे त्यासारिखे केले जाईल रोहिल्याकडील व गैर कामासाठी दामोदरास पाठवणे जाणिजे छ १२ रावल बहूत काये लिहिणे [ब.*] लेखन । सीमा

---

ले. १३४ } श्रीशंकर { श. १६७६ पौष शुद्ध १३
खल १२ } पो छ १२ रावल { इ. १७५४ डिसेंबर २७

राजश्री दामोदर माहादेव गोसावी यांसि

उपरी तुम्ही पत्र पाठविले ते पावले ऐसियांसि तुम्ही लिहिले त्याचा प्रकार सुधा परिछिन दिसत नाही वजिराची लबाडीचा भाव दिसतो कसा म्हणाल तरी मल्हारबा व सखारामपंत याणी न कुटता जयनगरास जावे व आम्ही न कुटता जाटाचे मुलका-

तून जयनगरास जावे हे होईल तेव्हा पैका सराफखान्यात आहे तो घ्यावा अेसे वजीर बोलले हे सारी लबाडीच दिसते मल्हारबा व सखारामपंत गेले ते कुटिल्या- खेरीज राहाणार नाहीत रेवाडी वगैरे बहुधा कुटले जातील तेव्हडेच निमित्य टेऊन पैका न द्यावा हा त्याचा आशये आम्हास कदाचित रोहिल्याने साडे पाच कबूल केले आहेत त्याच्या उगवणीस च्यार दिवस आधिक लागले तरी देणार नाहीत आम्हास तर हजारो कामे करणे आमची बाकी रोहिल्यांकडे व सुज्यातदौलाकडे व जाटाकडे व गैर हजारो कामे आहेत आम्हास महिना पंधरा दिवस लागले तरी यात नवाबाचे पदरचे तीन चवल काये वेचतात आम्ही मुलकास ताकीद उतम प्रकारे केली आहे ते तुम्ही याल तेव्हा पाहाल आथवा खबर घेऊन जाणे कीं कसी ताकीद आहे आम्ही नवाबाचे मुलकास हात लावीत नाही अैसे असता नवाब जर रुचे मुदत पुरलेली असता रुपया न देत तरी सहजच आमचे व नवाबाचे लुटले बहूत करून तुम्ही लिहिले या अन्वये लुटेलच आसो आम्ही आपले इमान जतन केले आहेत गाजदी- नगर व डासणे व गैर मुलूक जसा आपला मुलूक राखावा त्याहीपेक्षा आधीक राखितो आतःपर नवाब रुचे न देत तरी मग परमेश्वर करील तेच होईल आम्हास रोज वेर आड घालून ते कबूल करू तेव्हा रुपये देईन अैसे नवाब म्हणेल तरी आम्हास साफ पुरवत नाही तुम्ही नवाबास साफ सागणे तुमचा सलूक होत नाहीं हजार लबा{ड{ड्या या दिवसात करितात मल्हारबास व सखारामास जयनगर प्राते निरोप दिल्हा आम्ही गंगोबास घेऊन गंगेकडे चाललो पुढे मुलुकास उपद्रव करणार नाही म्हणोन नवाबास लिहिले व ताकीद निक्षूण केली अैसे आसता जेव्हा रुपेये देववीत नाही तेव्हा सलूख राहाणे कललच आहे नवाबानी गर्व मनात न आणावा तुमच्या घरी खानखाना आहेच तुम्हास पाहिजे तरी आणिक हंगामा करितों नवाबाचा मुलूक मारितो त्याच्याने जे होईल ते करोत आजच बिघाड करितो पत्राचे उतर येई तोवर वाट पाहातो मग बिगाड करितों मुलूक मारितों जर नवाबास आमची मर्जी राखणेच तरी या घटिकेस पैका जंतरास पोहचाऊन द्यावा व समसामुद्दौलाकडील गुता उरकावा व गैर गुते उरकावे समसामुदौल्याच्या अैवजाची तर गोष्टच नाही तो अैवज आम्ही कोण्हापासून घ्यावा तस्मात लबाडीच दिसते नवाबास आमचा विस्वास पुरत नाही म्हणोन इतके लिहितात आम्हास काये विस्वास नवाबाचा आहे कीं आम्ही व मल्हारबानी जयनगरास कुटिता जावे आणि हा मागाहून पैका देईल हा आम्हास काये विस्वास तुम्हीच मनात पाहाण या पत्राचे उत्तर येईतोपर्यंत मी उगाच आहे आणीच च्यार महिन्याची मुदत केली तेही भरून फिरोन रुपया देववीत नाहीत तस्मात पुर्ता लबाड अैसे ठाऊक परमेश्वर सता प्रमाण त्याचे मनात भवितव्य काये हे काये केले नाही तरी साफ लिहिणे म्हणजे मल्हारबास बोलाऊ व तदुंदा करावयाच्या त्या करू जाणिजे छ १२ रावल बहूत काये लिहिणे [ ब.° ] लेखन । सीमा पो छ १२ माहे

ले. १३५ } श्री { श. १६७६ पौष शुद्ध १४
रवल १३ } { इ. १७५४ डिसेंबर २८

राजश्री दामोदर माहादेव गोसावी यांसि

उपरी तुम्हीं व जलालदीखान याणी रा। कुकाजी सिवराम व त्रिंबक खंडेराव याज-बराबरी सांगोन पाठविले त्याजवरून आम्ही कूच करून गढमुक्तेश्वराकडे गंगास्नानास गेलों राजश्री मलारबाकडील लोकासही ताकीद केली आहे शहरचे लोकास उपसर्ग लाविणार नाहीत येविसी पत्रें मलारबास व सखाराम भगवंत यासी लिहिलीं आहेत हे त्याजकडे रवाना करणें तुम्ही लौकर येणे येसी पत्रें तुम्हास पाच वेळा लिहिलीच आहेत बापूजी माहादेव कारभार जो तेथील असेल तो करितील तुम्ही कारभारास न गुंततां रुये बाकीचे घेऊन सत्वर येणे जाणिजे छ १३ रबिलौवल [च.*] लेखन। सीमा

---

ले. १३६ } श्रीशंकर { श. १६७६ पौष शुद्ध १४
रवल १३ } { इ. १७५४ डिसेंबर २८

राजश्री दामोदर माहादेव गोसावी यासी

उपरी बंगालियास राघो नीलकंठ पाठविले होते त्याचा जाब आला कीं बराता हुजूरच्या पातशाही आल्या म्हणजे ते क्षणी ऐवज देऊ खोट करणार नाही ऐसियासी तुम्ही बंगालियावर तनखा करून घेतलीच आहे ते कागदपत्र पावेल ते क्षणी रवाना जलद करणे म्हणजे बंगालियाचेही ऐवजापैकी काही ऐवज सरकारात येईलसे आहे ऐसियांसि जाहागिरीचे व दक्षणचे व गैर कागद राजश्री सखाराम भगवंत याजकडे पाठवणे व बंगालियाचे कागद जलद हुजूर पाठवणे यास उसीर न करणे वरकड गया व गैर कुरुक्षेत्र हासीलमाफीचे व गयेचे कागद आणविले आहेत ते सखाराम-पंताकडे आथवा हुजूर पाठवणे रुजू गयेचे कागद हुजूरच पाठवणे बंगालियाचे कागदाबराबर तेही पाठवणे आम्ही आज कूच करून दरमजल गणमुक्तेश्वरचे रोखे चाललो सत्वरच पोहचू ताकीद उतम केली आहे तुम्हास कलावे जाणिजे छ १३ रौवल बहूत काये लिहिणे [ च.* ] लेखन। सीमा पो। छ १३ रावल

---

ले. १३७ } श्री { श. १६७६ पौष वद्य १
{ इ. १७५४ डिसेंबर ३०

पुा राजश्री दामोदरपंत स्वामीचे सेवसीं

विनंती उपरी बाल गोविंद व रामाजी नाईक या जवळून मोहरा घेतल्या याची तनखा जीवनशेटीकडे जरूर दिल्ही आहे तो यैवज त्यापासून घेऊन परभारें आधी त्यास पावता होये ते करणे वरकड यैवज श्रीमंत गंगेहून येताच प्रविष्ट करणें दिकती घ्याव्या यांत किमपि जीव नाही अम्ही जे लिहिलें आहे त्यात प्रमाणच आहे तूर्त

अमचा प्रकार हाच की तुम्हास सर्व खोलून ल्याहावें बोलतों याप्रो करावें तुमचे चितास येईल ते तुम्ही करावें हेच खरे चाल गोविंदाची तेरीख आम्हाकडे वाढते तिकडे रुपया लौकर न ये चागला कारभार जाला आसतां हे प्रकार होतात तेव्हा तुम्ही जाणा अम्हावरी शब्द नाही या उपरी पर्याये ल्याहावें हें तुम्हास उचित नाही अम्ही जे ल्याहावयाचे ते लिहिले आहे या उपरी श्रीमंताकडे सालजाब लिहिला तरी कामास येईल चाल गोविंदापासून रामाजी नाइकापासून जाते वेलेस अडले तेव्हा मोहरा घेऊन गेले यैसे आहे त्यासी श्रीमंतानी निश्चयेपूर्वक सागून चिठ्या दिल्या हे विनती

---

ले. १२८ } श्री { श. १६७६ पौष मध्य
{ इ. १७५४ डिसेंबर असेर

राजश्री दामोदरपंत स्वामीचे सेवेसी

पो सखाराम भगवंत सां नमस्कार विनती उपरी आपण पत्र पाठविले ते सविस्तर अक्षेरशा कललें मुलूक पातशाही न कुदावा व जयेनगरी जाऊ तेव्हा रुये देतो म्हणून विस्तारे लिहिले यैशास सुभेदार व अम्ही तर तूर्त दरकूच च्यार मजला येथून अहिराचा मुलूक मवासी आहे तिकडून मारवाडच्या व जयेनगरचे शहाने जाऊ श्रीमंत पलीकडे गेले आहेत त्याची वाट तेथे अठ च्यार दिवस पाहू पातशाही मुलूक सेटाणीकडे इजारा आहे त्याची रखवाली करऊ वाटेने जाता लस्कर थोर आहे चालेल व अहिराचे मुलक़ात दाणा अर्णतील पातशाही अमली मुलकात उपद्रव होणार नाही याप्रो करितो याखेरीज तुम्ही म्हटलें की जयेनगरासच जावें तरी तीस चालीस कोस नीट मार्ग मवास यातही न जावें तरी तुमच्या मनातच आलें आसेल की क़ाही येक निमित्य ठेऊन पैका बुडवावा तरी जे ईश्वरे नेमिले असेल तें होईल तुमचा येत्न काये अम्ही कोणे येके प्रकारें येथून निकाल पडावा दुसरिया कामास लागावे यासाठी जयेनगर मारवाड या शहावरी जावे तेथून सालजाब लावावा तो श्रीमंतही येतील सहजच पुढें जाऊ या उपरी उगाच संशय चितात वजीर आणितील तरी तसेच लेहून पाठवणे आद्यापि काही बुडाले नाही जे कपाली आसेल ते होईल अम्ही जातो तिकडे वजिराची जाहागीर नाही अगर पातशाही खालसा नाही मवास चास काही देत नाहीत असे जागा गेलो तरी चिंता काये आहे उदईक खिलावरी जाऊ परवाही कूचच होईल सा कोस अट कोस रोज दररोज पाच सा मजली जाऊ मग मुकाम करू यांत काये चिंता आहे श्रीमंत तो किमपि कुटीत नाहीतच यैसा विचार आहे पुरुषोतमपंताचा अमल आजी महिनाभर सुरू जाला आहे आमचे लोक तेथे आहेतच यैसे असतां पर्याये लिहिता तुमच्या चितास येईल ते खरे याप्रो जलाली खिलरामचा मजकूर तुम्हास टोकणेच होते तरी

पहिलेच का टाकिले नाही आमचे दरबारचा दस्तूर आहे तो ठावका आहे विष्णू माहादेवास सनदा देसील जाल्या आसता फिरून तुम्हास दिल्हे हे सर्वास ठावके आहे तुमच्या चितास जसे येते तसे करिता यात उतम नाही कराल ते खरे जाहागिरीचे कागद चितास आले तर पाठवणे हे विनंती वरकडही कागदपत्र तयार करून पाठवावे श्रीमंत फरीदाबादेपलीकडून उतरून परभारे आम्हाकडे येतील हे विनंती

---

| ले. १३९ | | श. १६७६ पौष वद्य १२ |
|---|---|---|
| खल २५ | श्री | इ. १७५५ जानेवारी ९ |

राजश्री बापूजी माहादेऊ गोसावी यासी

दं असंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य [मो. जा.*] श्री मलारजी होलकर दंडवत विनंती उपरी येथील कुशळ जाणून स्वकीये लिहिणें विशेष पत्र पाठविले प्रविष्ट जाले लेसनार्थ कळों आला नवाब खानखाना यांचा मजकूर तपसिलें लिहिला त्यास खानखाना येथ अले त्या मजकुरांत तुम्हींच होता येथून त्याजला न्यावयाचा विचार तुमच्याच विद्यमाने जाला जंत्रांत तुमचेथ येऊन राहिले त्याचा अभिमान सर्व तुम्हासच आहे पुढेही त्याच्या ऊर्जिताचा विचार तुम्हीं करालच येविशी [ नि.* ] विस्तारे काये लिहिणे [ नि.* ] रा छ २५ रालोवल [ नि.* ] बहुत काये लिहिणें हे विनंती [ ब.* ] मोर्त । ब सुद

[ पाठीवर डाव्या हाताच्या कोपऱ्यांत ले. ३१ प्रो शिक्का* ]

---

| ले. १४० | | श. १६७६ माघ शुद्ध ६ ? |
|---|---|---|
| रखर ५ | श्री | इ. १७५५ जानेवारी १८ ? |

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री दामोदर माहादेव गोसावी यासी

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणें विशेष तुम्हीं पत्र कामातून पाठविले तें प्रविष्ट जाले लिहिले वर्तमान सविस्तर कलले आशास नवाब गाजुदीखान याणी येथें लौकर यावे हा आमचा मनोदये याजकरितां त्यास पत्र यावयासीं लेहून पाठविलें आहे त्यास तुम्हीं माघारे बकसीगासीं जाऊन त्यास सेनेसह वर्तमान जलदीने घेऊन येणे [ नि.* ] जाणिजे छ ५ रबिलाखर बहूत काये लिहिणें [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. १४१ } श्री { श. १६७६ माघ शुद्ध ८
रखर ७ } { इ. १७५५ जानेवारी २०

राजश्री बापूजी माहादेऊ व राजश्री दामोधर माहादेऊ गोसांवी यांसी

दं अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य [मो. जा*] श्री मलारजी होलकर दंडवत विनंती उपरी येथील कुशळ जाणून स्वकीये लेखन करीत जाणे विशेष राजश्री सेट्याजी खराडे याजकडील घोडी व वस्तभाव शहरांत गेली त्याविशी नवाब समसामदौला व नागरमल यांसी सागितले आणि तुम्हांसही सांगितलें ते समई मान्य करून गेला कीं शहरांत गेलियाउपरी घोडी व वस्तभाव देऊ अथवा त्याचा यैवज पावऊ यैसें ठरलियाउपरी हती तुमचे स्वाधीन केले त्यास अदियापि निकाल होऊन येत नाहीं समसामदौला प्रमाणीक माणूस त्यांचे वचनावर मान्य करून हती तुमचे स्वाधीन केले तुम्हीं नवाबास च्यार गोष्टी विचाराच्या सांगोन काही निकालांत आणिलेंच असेल सरकारचे कार्ये तुम्ही चित घाळून नवाब व नागरमल यांसी सांगून कार्य करून घ्यावे वारंवार काये ल्याहावें लेहतां थकलों याउपरी घोडी वस्तभाव येऊन पोहचत तें करणें [नि.*] रा छ ७ राखर [नि.*] बहूत काये लिहिणे हे विनंती [ब.*] मोर्त । ब सुदं

[ पाठीवर डाव्या हाताच्या कोपऱ्यांत ले. ३१ प्रमाणे शिक्का* ]

---

ले. १४२ } श्री { श. १६७६ माघ शुद्ध ८
रखर ७ } { इ. १७५५ जानेवारी २०

विनंती उपरी नवाबाचा रुका आला होता त्यात मजकूर की राजश्री दामोदर माहादेव यास हफीज रहिमतखान याजबरोबर पाठवावे म्हणजे रुपये घेऊन येतील यैसे लिहिले होतें तर तुम्ही हफीज रहिमतखान याजसमागमे जाऊन करारप्रमाणे रुपये वसूल करून येणे याज सिवाये येक लक्ष रुपये सरदाराचे नजरेचें त्यानी कबूल केले आहेत ते झाडून घेऊन येणे त्यात येक पैसा बाकी न ठेवणें या उपरी तुम्ही आम्हास पुसावयाचा शंशये न धरणें मारनुलेवा स्वार होऊन जाऊन लिहिल्याप्रमाणें कार्य करून येणे रा छ ७ रौखर तीन प्रहर रात्र बहूत काये लिहिणे हे विनंती

---

ले. १४३ } श्री { श. १६७६ माघ वद्य ५
रखर १९ } { इ. १७५५ फेब्रुवारी १

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहा
गोसावी यांसी

शेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहि
विशेष तुम्ही पत्र पाठविले प्रविष्ट जाहालें वजिराचे मुलकांतून सारा स्वारी आ

याजमुळे वजीर पैकीयाचे निकालास मागेपुढे घेतात त्यास येवज वसूल जाला पाहिजे याजकारिता हजार राऊत पाठवावे आणि खासा स्वारी कोलजलेश्वरावरून जावे ते करावे म्हणून तुम्हीं विनंतिपत्रीं लिहिलें आशास वजिराचे मुलकातून आमची स्वारी आली ते मार्गानेच आली मार्गी येतां येक दोन दिवस लागले ताकीद करून मुलुकाचा बचाव करीत आलो येसे असतां वजिराने विशमता मानून येवजाचे निकालास सुस्ती करावी रुपयाचा निकाल न करावा हे उचीत नव्हे येशा लबाड्या त्यास करणेच तरी आम्ही तयार आहो ईश्वर पाहून घेईल आम्हीं करारा प्रमाणें निभाविले असतां त्याजपासोन रुपया न ये तेव्हां आमचे जाणे देशास होतच नाही दिली भोवतेच फिरावे लागेल हे तुम्हास न कलेसे काये आहे तुम्हीं याजउपरी परिछिन्न वजिरास सागोन निकालावरी आणून रुपया घेणें जरी हें होत नाही तरी तुम्हीं तेथें राहोन फलादेश काये उठोन येणे आम्ही रुपया घेतल्या खेरीज जयनगराकडे जात नाही आम्हास परिछिन भरवसा नाही वास्तव आम्ही यमुनेचे काठी आहो तोच रुपये जीवनसेटीकडील व गैर रोहिल्याकडील वगैर घेऊन येणे नाही तरी साफ जाब लिहिणे आम्हास वजिरापेक्षा तुमचा मलमलीत कारभार तो पुरवत नाही राऊतही परिछिन मिलत नाही तुम्ही तपसिले [ लिहिले ते* ] आम्हासही कललेच आहे असो आतःपर परमेश्वर करील ते खरे आम्ही तरी तुमचा कागद आला म्हणजे पटपटगज देखलि विल्हेस लावितो आम्हास मलमलीत पुरवत नाही वजिराची खुशामत व तुमची होत नाही तोडावर मारूनच कामे करितो आतःपर विलंब न समजणे आजपर्यंत ताकीद आहे तींहि मोकली होईल व परमेश्वरे नेमिले आसेल ते होईल जाणिजे छ १९ रावर बहूत काये लिहिणे येक वजिरास व जलालदीखानास व जीवनसेटीस अैसी तीन पत्रें पाठविली आहेत रुपये दिल्हे तरी पाठवणे येथून शेभर राऊत पाठऊन लस्करात आणू नाही तरी साफ लिहिणे मग परमेश्वर ज्यास देईल तो घेईल मलमलीत तुम्ही लिहिल्यास तुम्ही फजीत पावाल येक रुवे पाठवणे आथवा साफ लिहिणे तिसरा पक्ष कामास सहसा येत नाही तुम्हाकडे हजार राऊत यावयास आनकूल पडत नाही पहिले राऊतही पाठवणे छ मजकूर [ ब.* ] लेखन । सीमा

---

| | | |
|---|---|---|
| ले. १४४<br>जवल १७ | श्री | श. १६७६ फाल्गुन वद्य ३<br>इ. १७५५ मार्च १ |

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष बहूत दिवस तुम्हाकडील पत्र येऊन तिकडील वर्तमान कलत नाही याउपरी दिलीकडील व चिरंजीव राजश्री दादाकडील सविस्तर वर्तमान

लेहून पाठवणे [ नि.* ] जाणिजे छ १७ जमादिलौवल [ नि.* ] बहूत काये लिहिणे सरकारची फर्मास जरूर पाठवणे सर्व प्रकारे कामकाज चिरंजीवाचे मर्जीप्रा करीत जाणे जाणिजे [ ब.* ] लेखन। सीमा पौ छ १९ रजब

---

ले. १४५ } श्री { श. १६७६ फाल्गुन वद्य ५ पूर्वी
इ. १७५५ मार्च ३ पूर्वी

त्याती व सुभेदारजीस बोलायाची पत्रे पाठऊन दिधली की पुश्करी जरूर येऊन पावणे त्याजवरून ऐकिलें जातें की सुभेदारजी व सखारामपंत हेही पुश्कर प्रांत जाऊन श्रीमंतासी शामील होतील पहिलें सुभेदारजीस जयाजी आपा यानी सांग लिहिलें की प्रस्तुत अपले यावयाचे ऐसें जरूर नाही अम्हीही इकडील कार्ये उरकून लष्करास येतो त्याजवरून सुभेदारजीहीं तो मार्ग टाकिला पु[श्करे]स सगट न जातां मालपुरा व लाय...नी मुकाम करून नासरीदा वगैरे मालपुरा ताळुक्यांतील गढ्या येक दोन्ही हो[त्या] त्यासी जाऊन लागले, व मुकामांत करून राहिले आहेत इकडीलही दबाव म्हणावा तर कनीरामजी जाऊन पावतचा आहेत असा काहीं इकडील गुंता राहिला नाही श्रीमंताहीं बोलाविल्यास न गेलियाही उतम नव्हे कदाचित जयाजी आपा यानी विश्राम न मानावे यास्तव बोढून विकतील तर न कले जयाजी आपानी स्पष्ट लिहिलें होतें कीं जरी तुम्हासी अमची..........अहे तर रूपनगरासी लाग.........

---

ले. १४६
जवळ २४ } श्री { श. १६७६ फाल्गुन वद्य ११
इ. १७५५ मार्च ८

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहिणे विशेष तुम्ही पत्रे पाठविलीं ती पावली सलाबतजंग याची अर्जी पातशाहास गेली त्याचा बयान लिहिला तो सर्व अवगत जाहाला ऐशियास त्याची पैरवी करणे ते इश्वरें केली असे आपले कर्मानुसार मागे फल पावले पुढे पावतील सरकारचा रुपया आजीतागायेत कोण्हाकडे किती ठहरला त्याचा वसूल कसकसा जाहाला बाकी येणे काये याचा बयाजवार हिशेब लेहून पाठवणे वरचेवरी वर्तमान लिहीत जाणे जाणिजे [नि.*] छ २४ जमादिलौवल वरचेवर यथार्थ वर्तमान तिकडील लिहीत जाणे बहूत काये लिहिणे [ब.*] लेखन। सीमा पौ छ १२ रजब

---

ले. १४७ जवल २९ } श्री { श. १६७७ चैत्र शुद्ध १ इ. १७५५ मार्च १३

राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसि

उपरी धोंडाजी नाइकास जाऊन च्यार दिवस जाहाले याजकरितां कूच करावयाचा विचार दोन दिवस न जाहाला आजी कूच करून खोज्याचे सराईजवल मुकाम जाहाला रुपये आले नाहीत रुपचास यावयास दूर पडेल याजकरितां या मार्गे येणे जाहाले उद्या कूच करून बारा कोसाचा मुकाम होईल तरी रुपये पेशजी लिंहिल्याप्रों राजश्री बाबूराव हरी याजबा पाठऊन देणे यानंतर फोजदारीचा मजकूर विलेस लावावा लागतो तुम्हाकडे कमावीस सांगावी लागते याजकरिता आपणाकडील कारकून शाहाणा माणूस पाठऊन देणें उद्याच्या मुकामास पाठऊन देणें उदईक मुकाम आलावरलीचे सराई आलीकडे अगर पलीकडे होईल तेथून लाब लाब मजली करून जाऊ ताकीद निस्तन लस्करास केली आहे मुलकास उपद्रव लागणार नाही किरकोल कागदपत्र सारे पाठऊन देणें कागदपत्र तयार होऊन सिके होत नाहीत हे काये आहे कागदपत्र येत नाही तेव्हां मुकाम करावा लागेल कीं काये अथःपर लौकर निर्गम अवघा करून घेऊन पाठवणें [नि.*] जाणिजे [नि.*] छ २९ जावल [नि.*] बहूत काये लिहिणे [ब.*] लेखन । सीमा पौ छ १ जालावल (खर)

---

ले. १४८ जवल २९ पाडावा } श्री { श. १६७७ चैत्र शुद्ध १ इ. १७५५ मार्च १३

सेवेसी बाबूराऊ केशव सां नमस्कार विनंती छ २९ जोवल वर्षप्रतीपदा मुा नाा रूपनगर प्रांत मारवाड सुखरूप असो विशेष आम्हीं आलियापासून पत्र येऊन सांभाल होत नाहीं आपली पत्रे तो येथे सर्वांस नित्य येतच आहेत परंतु आम्हीं गरीब छोटे-खानी आमचे स्मरण कोठून व्हावे हे येथर्थच आहे असो श्रीपुष्करची यात्रा जाली हालीं रूपनगरानजीक मुकाम आहे आणखी आठ च्यार रोज लागतील राजश्री गंगोबा तात्या आजी निरोप घेऊन राजश्री मल्हारबाकडे गेले ते तो तोड्यावर आहेत त्यास आणावयास म्हणौन गेले आहेत येतील न येतील हे पाहावे राजश्री जयापाकडून राजश्री रामराव नारायण आले आहेत त्याकडील मनसबा पडिला आहे विल्हेस कोणे रितीने लागेल ते पाहावे वरकड विनंती लिहिणे ते पेशजी लिाच आहे येते समई पांचसे मोहर जुनी सिका येथ बरोबर जरूर घेऊन आले पाहिजे पेशजी लिाच आहे व पूर्वी वारंवार विनंती केलीच आहे फार स्याहावेसे नाहीं आपण दिलीहून निघतील त्यापासून आम्हांकडे मिती लागेल आपण चिंता न करावी पदरचे आहे सर्व भरवसा मानून बेफिकीर आहे रुपा केली पाहिजे हे विज्ञापना

राजश्री कासी नाईक स्वामीस सा। नमस्कार विनंती उपरी पेशजी लि।प्रमाणे फर्मांश घेऊन यावी लोभ असो दीजे स्मरणपूर्वक आणणे हे विनंती

---

ले. १४९
सु. ११५५ जखर २
श्री
श. १६७७ चैत्र शुद्ध ३
इ. १७५५ मार्च १६

राजाश्रिया विराजित राजश्री दामोदर माहादेव गोसावी यांसि

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार सुहूर सन खमस खमसैन मया अलफ रेवाडी-कर आहिराची खंडणी जाली त्याचा वसूल काही आला बाकी राहिली आहे तरी तुम्ही शंभर राऊत पाठऊन त्यास तगादा करून रुपये वसूल करून लाला बाल गोविंद याचा गुमास्ता तेथे आहे त्याचे पदरी चैवज घालून रसीद हुजूर पाठऊन देणे जाणिजे छ २ जमादिलाखर [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.*] लेखन । सीमा

पौ छ १८ जाखर

---

ले. १५०
जखर १५
श्री
श. १६७७ चैत्र वद्य २
इ. १७५५ मार्च २९

राजश्री बापूजी माहादेव यासी नमस्कार नासिकास आलियावर तुमची हवेली बाग पाहिला सतोष जाहाला तुम्हीं केवल खावंदाचेच चाकर असे असता साप्रत येका-दो वर्षानी हुजूर यावे येथील मर्जीप्रा चाकरी करावी दुसरियाची हिमायेत मनात न आणावी येणेकरून परिणाम सुध खावंदाची रजावंदी चितापासून राहोत वरकड तेथील काम चिरजीवाचे मर्जीप्रा करणे [ नि.* ] छ १५ जमादिलाखर बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. १५१
सु. ११५५ जखर २०
श्री
श. १६७७ चैत्र वद्य ७
इ. १७५५ एप्रिल ३

राजश्री बापूजी माहादेव व रा। दामोदर माहादेव गोसावी यांसी

उपरी कडा व कुरा येथे राजश्री गोविंद बलाल याचे व बकाउलाखानाचे कटाक्ष लागले म्हणून दंगा माहालात याजकरितां वसूल तनखाचे रुपयाचा न जाला खरीफ मोगलानें नेले ते मजरा देत नाहीत म्हणून तुम्ही विनंती लिहिली त्यास कडा कुरा अठरा वीस लक्षांचे वसुली महाल त्याजवरी तुम्ही नवालक्षाची तनखा घेतली खरीफाचा वसूल दंगियामुलें मोगलाकडेही जाला ........... लक्षाचा माहाल वसूली असतां नव लक्ष वसूल कैसे न होत दुसरें सिवदीखर्च सरकारचे फौजेमुले वांचला ऐसे असोन तुम्ही अमलदारीच्या रीतीने कांधावे करून पर्याये लाऊन लिहितां यांत परिणाम उतम नाहीं रोहिल्याकडील ऐवज मागें पुढें येईल म्हणून लिहिले तरी त्यास

मुदत रुपयाची मुकरर केली असतां तेथे वसूल मार्गे पुढें येईल यैसे तुमच्यानें कसे लिहवतें हे लचाडीचे लिहिणें उपयोगाचे नाहीं रोहिल्याचे रुपयाचे मुदत वाइदा जस असेल त्याप्रमाणें सावकाराचे पदरीं रुपये घालून कवजे हुजूर लौकर पाठवणे घोडी पडलीं आहेत याचा ऐवज कडा कुरा येथे उगऊन घेणें पडले घोडियाचा वजावट आलियास कामास येणार नाहीं जाणिजे छ २० जाखर सुा खमस खमसैन मया व अलफ [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

---

लें. १५२ रजब ४ } श्री { श. १६७७ वैशाख शुद्ध ६ इ. १७५५ एप्रिल १७

चिरंजीव राजमान्य राजश्री दादा यांसि बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहिणें विशेष पत्र पाठविले ते पावले राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव याजकडे याचे दंधे व मामले करार करावे याप्रो यासी आम्ही करार केला असे त्यास पेटलाद व दसकुराई व गैर येथील मामलियेत व रामसेज येथील सबनिसी व सुज्या व जागिरीची कमावीस व गैर सर्व करार करून द्यावे म्हणोन विस्तारे लिहिले ते सर्व कलले अैशियास पेटलाद व गैर येथील पैका दुसरा देऊ लागला त्याप्रो तुम्हीं द्या अैसे म्हणत असता साफ पुरवत नाही दुसरियास मामला सागावा याप्रो कमाविसदाराने विनंती केली तेव्हा दुसरियास मामला सागितला याचा अर्थ तुम्ही आलियावरी सविस्तर कलेल तदनंतर जे कर्तव्य ते केले जाईल याच प्रकारे रामसेज व गैर कामे तुमचे येणे जाहालियावरी होणे ते होईल रा। छ ४ रजब बहूत काये लिहिणे [ नि.*] हे आसीर्वाद

---

लें. १५३ रजब ४ गुरु. } श्रीशंकर { श. १६७७ वैशाख शुद्ध ६ इ. १७५५ एप्रिल १७

साो विनंती सेवकें कृतानेक सा। नमस्कार विनं[ति ये]थील कुशळ ता। छ ४ रजब गुरुवार मुकाम मेर[ठ स्वा]मीच्या कृपावलोकने यथास्थित असे विशेष.........पत्र छ ३ माहे मजकूरचे आज छ ४ गु[र*]वारीं दों.........पावलें मस्तकीं वंदून आज्ञार्थ सर्व ध्यानास आ[णून] तुम्हांकडे अवलियाखानाची रवाणगी केली आहे सांप्रत निजामगडचा मजकूर न करितां दरोवस्त कामेंकाजें घ(क)रून घेऊन प्रांतातील बखेडा तोडऊन मग विचारें करून गड मजकूरच हस्तगत करून घ्यावा तूर्त तों सर्व विचार तुम्हांवर टाकिला आहे तुम्हीं ज्याप्रमाणें सांगाल त्याप्रमाणें कामकाज............ आणील बंदोबस्त करून घेणे म्हणून विस्तार......लिहिली त्यास आज च्यार पांच दिवस खान मजकुराची वाट पावसासारखी पाहतों अद्याप येतां दिस.........बलकी यमुना उतरल्याचेंही वर्तमान आलें नाहीं.........कोण्या ठिकाणी कोण्या तरतुदेंत

आसतील हजार....त्यायांची बोली आपणासीं केली आहे न कळे शं [भर]...जवळ असतील किंवा पंनास असतील आणीख लो...बोलावीत आसतील मुलकांत मात्र आरोळी जाली...कीं औलियाखां सात माहाल करून येतात खुशाल...निजामगडकर भेटायास चेत होता येका दों माहाल......इजान्याचाही जावसाल त्यासीं होता कुनाणे-बरोठचाही बंदोबस्त करून देईन म्हणत होता शनैःशनी निजामगडही हवाला करीन म्हणत होता औलियाखां येतो हें वर्तमान आल्यावर न आला कीं आतां खान मजकूर ...येतो त्याजआगोधर येणे मजला सलाह नाहीं याजकरतां......आपण म्हणतील खुशाल माये कोण आहे तर निजामगडां........तो औलियाखानाचा गुरू माये-बाप आहे व खान मज[कुरा]स त्यानेच रूपास आणिले आतां कांही परस्परें काहीं [विमन]स्कतासी जाली आहे याकरतां आपल्यासीं रुजू होत...येतो याकरतां त्याचे येणे राहिलें हा तों अद्या[पि आं]ला नाहीं बाबूरायाची पत्रे येत गेली तें वरचेवर पा........गेलो सारांश पठाण बाहवाहे जाले आहेत मुला मान व शादल येकत्र होऊन बापंडे वर येणार याकरतां औलियाखांनास अतिसत्वर नेमिल्या फौजेनसी जंगी सरंजामासुधां पाठऊन देणे कार्यांचा समये निघोन गेल्यावर मग त्याचे येणे काये कामांचे यास्तव लवकर......पा॑ दुसरें तो आल्यावर त्यासीं येथें काये सलूक...च्या भक्ष्यभोज्याचा काये ठेराव केला आहे द्यावे काये ध्यावे काये जो ठेराव केला असल तो लिंहिणे अभोगत असल्यास माणूस कामाचा समये जाणून चितास आले तें माग ...... द्यावें तर आजुर्दा होतें कार्यनाश होतो द्यावें तर ... यावे किती द्यावें जर ठेराव केला असेल तर बरा...... आतां करून पा॑ कीं तेणेप्रा॑ देत जाऊं दिल्ली ... ची दुपटे बाज वगैरे यांची शेर फार भारी पडली...ले जो त॑ त्याचा हेवा करितो लश्करची वाट बिग ... ते याकरतां सूक्ष्म दृष्टीनें परगणाती का ...जावर दृष्ट देऊन नेमस्त करणे जर आपण म्हणतील कीं ... च्या जुजरसीनें कराना तर जो कोण्ही आपल्या आपण चाकरीस येईल त्याची चौकसी आम्हीं करूं सकतों ज्यास स्वामी दिलीहून उमदगीने पाठवितील त्याची [ अपूर्ण* ]

---

| ले. १५४<br>रजब २० | श्री | श. १६७७ वैशाख वद्य ८<br>इ. १७५५ मे ३ |
|---|---|---|

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसांवी यांसी

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार उपरी येथील कुशल जाणून तुम्ही आपलें लिहिणे विसेष [ नि.* ] तुम्हीं पत्र पाठविले ते पावले ऐसियासि कितेक येकनिष्ठेचे व गैर विचार तपासिले लिहिले ते कलले त्यास येकनिष्ठेने राहून स्वारी कामे करून लौकर येणे साप्रत वजिराचा भाव काये ते लिहिणे वजिरास येक पत्र सिद्ध[चा*]-

राचे लिहिले आहे हे देऊन उतर लौकर पाठवणे तुम्ही येकनिष्ठपणे चाकरी करीत असिल्यास दिवसेदिवस उतमच आहे जाणिजे छ २० रजब बहूत काये लिंहिणे [ ब.* ] लेखन । सीमा रा। छ २ शाबान

---

ले. १५५ जिल्काद ७ | श्री | श. १६७७ श्रावण शुद्ध ९ इ. १७५५ आगस्ट १६

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसि

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्हीं पत्रे छ ९ सवालची पाठविली ती छ ५ जिलकादी पावली विस्तारे मजकूर लिहिला तो कलला पातशाहा छ १ सवाली किल्या[त*] दाखल जाहाले वजीर आपले हवेलीत आहेत म्हणोन लिहिले ते कलले या उपरीही तेथील वंर्तमान वरच्यावर लिहीत जाणे वरकड उतरे अलाहिदा लिहिली आहेत त्याजवरून कलेल मौजे चांदोरी पा। नासीक हा गांव आपलेकडे करून दिल्हा आहे तेथे कर्जपटी सतावीससें रु। घातले आहेत ते माफ करावे [ नि.* ] कर्जपटीचे रुपये माफ होणार नाहीत वरकड तुमचे आर्ज आहेत ते हुजूर तुम्ही आलियावरी करणे ते केले जातील जाणिजे छ ७ जिलकाद बहूत काये लिहिणे

पौ छ २१ जिल्हेज

---

ले. १५६ जिल्काद ७ | श्री | श. १६७७ श्रावण शुद्ध ९ इ. १७५५ आगस्ट १६

पु। राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसि

उपरी पा। जलाली व पा। बिलराम हे दोन्ही परगणे आम्हाकडे तिसाला इजारा ठराऊन दिल्हे येसे असतां जे साली आमचे स्वाधीन केले त्या साली सरसाल मवासी गाव होते त्यांस तंबी पोहचाऊन काहीं सुरलीत केले लोकाची कर्जे काढून सरकारचा पैका भरला येसे असतां दोन्ही परगणे काढून रा। अंताजी माणकेश्वर यांस दिल्हे त्यास तिसाला इजारा न पुरता काढिले तेव्हा आमचा पैका सरकारांत गुतला परगणियांत बाकीसाकी गुंतली आजच आज परगणे निघाले याजमुले वजीर आमची मातबरी कसी राखितील आणि त्याजकडील परगणे मेरठे व गैरे कसे ठेवितील तरी दोन्ही परगणे आमचे आम्हाकडे इजारियाप्रो। करार करावे म्हणोन लिहिले ते कलले [ नि.* ] तुम्ही र[स*]द मागितल्यास देत नाही व हसेबंदीप्रो देत नाही रुपया आजचा उद्यावर घालविना रड गाता या गोष्टीचे जाबसाल तुमचे आमचे रूबरूच भागीरथीचे काठी जाहाले आहेत तुम्हीही कबूल केले आहे कीं ज्यास देणे

त्यास द्यावे आम्हांस रुपया } या } प्रो आकार होत नाही ऐसे बोलला आला तपसील लिंहिल्यास कोण ऐकितो पहिल्या गोष्टीचें स्मरण तुम्हास आसत नाही हे आपूर्व आहे जाणिजे छ ७ जिलकाद बहूत काये लिहिणे दिलीच्या फौजदारीच्या कमावीस तुम्हास दिल्ही येविसी सनद दिल्ही आसेल हे परगणे आंताजीकडे कमावीस दिल्हे तुम्ही फौजदारीचे रुपयाचा आकार करून जमा ठेवणे जाणिजे छ ७ जिलकाद बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा पौ छ २१ जिल्हेज

---

ले. १५७ } श्री { श. १६७७ श्रावण शुद्ध ९
जिल्काद ७ } { इ. १७५५ आगस्ट १६

राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसि

उपरी स्वामी दिलीचे मुकामी असतां वजिराकडील ऐवजाचा निर्गम न होये तेव्हा वजिरास ममतेत घेऊन चकले कुरा व चकले कडा हे दोन माहाल राजश्री गोविंद बलाल यांचा माल जामीन फैल जामीन घेऊन त्यांचे नावे सनद करून पाठविली आणि कराराप्रो ऐवजाची निशा स्वामीची करविली यैसे असतां वर्तमान ऐकिले की गोपालराव गणेश यास दोन्ही चकल्याची सनद येक दोघानी तकलुफी करून समागमे साहित्यास रा। अंताजी माणकेश्वर आणिले त्यास असे जालियावर येथे आमची पत राहात नाही व गोविंदपंत सिबंदीखाली बुडाले व आम्हापासून आणशफत घेतली ते प्रमाण राहात नाहीं येविसी पातशाहानी व वजिरानी तांडव केले आणि दोन्ही चकल्याचा बंदोबस्त करावयास सुज्याउदौला यांस पत्रें लिहिली आहेत तरी गोपालराव व अंताजी माणकेश्वर यांस पत्रें पाठवावी नाही तरी दोन्ही स्थलें जाऊन स्वामीच्या यैवजाकरिता पा। मरठे व गैरे दिल्हे हेही परगणे काढितात या परगणियाचा घेतला वसूल माघारा घेतात यांजकरितां उभयेतास ताकीदपत्रे पाठवावी म्हणोन विस्तारे लिहिले ते कललें ऐशांस वजिरानी हर दू चकल्यावर तनखा नव लक्षाची करून दिल्हीं परवाने पोहचतांच तेथील आमिलानी नव लक्ष रु॥ पदरी घालावे ते न घातले नवादिगर गोष्टी सांगितल्या वजिरांचा परवाना माघारा न फिरावा यास्तव फौज पाठऊन तंबी पोहचावणे लागली घोडी पडली लोक जाया जखमी जालें सिबदीखर्च पडला याच गोष्टीस आम्हांस मबलग खर्चाखाली यावे लागले ज्याची घोडी पडली त्यास घोडी देणे आली ते घोडी मागतात उलटे वजिराकडून ताकीद होऊन रुपये पदरी पडावें ते गोष्ट न करिता रुपया न द्यावा येताद्विषई कुचीत करितात हे बेइमानी नव्हें दुसरे बकाउलाखानांस वजीर पत्रें पाठवितात की याचे पदरी रुपया न पडे ते करावे मराठे काढून द्यावें हे बेइमानी नव्हें जेव्हा पैकाच न ये तेव्हा हर दू चकले जप्त [नि.*] गोविंद बलाल याणी करून रुपये आम्हास पावते थोडे बहूत केले फाल्गून शुध पूर्णिमेस आम्हास रुपये गोविंद

बलाल याणी द्यावे ते काही चैत्र काही वैशाख काही जेष्ट ऐसे दिल्हे तिनि लक्षाची वरात तरी आद्याप पावविली नाही येविसी घोडोबा नाइकाचेही पत्र आम्हास आले त्यास आम्हास रुपये पावते केले पाहिजेत तुम्ही दिलीवर पाया पडून कारभार केला की साडे तेरा लक्ष रुपये रोख द्यावे ते सेवटी तुमच्या गरिबीवर व वजिरापासी रुपया नाही यास्तव फाल्गून शुध पूर्णिमेची मुदत करार केली ते आद्यापि गोविंद बलाल याणी रुपये पावते केले नाहीत यात कोणाकडे बेइमानी पडल्या घोड्याचे रुपये व सिबंदीखर्च आमचा पाचा हजाराचा जाहाला हा आम्ही का द्यावा आम्हास नव लक्ष रुपये पूर्णिमेस द्यावे आमची बोली सिबंदीखर्चाची व पडल्या घोड्याची व गैर काही आसती तरी आम्ही न मागतो आता आम्हास बारा पंधरा लक्ष रुपये पडली घोडी व सिबंदीखर्च मिलोन लागला आणि नव वसूल येणार तेव्हा आम्ही तीर्थरूपापासी जाबसाल काये करावा यास्तव हे पंधरा लक्ष रुपये वसूल करून घ्यावयास्तव गोपालरायास सनद दिल्ही आहे हे वाजवी किंवा गैरवाजवी हे आपले जागाच पाहाणे आणि हाच कागद वजिरास दाखवणे कीं यात कोणती बेइमानी परगणे आमच्या मनात घ्यावयाचे आसते तरी आम्ही मागून घेतो तो आमचा भाऊ आहे देताच परंतु हा वाजवी कारभार आम्ही तोटे काये म्हणून सोसावे हे सविस्तर पातशाहा व वजीर यास सागणे व तुम्ही लिहिले कीं पातशाहा वजीर जाट रोहिले सारे एक होऊन आम्हास चमल उतरो देऊ नये ऐसे विचार करितात व गैर दबावणिया लिहिल्यात त्या कलल्या ऐसियांसि आम्हीहि हेच इच्छितो कीं त्याणीही सारे फौजेनसी जमोन मैदानात बादत बरसांत यावे आम्हीही दसरा जाहालियावरी दर मजल चाल करीत हाजर होणार मग ज्यास परमेश्वर देईल तो घेईल तुम्हासही त्याचे साहित्य होत आसिले तरी करणे आमची चाकरी करावयाचे मनात आसिल्यात फोडाफोड करणे आम्ही तरी ईश्वरी रुपेने सारे येक जाहाले तथापि भय धरीत नाही मागेही येक होणार होते तेव्हा परिणाम जाहाले ते तुम्हास ठाऊकच आहेत आता तपसील कशास तुम्हा चाकरास ल्याहावे पहिले तुम्हास रूपनगरचे तलावरून बलाविले होते ते कधी येणार ते लिहिणे किंवा दिली सोडून येत नाही ते लिहिणे तीर्थरूपापासी आम्ही बोललो आहो की दोघेही भाऊ हुजूर स्वामीजवल दुसऱ्या आलीकडे येतील ही गोष्ट लटकी जाहालिया उतम नाही पातशाहा व वजीर यास जर तुम्ही चमेल उतरोन दक्षणतीरास आणिले तरी हेही चाकरी तुमची मोठीच आहे काकी आम्हास कजा ईश्वर मोठा देईल आम्ही मातबर फौजेनसी बमै तोफखाना जलद येतो जाणिजे छ ७ जिलकाद बहूत काये लिहिणे [ च.* ] लेखन। सीमा

पौ छ २१ जीहेज

———

ले. १५८ } श्री { श. १६७७ श्रावण शुद्ध ९
जिल्काद ७ } { इ. १७५५ आगस्ट १६

पुा राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गो यांसि

उपरी रोहिल्याकडील यैवजाचा क्षेपनिक्षेप हवाला तुम्हीं घेतला त्यापैकी तीन लक्ष रुपये राजश्री जयाजी सिंदे यांस देविले त्यापैकी येक लक्ष रुपये त्यास पावलें बाकी वसूल येतील तधी देऊ म्हणोन तुम्हीं उतर करिता म्हणोन मारानिलेनी लिहिले अैशास ते मोहीमसीर त्याच्या खर्चाचा गल्हाठा तुम्हीं तो क्षेपनिक्षेप हवाला घेतला असता उडऊन उतर करणे उचीत नाही तुम्हीं सनदेप्रो त्यास रुा पावते करणे रोहिल्याकडे तुमचे कारकून गेलेच आहेत वसूल येईल तो तुम्हीं घेणे [ नि.* ] मुदती टळून गेल्या आद्यापि रुपये पावत नाही हे काये शाहाणपण जाणिजे छ ७ जिलकाद बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

पौ छ २१ जिल्हेज

---

ले. १५९ } श्री { श. १६८७ श्रावण शुद्ध ९
जिल्काद ७ } { इ. १७५५ आगस्ट १६

पुा राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसि

उपरी सुरजमल जाट कोलेवरून कूच करून प्यावडी नजीक डासणा येथे आला इकडोन नजीबखां पंचवीस हजार फौजेनसी जाऊन मुकाम केला याचा व त्याचा चौपांचा कोसाचा अंतरा आहे आजपावेतो लडाईचा मजकूर होता हाली तहचा मजकूर पडला आहे अठरा लक्षाची जागीर नवाब वजिराने जाटास द्यावी आणि याणी पारची मामलत करावी यांचे मध्यस्तीस राजे नागरमल आहेत यांचे त्याचे जाबसाल होतात कीं हिंदुस्थान जड करावे मराठियास चमेली अलीकडे येऊ न द्यावे पातशाहानी अकबराबादेस जाऊन बसावे सर्वांनी वजिराचे आज्ञेत चालावे मराठियाचा रेच मोडावा कडाकुरा याकरितां अंतरवेदीतील ठाणी उठवावी हे निमित्य मात्र आहे असो यांचा घाट घटीत आहेत म्हणोन तपसिले लिहिले ते कळले अैशास अंतरवेदीतिल माहाल ठाणी व कडाकुरा याजवर तनखा करून दिल्ही ते सुखानी वजिरानी दिल्हीं अैसे नाहीं आम्ही पातशाहावर उपकार केला त्याजवरून दिल्हे प्रस्तुत ते कडाकुरा यांचे जप्तीवरून विरुध मानितात तरी येतद्विषईचे उतर अलाहिदा लिहिले असे त्याजवरून कलेल सारांश वजीर धावत करितात जोडतोड माडिला आहे तरी त्याच्या कर्तव्यास तुम्ही बरे वजेने वाकीफ आहा त्याचे जोडतोड सर्वही फोडून येकास येक न मिळेत ते करणें त्याचे केले सिरानचढ दात खाऊन अवलक्षणता त्याच्या पदरी पडे ते केल्यास तुमच्या सेवेचा मजुरा आहें व तुम्हीं या-

प्रमाणे करावेच करावें पातशाहाचे निघणे होणेच नाही न निघेत ते करावें जाट व नजीबखान येक नव्हेत येकास येक न मिलेत तें करणे सुज्याउदौलाचेही येणें अयोधेहून न होयें यैसे भयसमर्पक त्यास ल्याहावे दसरा जालियावर आम्हीं तिकडे येतों मग जे जे येतील ते पाहून घेऊ चिता नाहीं [ नि.* ] जाणिजे छ ७ जिलकाद बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा पौ छ २१ जिल्हेज

---

ले. १६० } श्रीरामो जयती { श. १६७७ मध्य । इ. १७५५ आगस्ट

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापू व राजश्री दामोदरपंत स्वामी यांसी

पोा दौलतराव मुरार दडवत विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत असिलें पाहिजे विशेष आपण पत्र पाठविले तें पावले सविस्तर वर्तमान कलले पठाणाही मुलकांत दंगा केला म्हणून रुपयास दिवसगत जाली याउपरी पधरा दिवसा आलीपलीकडे वरातदाराचे रुपये देऊन सर्व सरकारचा गुता उरकून आशाढ मासीं श्रीमंताच्या दर्शनास येतों म्हणून लिा त्यावरून बहूत संतोष जाहाला सारांष याद लेहून नाइकाजवल दिली आहे त्याप्रो कामे करून आपण उभयेतानी देसास यावे शत्रूनी श्रीमत नानासाहेबाजवल गैरती घातल्या आहेत की बापू मवास जाले दर्शनास येणार नाहीत त्यावरून श्रीमत राजश्री दादासाहेबास वरचेवर पत्रें येतात की बापूस दर्शनास घेऊन येणे त्यास आपण सर्व कामे करून घेऊन उभयेतानी देसास यावे दर्शन करून श्रीमताच्या चितातील किल्मीस दूर करून मागती यावे यांत सर्व गोष्टी ठीक आहेत नाही तर लोकाच्या सांगण्यास आणि तुमच्या न येण्यास गाठ पडेल मग नासेल मग कोण्हाचाही उपाये नाही गुजराथचे व देशचे सर्व धंदे होऊन येतील यात आपले विचारे कदाचित येईल की पुण्यात जाऊन पेचांत पडावे तरी पुण्यांतील पेच हर तजवीजे सामदाम करून उलगडतील परंतु इकडे राहिल्याने माहा संकट पडल सर्व विचार तुम्ही जाणतच आहा आम्ही ल्याहावेसे काये आहे परंतु करोड विचार येकीकडे ठेऊन पुण्यास यावे हे पत्र करोड पत्राच्या जागा मानावे आणि श्रीमंत राजश्री नानासाहेबाच्या दर्शनास बापू आपण यावे आम्ही तुमचे श्रेहीत आहो उतम दिसेल ते सांगावे सरकारात अतर व अलवा जिनस आणावा राजश्री सखारामपंताचे अतर पिंसोरी वीस तोले व आमचे पाच तोले आणावे फर्मान सारे आणावे आमच्या फर्मानाविसी येक कागद वजिराचा सलाबतजगास आणावा व सलाबतजगाचा वकील तेथे आहे त्याचा कागद आणावा आमचे आलतमग्याचे काम कसे केले कोठे करून घेतला हे लेहून पाठवावे बहूत काये लिहिणे फौजदारीचा अमल तुम्ही करावा हे विनती

राजश्री त्रिंबकपंत स्वामीस दंडवत पत्रान्वये मनन पुर्ता करून उभयेता(नीं) देसी यावे यांत हरगीज न चुकावे आषाढ मासीच यावे हे विनती

---

ले. १६१ जिल्काद १९ } श्री { श. १६७७ श्रावण वद्य ६ इ. १७५५ आगस्ट २८

राजश्री बापूजी माहादेव व पुरुषोतम माहादेव गोसावी यांसि

दं अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य [ मो. जा.* ] स्नो जनकोजी सिंदे दंडवत विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करित जाणे विशेष तुम्हीं पत्रें {पत्रें} पाठविलीं तीं पावली तेथें कितेक तपसीलवार सिष्टाचारयुक्त लिहिलें व वजीरजी यांचीं पत्रें खलिते पाठविले ते पावले तेथेंही इकडील मारवाड प्रांतीच्या पारपत्यास्तव मजकूर कितेक स्नेहेंचकडून तपसिलें लिहिला त्याप्रमाणें कलों आलें ऐशास येथील बंदोबस्त जो असणें तो पहिल्यापेक्षां आधिकोतरच आहे राठोडाचें पारपत्य येथायुकच करून लोकिकांत येश संपादावें हाच अर्थ चितांत असे तीर्थरूप कैलासवासी यांच्या चितांत दोघेही राठोड रखून प्रांत मारचा बंदोबस्त उतम प्रकारेंच करावा येसे चितांत त्यांच्या होतें त्यास विजेसिंग राठोड याणे दगाबाजी करून लघुकर्म केलें त्याचा सूड घेणें जरूर नागोरच नेस्तनाबूद करावें हाच निस्चये आहे ईस्वरइछा प्रमाण असे अमित्रापुर्ते सामान आहेच चिंता नाहीं जे समई फौजेचें प्रयोजन लागेल ते समई वजीरजीस व तुम्हांस लेहून पाठविलें जाईल साहित्य करालच कराल हा पूर्ण भरंवसाच आहे विजेसिंगाचा वकील तेथें ब्यास हरनाथ म्हणून आहे त्याजला तेथें थारा न होतां तेथून वरतरफ होये त्यांसि कोणें विसींही भाषण न करित ते गोष्ट केली पाहिजे रा छ १९ माहे जिलकाद [ नि.* ] बहूत काये लिहिणे हे विनंती [ वा.* ] मोर्तब । सुद /

पो छ २९ जिलकाद

[ पाठीवर डाव्या बाजूस पुढील बदामी शिक्का* ] श्री जोति। स्वरूपचरणि । तत्पर जयाजि सु । त जनकोजि सि । दे निरंतर

---

ले. १६२ सु. ११५६ जिल्काद २५ } श्री { श. १६७७ श्रावण वद्य १२ इ. १७५५ सप्टेंबर ३

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहिणें विशेष साा कडा व कुरा माहालावरी वजिरानीं नव लक्ष रुपयांची तनखा करून दिल्ही त्याप्रो बकरुलाखानानें चिठी पावताच रुपये द्यावें ते गोष्ट न केली

रुपयांस हरकत केली तेव्हा सरकारची पांच हजार फौज पाठविली जूझ भाडणही जालें घोडी पडली सिबंदीखर्चाखाली यावें लागलें वजिरानी ताकीद करून रुपय देवावें ते उलटे कुचींद करून बकरुलाखानास लिहीत की रुपये न देणें यामुलें अठरावीस लक्ष रुपये सिबदीखाली आलों हा पैका कोणी द्यावा तनखा देविली त्याचा दुपट पैका दिल्हा तरी सिबदीखर्च व पडल्या घोड्याचा खर्च वारत नाहीं येविसींचा विस्तार पहिला तुम्हांस लिहिलाच आहें साल मजकुरी मामला राजश्री गोपालराव गणेश यांस सांगितला असे वजीर वाईट मानोन पेचपाच करितील फौज पाठवितील तर काहीं होणे नाहीं कजिया मात्र पडल तरी वजिरांस तुम्हीं उत्तम प्रकारे सांगो[न*] फौज न पाठवीत कजिया न होये ते करणें व जाटास व सुज्याउदौलास लिहितील तर ते या गोष्टीत मन न घालीत ते करणे येथून फौज याच कामासाठी रा केली आहे नाहाक कलह वृधिंगत होईल दसरा होताच खासा श्वारी पंचवीस च्यालीस हजार फौजेनसी होत असे जे लबाडी करितील त्याचे पारपत्य केले जाईल सारांश तुम्हीं गोपालरायाचे साहित्य करून अमल दुरुस्त चाले ते करणें [ नि.* ] जाणिजे छ २५ जिलकाद सुा सीत खमसैन मया व अलफ [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ व.* ] लेखन । सीमा पौ छ ९ माहरम

---

ले. १६३ } श्री { श. १६७७ श्रावण वद्य १२
सु. ११५६ जिल्काद २५ } { इ. १७५५ सप्टेंबर ३

पुरवणी राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गो यांसि

उपरी रा जयाजी सिंदे यांस बिजेसिगानी दगा करून मारिलें हे वर्तमान दिलीस पावलियावर वजीर कोणे मनसुबियात आहेत जाट काय तजवीज करितात माधोसिग काय काय फैल करीत वरकडही रजपूत व राणाजी कोण काय मनसुबा करितात बिजेसिगाकडील पटाईत जागा जागा आहेत त्याची वलवल कसी आहे ते तुम्हांस खबरा येतच असतील [जा]ट व माधोसिग व गैर लबाडीस शरीक न होत ते तुम्हीं करणे व वजिराचाही फैल व येविसी मनसुबा करितील तो सिधीस न पावे ते करणे राजश्री दत्ताजी सिंदे याचे कुमकेस रा अताजी माणकेश्वर तिकडे होते त्यास रा केलेच आहेत येथेंही फौजाची तयारी करविली असें रा करितों दसरा होताच खासा श्वारी त्या प्रांतें होईल बिजेसिगानी दगाबाजी केली त्यास मेसमार करून व जो या हगामीस शरीक होईल त्याचेही पारपत्य करून अतःपर या गोष्टीची दरगुदर होते ऐसा अर्थ नाहीं बिजेसिगाचे तो हाडदच पडलें याचे पारपत्य उत्तम रीतीनें करणेच आलें करून यांत संशये नाहीं तुम्हीं जो जा(जो) लबाडी करील त्याचा अर्थ वरचेवरी हुजूर लिहीत जाणे तुमचे लिहिल्यानी जो मलईस न मिलेसा असेल त्यास लिहून

मलईस न मिले ते करणे [नि.*] जाणिजे छ २५ जिलकाद सुा सीत समसेन मया व अलफ बहूत काये लिहिणे [ब.*] लेखन । सीमा

पौ छ ९ माहरम

---

ले. १६४<br>जिल्हेज २२ } श्री { श. १६७७ भाद्रपद वद्य ९<br>इ. १७५५ सप्टेंबर २९

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गो यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जाणे विशेष चिरंजीव सगुणाबाई यास श्री [मो. जा.*] यात्रेस रा केली असेत बराबर सर्व साहित्य दोन तीनसे राऊत देसील देऊन रा केली आहे तरी तुम्हीं वजिरास सागून ताकीद परवाने लागतील ते व गुरुजबारदार देऊन याजकडे पाठवणें सुज्याउद्दौलास व बलवडसिंग व प्रयागच्या फौजदारकिलेदारास व गैर यांस ताकीदपत्रे देऊन पाठऊन देणें येविसी विलंब न लावणे सगुणाबाईची रवानगी विजयादसमीच्या मुहूर्त करून तुम्हाकडील पत्रे जलद येत ते करणे येविसी वजिरास थेली पाठविली आहे ते त्यास देणे जाणिजे [नि.*] जरूर जलदीने पाठवणे छ २२ जिल्हेज बहूत काये लिहिणे [ब.*] लेखन । सीमा

पौ छ ६ रबिलावल

---

ले. १६५<br>सु. ११५६ जिल्हेज २२ } श्री { श. १६७७ भाद्रपद वद्य ९<br>इ. १७५५ सप्टेंबर २९

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यासि

सेवक सदासीव चिमणाजी नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणे विशेष तुम्हीं पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले लिहिला मजकूर सविस्तर कळला अैशास येविसीचे उतर तीर्थरूपानी लिहिले आहे त्याजवरून कलेल [नि.*] जाणिजे छ २२ जिल्हेज सुा सीत खमसैन मया व अलफ [नि.*] बहूत काये लिहिणे [ब.*] लेखन । सीमा

पौ छ ९ सफर

---

ले. १६६ } श्री { श. १६७७ भाद्रपद वद्य ९
सु. ११५६ जिल्हेज २२ } { इ. १७५५ सप्टेंबर २९

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गो यासि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्हीं छ १३ व छ १५ जिलकादची पत्रें पाठविली ती प्रविष्ट जाहाली लिहिला मजकूर सविस्तर अवगत जाहाला अैशास येविसीची उतरे अलाहिदा लिहिली आहेत त्याजवरून कलेल [ नि.* ] जाणिजे छ २२ जिल्हज सु॥ सीत खमसेन मया व अलफ [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

पौ छ ९ सफर

---

ले. १६७ } श्री { श. १६७७ भाद्रपद वद्य ९
जिल्हेज २२ } { इ. १७५५ सप्टेंबर २९

पुा राजश्री बापूजी माहादेव व दामोधर माहादेव गो यांसि

उपरी कडा व कुरा दोन्ही चकले रा गोविंद बलाल याजकडून दूर करून रा गोपालराव गणेश यांस सागितलें गोविंद बलाल याणी जामिनी फैल जामिनी दिल्ही पेशगी यैवज वजिराचे सरकारांत दिल्हा याजमुले वजीर फार श्रमी व हे माहाल खालशाचे यांत स्वामींनी हात घातला यांत उचीत नाहीं वजीर उपाध करणार तरी रुपा करून गोविंद बलाल याजकडे मामले तकरार राही ते गोष्ट करावी माहाल गेले अैसे नाही जे समई माहाल तनख्यात आले तेच समई येऊन चुकले गोविंद बलाल याजकडे माहाल राहिलियानी वजीर संतोषी असेत म्हणोन लिहिले ते कलले अैशास कडाकुरा याजवरी वजिरानी तनखा करून दिल्हीं ते चिठीने रुपये आम्हांस पावावे ते पावले नाहीं बकाउलाखानांने लबाडी केली पाचसात हजार फौजने दोन च्यार महिने श्रम केले जुझले भाडले घोडी पडली सिबंदी बेमबलग देणे आली अठरा विसा लक्षाची खरावीत गोष्ट येऊन चुकली तो यैवज तेथील तेथे निर्वाह करून न घ्यावा तर कोठे घ्यावा तनखा व खर्च मिलोन काये बेरीज होते अैसे असोन वजीर का श्रमी व तुम्हीं साफ का बोलत नाहीं अतःपर वजिरांस समजाऊन सागोन कडाकुराचे मामलियांची गोष्ट दरम्याने न आणीत ते करावे गोपालराव गणेश यांस मामला सागितला तो सुरलीत चाले काही वजीर उपाध न करीत ते करणे [ नि.* ] छ २२ जिल्हेज बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

पौ छ ९ सफर

ले. १६८ } श्री { श. १६७७ भाद्रपद वद्य ९
जिल्हेज २२ } { इ. १७५५ सप्टेंबर २९

पु॥ राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गो॥ यांसी

उपरी पा॥ मेरठे वगैरे प्रात श्रीमंत राजश्री दादासाहेबी बाकीच्या ऐवजपैकी खालशातून घेऊन आम्हांकडे दिल्हे त्याजवर तनखा केल्या वरातदारांस ऐवज थोडाबहूत पावला राहिला तो देऊन सेवेसी येऊन म्हणोन लिहिले ते कलले ऐशास वरातदारांचा ऐवज हर तरतूद करून तुम्हीं पावता करणे त्याचा बोभाट येऊ न देणें तुम्हीं दर्शनास येणार चिरंजीव राजश्री दादाजवल करारच केला आहे त्याप्रो येणें युक्त असे छ २२ जिल्हेज बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

पो छ ९ सफर

---

ले. १६९ } श्री { श. १६७७ भाद्रपद वद्य ९
जिल्हेज २२ } { इ. १७५५ सप्टेंबर २९

पुा राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसि

उपरी लाहोरास अबदाली यानी हगामा केला नवाब वजीर यांची भावजई बमै खजाना जवाहीर घेऊन लाहोराहून निघाली निभाऊन येतील तेव्हा खरें;यांच्यानी लाहोरचा उपराला होत नाही म्हणोन लिा ते कललें वजिराची भावजई दिलीस आली न आली प्रस्तूत लाहोरचा मजकूर काये तो लिहिणे गोविंदराव तमाजी वकालतीस माधोसिगाजवल बहूत दिवस होता त्याचे घरावर माधोसिगाने चोकी बैसविली तीन रोज कोठडीत कोडून ठेविलें जहर देऊन मारनिलेस मारिले माधोसिगाने मोठा अन्याये केला पारपत्य करावे {करावे} म्हणोन लिहिले ते कलले ऐशांस विनाअन्याये माधोसिगाने ब्राह्मणास मारिले तो आपले कार्यानरूप फळ पावेलच जयाजी सिंदे निधन पावले यास्तव सर्वां रागडियानी नजरा फिरविल्या {आहे} आहेत काये चिंता आहे थोडेच दिवसांत हतगर्व होतील [ नि.* ] तुम्ही बोलूनच राजकारणाचे रीतीने गुज मोडणे श्रीकृपेने सत्वरच फौजा तिकडे येत असेत छ २२ जिल्हेज [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

पो छ ९ सफर

---

ले. १७० } श्री { श. १६७७ भाद्रपद वद्य ९
जिल्हेज २२ } { इ. १७५५ सप्टेंबर २९

पुा राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गो॥ यांसि

उपरी सुरजमल जाट वीस हजार फौजसुधा डासने नजीक शाहाजानाबाद येथे दाखल जाला होता त्यास पातशाहा व वजिराचे तर्फेने नजीबखा पचवीस हजार

फौजेंने मुकाबिलियांस गेला त्याची यांची दो कोसाची तफावत होती बोलीचाली होत होती निदानी सलूख जाला खालशात जाटाने तसरूफ केला त्याची मामलत दोन लक्ष जाटाने दिल्हे साहा लक्षाचा वाइदा दर माहा पंनास हजारप्रो द्यावे येसा करार [ जाला* ] जाटास अठरा लक्षाची जागीर दिल्ही पांचा हजारानी दिलीत चाकरी करावी म्हणोन करार जाला म्हणोन लिहिले ते कलले प्रस्तूत पातशाहा कोठे व वजीर कोठे आहेत व जाट कोणे जागा आहे नजीबखा कोठे आहे कराराप्रो जाट वर्तंतात की नाहीं काये मनसुबा करितात ते सविस्तर लिहिणे [ नि.* ] अतस्ते जाटासी बोलून राजकारण तेथील वाकडी असतील ती मोडून दतबाची बाजी सेर राही ते करणे छ २२ जिल्हेज बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

पौ छ ९ सफर

---

| | | |
|---|---|---|
| ले. १७१<br>जिल्हेज २२ | श्री. | श. १६७७ भाद्रपद वद्य ९<br>इ. १७५५ सप्टेंबर २९ |

पुरवणी राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गो यांसि

उपरी पातशाहा बाहर निघाले वजीरही बाहेर निघालेच आहेत माधोसिग बिजेसिगाची कुमक करणार जाट माधोसिगास सामील हाणार सारे रागडे गैर समय पाहून व कमबाजी पडली देखोन आपले जागा गर्वारूढ जाले आहेत वल्गना करितात वजीर सर्वांची पुस्तपन्हा करून नागोरचे मोर्चे उठवणार म्हणोन वर्तमान ऐकिलें ऐशास वजिराची व चिरंजीव राजश्री दादाची क्रियाशफत जाहाली वजिरानी सर्वप्रकारे इकडील साह्य करावें हे त्यास श्नेहाच्या रीतीन उचीत असता बिजेसिगाचे साह्य करितात त्याच्या बालाइशीवर आहेत अपूर्व आहे तरी तुम्ही वजिरासीं बोलोन बिजेसिगाचा उपराला न करीत क्रियांशफत जाहाली आहे तदनरूप राजश्री दताजी सिंदे यांची कुमक होये ते करणे का कीं जयाजी सिंदे निवर्तले कमबाजी पडली यां समयात वजिरानी आपले इमान प्रमाण चितात आणून माधोसिग आदिकरून रजपुतांस दबाऊन आमची बाजी निटाऊन द्यावी यातच श्नेहाची अभिवृधिता आहे चिरंजीव राजश्री समशेर बाहादर व राजश्री येशवं[ त* ]राव पवार यांस दाहा हजार फौजेनंसी रा केले असेत व दसरा जालियावर च्याली[ स* ] पनास हजार फौजेनसी खासा स्वारी होईल खुलासा आमच्या फौजा पोहचलियावर वजीर कुमक करितीलच परंतु श्नेहाची शर्त हेच कीं आमच्या फौजा तिकडे आल्या नाहीत तो वजिरानी दताजी सिंदे यांची कुमक करून बिजेसिगाकडील मामलत नीट करावी येविसीं तुम्हीं वजिरासी उतम प्रकार बोलोन जे जे रागडे आपले जागा लबाड्या करितात ते गार होऊन दुरुस्त चालत ते करणें यांत तुमच्या सेवाधर्मास योग्य आहे दामोदरपंत तुमचा व जाटाचा तो परम श्नेह चिरंजीव राजश्री दादानी जाटावर रुतोपकार केले जाटाच्य।

मध्यस्तीत जयाजी सिंदे होते मामला पेचात आला तो जयापानी उलगडून तहरह केला तो मजकूर जाट चितांत न आणिता जयापा निधन पावले देखोन जयापाचे भाऊ दताजी सिंदे यांजवर आपली फौज माधोसिंगाचे कुमकेस पाठवितात मोटे इमानाचे पुरे तुम्ही कारभारात होतां जाटास बर-वजेने बोलोन शरमाऊन माधोसिंगाचे बहकाविलियानी न बहकेत माधोसिंगांस सामील न होत ते तुम्हीं करावे कीं न करोवें बहूत करून तुम्हीं जाटास माकूल केलेच असेल नसेल तर अतःपर तरी माकूल करून टीक करणें माधोसिंगासही विचारे करून जे सागणे ते सागावे कीं कोते अंदेशाचे वले विरुधास्पद कराल आखेर निस्तरणे तुम्हांसच लागेल दक्षणच्या फौजा रा। जाल्या ह्या अविलंबेच येऊन पावतील खासा श्वारीही येईल जे जें बदफैली करितील त्याचा मुलाहिजा हरगीज होणार नाहीं तुम्ही सर्वप्रकारें दीर्घदर्शीपणे सर्वार्थ(र्थे) चितात आणून ज्यात परिणाम लागे ते करावे म्हणोन ल्याहावे अथवा त्याच्या भले माणसासीं बोलावें ते गडवडीत न पडेत ते करणे तिकडील व सर्वांकडील बातमी राखून वरच्यावरी लिहीत जाणें [ नि.* ] जरूर हर इलाज करून दतबास पेच न पडे तें जरूर करणे जितके साहित्य होये ते जरूर करणे वजिरासीं फार बोलणे सर्व कचे वर्तमान सविस्तर लिहिणे छ २२ जिल्हेज बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन। सीमा

पा। छ ९ सफर

---

ले. १७२ सफर १ | श्री | श. १६७७ कार्तिक शुद्ध ३ इ. १७५५ नोव्हेंबर ६

राजश्रिया विराजित राजश्री बापूजी माहादेव स्वामी गोसांवी यांसि

पो। बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणें विशेष सांप्रत तुम्हाकडील पत्र येऊन वर्तमान कलेत नाही तरी सविस्तर लिहिणें इकडील वर्तमान तरी खासा स्वारी सुमुहूर्तें बाहेर निघाली सत्वरीच फौज हिं [ दु* ] स्थान कर्नाटक गुजराथेकडे रवाना करावयाचे होत आहे आठा पंधरा दिवसां आलीकडे होतांच आधी राजश्री मल्हारबाची रवानगी तिकडे करू चिरंजीव राजश्री दादास लग्न करणे जरूर प्राप्त आहे तें होतांच तेही दरमजल ते प्रांती येतील मल्हारबा तो नर्मदेहून फिरोन तिकडे येणार होते परंतु हर येक कामास फौज नवी तयार असिली पाहिजे व येथें येऊन भेटावें हे जरूर होते यास्तव भेटीस आले येथून कृष्णा तीन च्यार मजली आहे कन्यागत पर्वकाल स्नान करून पंधरा दिवसा आलीकडे निरोप घेऊन त्वरेनें तिकडे येतील राजश्री दताजी सिंदे याणी कठीण समयांत बाजी राखिली आतां तों फौजाचा येण्याचा हंगाम आला सत्वरीच फौजा येऊन पोहचतील चिरंजीव समसेर बाहदर पांच हजार फौजेनसी रवाना जाहाले दिढा महिन्यात येऊन पोहचतील सांप्रत

मल्हारबाचे मनात आहे कीं तिकडे येऊन सर्व काम मनोदयानरूप करावें होणारानरूप अर्थ घडेल तो खरा रा। छ १ सफर [ नि.* ] बहूत काये लिहिणे हे विनंती

पौ १२ रावल

---

ले. १७३ कार्तिक शुद्ध ५ } श्री { श. १६७७ कार्तिक शुद्ध ५ इ. १७५५ नोव्हेंबर ८

राजश्रिया विराजित राजश्री यादो रंगनाथ गोसावी यांसि

सों बापूजी माहादेव व दामोदर माहादेव व पुरुषोतम माहादेव व देवराव माहादेव नमस्कार उपरी येथील क्षेम ता। कार्तिक शु॥ ५ मु॥ इंद्रप्रस्थ जाणून स्वकीये कुशळ लेखन करीन जाणे यानंतर तुम्ही पत्रे येक दोन पाठविली ते प्रविष्ट होऊन सकल अर्थ अवगत जाला येसियासी तुम्ही लिहिले की श्रीमंत राजश्री रघुनाथराव येथे आले त्याचे आतिथ्य उतम केले परंतु चितात कोसा दिसोन आला यैसियासि याचा मजकूर तरी

श्रीमंत राजश्री रघुनाथरावदादाची चाकरी येथे आम्ही यैसी केली की त्यानी आम्हास शब्दच न ठेवावा परंतु समागमे दुष्टचतुष्टय आहे त्यानी बहकाऊन त्याच्या चितात कडू पाडोन नानाप्रकारें बोध करून त्याजला बहकाऊन समजाविले तरी श्रीकृपेकरून आम्ही दोती महिनियानी त्या प्राते आलियांवर श्रीमंताचे दर्शन घेऊन ज्याप्रां त्याचे मानस असेल त्याप्रो मर्जी राखून पुढें जीवादारभ्य चाकरी करून त्याचे मन प्रसन्न केले जाईल साप्रत येथे कामकाजामुळे दिवसगत लागली म्हणून येणे तूर्त यावयाचा मजकूर न जाला श्रीकृपेकरून सर्व योग उतम होऊन येथील चिंता न करणे आम्हीही येथील कामकाजाचा बंदोबस्त करून सिमघा करून देशास येतो कळले पा। कलम १

श्रीमंत राजश्री पंत प्रधान याचे वर्तमान सविस्तर रा। हरिचंद्र हती लिहिले त्याजवरून कळो आले या प्राते दमाजी गायेकवाड व समसेर बाहदर व गैरे पथके पाठऊन मुख्य करनाटक प्राते जाणार म्हणून कितेक प्रकारे लिहिले तोही आर्थ सर्व ध्यानास आला राजश्री रघुनाथराव लग्न मार्गेस्वर मासी जालियांवर गुजराथ प्राते येणार यैसे सकल आर्थ अवगत जाला कलम १

दुसेंर तुम्ही लिहिले की रा। खडो त्रिंबक याजला दाहा हजार रुपयासाठी पत्र दाखविले यानी रा। नथो माधोरायाजवळ रुये ठेविले त्यास रा। नथो माधोराव यांनें येथे आवतार हजारांचा भरणा केला आहे तुम्ही तेथे तगादा त्याजला न करावा कलम १

खर्च वेचाचा मजकूर लिहिला त्यास तूर्त येथेही यैवजाचा ओढा भारी आहे गतवर्षी श्रीमत राजश्री रघुनाथरावदादानी मामलत चुकविली येथे यैवज नं मिळे तेव्हा हावाला घेऊन हजुरातून प्रगणे नेमून घेतले तेथे आमल सुरू जालियांवर दंगा जाला त्यामुळे सिबंदीच्या तहयराखाली आलो त्यामुळे ओढ जाली आहे विचार करून खर्चवेचासही तुम्हास पाठऊन देऊ चिंता न करावी खर्चवेच बहूत युक्तीनें समजोन करीत जाणे वावगा खर्च सहसा न करणे येक दो मासानी खर्च येगमीही करून पाठऊन देऊ चिंता नाही कलम १

दुसरे तुम्ही लिहिले की रा। महिपतराव चिटनिवीस सहकुटुंब यात्रेस आले तेव्हा श्रीत्रिंबकीहून पत्र पाठविले की खर्चची आबल {आबल} आहे काही खर्चस पाठवणे त्यांजवरून निदान जाणून पाचसे रुये दिल्हे तेथील यात्रा जालियांवर नाशकास आलियांवर बहूत आतिथ्य करून येथेही खर्चस दिल्हे रुये १३०० दिल्हे व प्रयोजन केले त्याजला रुये ५९५ लागले येणे भरणा त्याजकडे रुये २३९५ तेविसे पंच्यानव याचा आला तरी ज्याप्रा। तुम्ही दिल्हे प्रां। विचार करून उगऊन घेणे आम्ही आलियांवर जे देणे ते दिल्हे जाईल परंतु तुम्ही रुये दिल्हे ते विचारे करून मागून घेणे कलम १

रा। बाळंभट जाधव याजला पागेचा घोडा व उट दिल्हा आहे तो मागून घेणे व बाबाजी वैद्य व विस्वनाथ शुक्ल याजला व हरभटा ...... दिल्ही ते घेणे व रा। निळो रघुनाथ याजला उट व घोडी निळी {घेणे} दिल्ही आहे ते मागून घेणे कलम १

सदरहुप्रा। कलमे वाचून याचा जाब चा माणसासमागमे पाठऊन देणे वरकड येथील गुंता व कामाकाजाचा बंदोबस्त करून आविलंबेच येतो मौजे आधोटे व गेर व रामसेज किलियाचा मजकूर तुम्ही लिहिला तोही सर्व ध्यानास आला आम्ही देशास आलियांवर श्रीकृपेने उतमच होईल चिंता न करणे बहूत काये लिहिणे हे विनंती

रा। गिरधर व लक्ष्मण व बाबूजी सुनार यास आसीर्वाद[1]

---

१ मूळ कागद दुकोटकी मजकुराचा आहे. डावा कोठा व आद्यंत येथे दिले आहेत. उजवा कोठा पूर्ण खाजगी मजकुराचा असल्यानें गाळला आहे.

---

| | | |
|---|---|---|
| ले. १७४<br>सफर ७ | श्री<br>पौ। छ ७ सफर | श. १६७७ कार्तिक शुद्ध ८<br>इ. १७५५ नोव्हेंबर १२ |

तीर्थस्वरूप राजश्री बापू व दादा वडिलाचे सेवेसी

बालक पुरुषोतमाने व दिवाकराने कृतानेक सां। नमस्कार विनंती येथील कुशल तागाईत छ ७ सफर मुकाम मेरठ जाणोन स्वानंदोत्छव ले[हण्या"] आज्ञा करित गेले

पाहिजे यानतर आ [म्ही*] येथून कूच करून सिरधण्यास जातो व राजश्री बालकृष्ण-मामास मेरठेत ठेविले वारणाव्यात तीन साडे तीन हजार बलोच्य आहे वडिली कृपालू होऊन तैनाती राऊत पाठवावे व तेथल्या फितुरामुले ...चासा प्रगण्यात यैसेच बसले अहेत विना दोन तीन हजार फौज ठेविल्याखेरीज आमल बसत नाही याजसिवाये तैनाती सत्वर सत्वर पा [ठविले पा]हिजे व फौज ठेवावयाची आज्ञा त्वरेने पाठऊन द्यावी आज्ञा न पाठविली तर आमलही बसणार नाही नजीबखा रोहिलाही पार उतरून आला आपल्या मुलकांत येऊन धुमधाम क...वी विना फौज ठेविल्या कोणीही दबत नाही जोपर्येत आमल बसे तों तो पर्येत फौज ठेवावी लागते व तिकडील धूमधाम शमे तो पर्ये [त*] फौज तीन चार हजार ठेवावी लागेल या पत्राची मार्गप्रतीक्षा करितों जर पत्राचे उतर न आले तर मग मेरटेनही बसणे कठीण पडेल मऱ्हठी फौजेस [स*]त्वर पाठवायाची ते सत्वर पाठविली पाहिजे काधल्याजवल कुतुबखा चै हजारा फाजेनसी आहे सत्वर फौजे ठेवावयाची आज्ञा पाठवावी हैगई कराया...कार्ये नाही हैगई कलिया आमल थ्री न करो बसणे कठीणच आहे व तेथली धूम सत्वर मिटलिया फौजही दूर केली जाईल व दाहा हजाराची हुडी पाठविली आहे ते पोहचेल उतर वेगले सादर [केले] पाहिजे आणीख ऐवज दबावाखेरीज येणार नाही आज्ञा सत्वर पाठवावी नाही-तर ऐवज येणे कलतच अहे पो छ ७ सफर

---

| ले. १७५ सफर १६ | श्री | श. १६७७ कार्तिक वद्य २ इ. १७५५ नोव्हेंबर २१ |
|---|---|---|

पुा राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसि

उपरी राजश्री गोपालराव गणेश याणी वेकाजी गिरधर येक महस्त पाठविला त्याजबरावर स्वामीचे पत्र व राजश्री मल्हारजी होलकर याचे पत्र व मारनिलेची अर्जी वजिरास होती त्यातील थैल्या नवाबास गुजरानल्या त्याचा जाब मुनसीस , ल्याहावयास सागितला की चकले कुरा व चकले कडा पातशाही खालशाचे आहेत गतवर्षी तुम्हास पैका देणे होते आमच्या हाताखाली पैसा नव्हता याजमुले गोविंद-पंतापासून हाजीर जामीन व माल जामीन व फैल जामीन घेऊन येके सालची नव लक्ष रुा जमा तुम्हास देविली त्याचा आमचा करार कीं बकाउलाखानास काढावयास खर्च जाला अगर त्याणी काही वसूल नेला असिला तरी त्याचा दावा आम्हाकडे नाही तुम्हीं आमच्या मुलकाचे वाटे न जाणे म्हणोन ल्याहावयास सागि-तले व आम्हास बोलाऊन शब्द लाऊन बोलले म्हणोन लिहिले ते कलले [नि.*]ऐसि-यासी बकाउलाखान जुझला तथापि आम्ही सिर्वंदीचा ऐवज न उगवावा हा करार नाहीच वजिराच्या सनदेवरून कडा कुरा जर बकाउलाखानाने गोविद बलालाचे हवाले केला आसता आणि गोविद बलालानी मुदतीबरहुकूम रुपये दिल्हे ते ... तुम्ही

लिहिता ते वाजवीच होते गोविंद बलालानी रुपये दसऱ्यापावेतो दिल्हे नाहीत आद्यापि दिल्हे झाडून किंवा नाही हेही कलत नाही वजिरानी बकाउलाखानास आंतस्तेही लिहिले आसेल त्याजवरूनच तो जुझला आसेल हे वजिरास तुम्ही का समजावीत नाही आमलसे नेटून बोलले म्हणजे सारे उमजतील पुढे वजिराचे मनात या गोष्टीवरूनच आम्हासी विरोध वाढवावा अैसे आसले तरी चिंता नाही चिरंजीव दादाची व राजश्री मल्हारबाची रवानगी पंधरा दिवसा. होणार मग सहजच सलूख करितील व [ स* ]मजाऊन घेतीलसे दिसते जाणिजे छ १६ सफर बहूत काये लिहिणे [ च.* ] लेखन । सीमा

पौ छ १ राखर

---

ले. १७६
सु. ११५६ सफर १७

श्री

श. १६७७ कार्तिक वद्य ३
इ. १७५५ नोव्हेंबर २२

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव वं दामोदर माहादेव गो यासि

सेवक सदासीव चिमणाजी नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्हीं पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले लिहिला मजकूर सविस्तर कलला येविसीची उतरे तीर्थरूपानी लिहिली आहेत त्याजवरून कलेल [नि.*] जाणिजे छ १७ सफर सुा सीत खमसैन मया व अलफ [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ च.*] लेखन । सीमा

पौ छ ७ राखर

---

ले. १७७
सु. ११५६ सफर १७

श्री

श. १६७७ कार्तिक वद्य ३
इ. १७५५ नोव्हेंबर २२

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गो यासि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्हीं छ २४ जिल्हेजची पत्रे पाठविली ती छ २१ मोहरमी पावली लिहिला मजकूर सविस्तर अवगत जाहाला येविसीची उतरे अलाहिदा पुरवणी पत्रीं लिहिली आहेत त्यावरून कलेल जयापास दगा केला याजमुले तमाम वकील येऊन अर्ज करितात की खर्चाची बेगमी करितो आपण बाहेर निघावे त्यास खर्चाची बेगमी जाली तरी बाहेर निघतील म्हणोन लिहिले ते कलले ऐशास आमचा व वजिराचा स्नेह असतां त्याणी अन्यत्राच्या गोष्टी आइकून आम्हांसीं विरुध करावें यांत त्याचा नफा नाहीं आमची जरब विजेसिगास पोहचली सबब ते वजिरासी बोलतात येरवी ते वजिरासी कोठे बोलत होते हा अर्थ वाजिरानी चितांत आणून व आमचे उपकार स्मरोन या समई वजिरानी राजश्री दताजी सिंदे व जनकोजी सिंदे यांची कुमक करून विजेसिगाचें पारपत्य करावें यांतच

त्याचे बरे व सर्वां हिंदुस्तानाचे बरे असें येविसी तुम्ही बहूतसी मेहनत करून आपले पल्यावर वजीर सर्व मुतवजे होत ते करणे [ नि.* ] जाणिजे छ १७ सफर सुा सीत खमसैन मया व अलफ बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

पौ छ ७ राखर

---

ले. १७८ }
सु. ११५६ सफर १७ }

श्री

{ श. १६७७ कार्तिक वद्य ३
{ इ. १७५५ नोव्हेंबर २२

पुा राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसि

उपरी सुरजमल जाटाचा अमंल करारवाके कोल प्रांतात जाल गडकिलेकोट सजले आतां लवकर उखलत नाहीसे जाणून द( खे )तसिंग व मिरजा शाकर व दतीसा व गैरे लहानमोठे टोग जाऊन जाटास भेटले आज्ञा मागतली की सोरू व गंगेरी व गैरे जागा मराठियाची ठाणी आहेत प्रस्तूत मराठियाची फौज या प्रांती नाही रजा द्याल तरी आपले पोट भरून च्यार रुा मेलऊन त्यास याणी आपले नाव बदलाम न करितां जाऊन पोट भरणे माझे आग दिसो न देणे आपले काम करणे मी मराठियाची कुमक करीत नाही इतकी आज्ञा घेऊन आले पहिला जमाव चागलाच आहे आणखी जमाव धरितात कजिया करू लागल्यास नवी सिबंदी ठेऊन कार्य करावे लागेल येविसिची आज्ञा असावी सरकार कामावर नजर देऊन सिबंदी ठेवणेच लागेल म्हणून लिहिले ते कलले [ नि.* ] येसियास यैशा किरकोल जमीदारानी लबाड्या केल्या तरी परिणाम कलतच आहे त्याहीमध्ये तुम्ही शाहाणे आहां सिबंदी न पडता रुपयाही वसूल कराल व लबाडांचेही पारपत्य कराल हा भरवसाच आहे सरकारच्या कामासाठीं तुम्ही जसी जबरदुस्ती पोहचावणे तसी पोहचाऊन सिबंदी न पडता कामं करून रुपया वसूल करणे [ नि.* ] जाणिजे छ १७ सफर सुा सीत खमसैन मया वे अलफ [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

पौ छ ७ राखर

---

ले. १७९ }
सु. ११५६ सफर १७ }

श्री

{ श. १६७७ कार्तिक वद्य ३
{ इ. १७५५ नोव्हेंबर २२

पुा राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गो यांसि

उपरी जाटाचा मजकूर चिरंजीव राजश्री दादाचे पत्रीं विस्तारे लिहिला त्यात मुख्यार्थ कीं जाटाचा सलूख जाला ते समई स्वामीनी कृपाळू होऊन पातशाही खालंशाचे माहाल व वजिराच्या जागिरा व जागीरदाराच्या जागिरा त्याणी ज्या ज्या मागितल्या त्या लेहून दिल्हा स्वामी दक्षणेस कूच करून चालिले हे जाणून आपण कोलेस आला कुल माहालाचा बंदोबस्त केला हंगाम्याचे दिवस व महसिलेचा

समय या दिवसात दिलीतून फौज आल्यावर आपले हाती काही येणार नाही ऐसे जाणून दाणागला जमा करावा यास्तव रूपराम कटोरियाचा लेक नागरमलाशासी पाठविला मफदरजंगानी अठरा लक्षाची जागीर देऊ केली होती ते या महालशो या येसे आशेत गोऊन आपण सारे मुलकाचा पैका व गला कुंभेरभरतपुरात भरला दाणादुणी मजमूद केली आणि दिलीकडे रोख केला तेव्हा नजीबखानास जाटास नंची पोहचवावयास सागितले खान मारानिले फौजसुधा गेले सेवटी जाटानी मेळऊन घेऊन उभयेताचा तहरह जाल्याचा मजकूर लिहिला तो कळला ऐशास जाट दगाबाज त्याणी आपली काबू देखिली व वजिरानी आपला फाइदा पाहिला ते केले असेल पुढेही कसकसे उभयेता चालतात ते सविस्तर लिहीत जाणे [ नि.* ] जाणिजे छ १७ सफर सुा सीत खमसेन मया व अलफ [नि *] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा पौ छ ७ राखर

---

ले. १८० } श्री { श. १६७७ कार्तिक वद्य ३
सु. ११५६ सफर १७ } { इ. १७५५ नोव्हेंबर २२

पुा राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसि

उपरी लाहोरच्या सुबदारीचा अमल बहूत करून अबदाली याचे लोकाकडेच वाढत आहे मीर्जा मनूची बाइको या वजिराची सासू तिचा कारभारी भिकारीखान होता त्याचा व तिचा पेच पडोन त्यास कैद केले सेवटी मृत्य पावला बलनाइकी स्त्रीनाइकी बहुनाइकी जाहाली जिकरीखानाचा चुलत भाऊ अबदुलाखान याणे अटकेपलीकडे जाऊन अबदाली याची फौज आणिली शहर लुटले गेले अमलही अबदाली याचा जाहाला फौजही जमा होत जाते मीर मनूची बाइको तेथे गुतली व वजिराची बाइको तेथे गुतली याणी आणावयाचा उद्योग केला परंतु अनकूल न पडे अबदाली हिंदुस्थानचे पातशाईचे पात्र नाही परंतु येथील हे अवस्था श्रवण केल्यावर काये आशा निर्माण होईल हे न कळे म्हणोन लिहिले ते कळलें या उपरीही तिकडील येईल वर्तमान ते लिहीत जाणे [ नि.* ] जाणिजे छ १७ सफर सुा सीत खमसेन मया व अलफ [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

पौ छ ७ राखर

---

ले. १८१ } श्री { श. १६७७ कार्तिक वद्य ३
सु. ११५६ सफर १७ } { इ. १७५५ नोव्हेंबर २२

पुा राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसि

उपरी श्रीमंत राजश्री दादासाहेब जाते समई आज्ञा केली कीं मेरठे वगैरे जिरानी सरकारच्या ऐवजी दिल्हे तेथील ऐवज तनखेदारास देऊन हुजूर येणे

त्यास दादासाहेब गेलियावर खालसेवालियानी कुचीद केसे तेव्हा सिबंदी व गैर जमाव करून प्रांत जप्त केला तेव्हा देहावर येऊन आणशपत केली तुमचा रुपया फिटेतो प्रां मजकुरीं उपसर्ग करणार नाही म्हणोन करार केला आम्हीं श्रमसाहास करावयास चुकत नाही कृपा करणार स्वामी समर्थ आहेत म्हणोन लिहिले ते कळले उतम आहे तुम्हीं मातबर सेवक सरकारकाम आढललियांस करावेंच करावें.............तेथे हे माहाल तों तुमच्या निसबत तुम्हीं निर्बंध करून घेतले उतम आहे [ नि.* ] जाणिजे छ १७ सफर सु।। सीत खमसैन मया व अलफ [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ब.*] लेखन । सीमा पौ छ ७ राखर

---

ले. १८२
सु. ११५६ सफर १७

श्री

श. १६७७ कार्तिक वद्य ३
इ. १७५५ नोव्हेंबर २२

पु।। राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गोसावी यांसि

उपरी मेरठे व गैरे माहालच्या ऐवजी रा।जश्री धोडावा ना। व सिलेदार व गैरे यास ऐवज देविला त्याचा मजकूर विस्तारें लिहिला कीं ऐवज त्यास पावता जाला म्हणजे स्वामीच्या दर्शनास येतों या प्रांती फौज नाही याजमुळे अंतरवेदीत दंगे बहूत श्रीकृपेने ऐवज यांस पावेल म्हणून लिहिले ते कळले ऐशास वराताप्रो। यैवज ज्याचा त्यास पावता करावा व तुम्हीं चिरंजीव राजश्री दादाजवळ करार केला त्याप्रो दर्शनास यावे ऐसे असता दिवसगत लावणे उतम नाहीं तुम्हीं मातबर सेवक तुमच्या रीतीभाती सालसपणास ह्या गोष्टी दूर आहेत अतःपर मेरठे व गैरचा ऐवज वरातदाराचा वरातदारास पावणे राहिला यैवज त्याची वाट करणे दर्शनास यणे [ नि.* ] जाणिजे छ १७ सफर सु।। सीत खमसैन मया व अलफ [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा पौ छ ७ राखर

---

ले. १८३
सफर २५

श्रीवरद

श. १६७७ कार्तिक वद्य १२
इ. १७५५ नोव्हेंबर ३०

तीर्थस्वरूप राजश्री बापूसाहेब व राजश्री दादासाहेब वडिलांचे सेवेसी

बालकें पुरुषोतमाने व दिवाकराने कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील क्षेम तागाईत छ २५ माहे सफर जाणोन स्वानंदोत्छव लेखन आज्ञा करीत गेले पाहिजे यानंतर वडिली पत्र छ २१ माहे मजकूरचे पत्र पाठविले ते छ २४ मिनहूस पावले त्यात कितेक विचार लिहिला तो कळला लिहिले की दिनानाथ सुखरूप पावला व त्याने कितेक सागितले त्याजवरून मऱ्हाठी फौज चाकर ठेऊन पाठवितो फतेसिंगासही

पैगाम केला आहे बनल्यास त्यासही पाठऊन देऊ व आणीखही पथके शोध
पाठवितों व बाकीचे तैनाती उरले आहेत तेही पाठवितो व कोयेलेवाले पांच
ठेऊन पाठवितो म्हणून लिहिले तर बहूत आपूर्व आहे कोयेलेवाले पाचसा
आणखि पथके फतेसिंगासहवर्तमान हजार बारासे ठेऊन बाण ज्यजला व गै
सरंजाम दिनानाथाबरोबर देऊन त्वरेने पाठविले पाहिजे विलब न करावा व
लिहिले की केवल फोजेच्याच भरी पडो नव्हे म्हणून लिहिले ऐसियासी माहा
रुपया वसूल करून श्रीमंतास पोहचता हाये व आविलंबिलें कार्ये सिधीस प
गोस्टीचीच चिंता आहे परंतु लाच्यार होऊन फौज ठेवावी लागते आमल सु
जालियानंतर फौजेचे आगत्य नाही यैसें आसोन ठेवणे जालें तर बाहेर उ
करून चालऊ कुतुबखानाने क्षिजण्यास फौज पाठऊन आमल केला नजीबख
चितांत शामली किराणा सोडावयाचे नाही विना दबाव कोणी मानितेसा पदार्थ
—र साम दाम दंड करून दबावेकरून घेऊ कुतुबखानाने केवल माचोदीवर आला
श्रीकृपेने व वडिलांचे आसीर्वादे मारून घेतो आज त्यारुखेच सातआठा को
कूच करून जातो दोनी रोजानी त्याचा आमचा मुकाविला होईल श्रीकृपेने व
लांचे आसीर्वादे मारून घेतो वडिली जे काही पथके मिलविले आसतील तें पत्रद
पाठऊन द्यावीं बाण पत्रदर्श[नी*] पाठऊन द्यावे हैगई सहसा न करावी व मेघरा
समागमे पत्र पाठविले आहे ते जर श्रीकृपेनें काम जाले तर पाचसात हजार म
ठेवलिया कार्यास येतील वडिली बाण पत्रदर्शनी पाठवावे बाणाची निकड.....

---

ले. १८४ } श्री { श. १६७७ मार्गशीर्ष शुद्ध
खल ९ } { इ. १७५५ डिसेंबर १३

राजाश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर मा
गोसावी यांसि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कु
लिहिणे विशेष सांप्रत तुमचे पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी दिलीतील व जा
व पठाणाचे व राजश्री जनकोजी सिंदे व गैर वर्तमान सविस्तर वरचेवरी लेहून पा
जाणे इकडील मजकूर तरी पुणियाहून मजल दर मजल आमचे येणे कृष्णातीरी ज
येथे चिरंजीव राजश्री दादाचे लग्न करून चिरंजीवाची रवानगी हिंदुस्थानात
राजश्री मल्हारजी होलकर फौजसुधा रवाना करितो फौजेचीही समजावीस होत उ
येथून निघालियावरी मजल दरमजल त्याप्रांती येऊन दाखल होतील गुंता नाही [नि
जाणिजे दतबाचे बहूत साहित्य करणे वरकडही जी जी आज्ञा चिरंजीवानी
होती ते सर्व स्मरण करून करणे वरचेवर वर्तमान लिहीत जाणे छ ९ रबिलावल
काये लिहिणे [ब. *] लेखन । सीमा पा छ २(?) रबिल

ले. १८५ } { श. १६७७ माघ
{ इ. १७५६ फेब्रुवारी

मरहाटे आहेत ज्याची ज्याची जे जे पदे आहेत ते त्याची त्यास द्यावी व राज्यास काढून अभिशक करून राजी बसवावे ज्याप्रा राजा सागल त्याप्रा पहेल्यासारखी वर्तणूक करावी ह्या गोस्टी सर्व नानासाहेबी माने केल्या त्याजवरून मल्हारराव सळूकाचे पैगाम्रास मोगलाकडे व घोरपडयाकडे गेला आहे आझून काही निर्गम् जाले नाही रा॥ नारो शंकर व समसेर बाहादर या दोघास दाहा हजारा स्वारानसी मारवाडात रुसकत केले नारू शंकर तो कुचे करून झासीस आले समसेर बाहादराची मार्गप्रतेक्ष्या करितात समशेर बाहादर बऱ्हानपुरावर पडला आहे त्यास फिरून माघारे बोलाविले आहे मारवाडात जाणे होत नाही देसी फार हंगामा आहे सर्वाच्या चितात कीं पेशव्यास पाताळी घालावें संबाजी राजाही फौजबदी करून साताऱ्यास येणार व सैना खासखेल फौजबंदी करून गुजरात प्राती जाणार यैसाच चहूकडून गुलगुला उठला आहे पाहावे बहूतचे भागे आहे ईस्वर कार्ये करील हे न कले हे वर्तमान जबानी झासीत आयेकिले म्हणून सा॥ लिहिले आहे खरे लटके ईस्वर जाणे परतु दक्षणेस मुजरद जोड्या पाठऊन वरचेवर इकडली खबर घेत जाणे बहूत काये लिहिणे हे विज्ञापि

रा॥ भिकाजीपंत दाजी स्वामीस सां॥ नमस्कार विनंती की स[दै]व कृपापत्र पाठऊन संतोशवीत जाणे व तुमचा गवकरी बोकील कासीस गेला होता तो आला झासीत आम्हास भेटला त्यास तुमचे भावाचे वर्तमान पुसले तो म्हणाला की त्याचे कोठे ठिकान लागत नाही याप्रमाणे भाशन केले सा॥ कळावे

---

ले. १८६ } श्री { श. १६७७ माघ वद्य १०
जवल २४ } { इ. १७५६ फेब्रुवारी २५

भरोंसा वाट..............यांसही सर्वप्रकारें आम......शंई अवश्यक आहे...... येतद्विशंई पंडित माारानि......पाठविलेंच आहे आाणि तुम्हा...कडील अगत्यवाद आहे अैशियास [तु]मचे लिहिल्याप्रमाणे दरबारखर्चास अैवज पाठवावा त्यास आम्ही सांप्रत राजश्री पंतप्रधान यांसमागमे सावनूरप्रांते मोहिमेस गुंतलो आसो आपले ताळुकियांत गेलियावरी सरबराह होऊन येईल चिंता नाही प्रस्तुत आपला आमचा कांहीं दुसरा विचार नाहीं मतालब पूर्वी याददास्त पाठविली आहे त्याप्रमाणे सिध जाहालेच असतील तरी गोसावी यांनी आमचे तर्फेने आपणाकडून पंचवीस हजार रुपये पावेतों दरबारखर्च करून कागदपत्र घेऊन आम्हाकडे पाठऊन द्यावे आम्ही नागपुरास गेलियावरी..............घेऊन पावतांच लिहिल्याप्रमणे यैवज आपणाकडे पांवता करू येविसीं अंतर होणार नाहीं राजश्री लक्ष्मण देवाजी यांस आपले जा... सविरी ठेविले आहेत लिहिल्याप्रमाणे अनमान न करितां खर्च करून कार्यसिधी

करून पाठविली पाहिजे वरकड अर्थ मारनिलेच्या पत्रीं लिहिला आहे त्यावरून कळों येईल रा। छ २४ माहे जमादिलवल [ नि.* ] बहूत काये लिहिणे हे विनंती [ वा.* ] मोर्तब । सुद

[ पाठीवर डाव्या हाताचे कोपऱ्यांत पुढील अष्टकोनी शिक्का* ] श्री । श्री शाहुरा। जपदांभोजभ्रम । रायितचेतसः बिं । बात्मजस्य मुद्रे । पा राघवस्य । विराजते

---

ले. १८७ } श्री { श. १६७७ फाल्गुन शुद्ध ७
सु. ११५६ जखर ६ } { इ. १७५६ मार्च ८

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव स्वामी गो यासि

पो बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष बंगालियाचा तनख्याचे वसुलास राजश्री राघो नीलकंठ पाठविले ते श्रीकाशसि गेले आहेत त्यास शाहामतजंग पातशाही दिवाण बंगालियाचा त्याचे नावे तनख्याचा परवाना होता तो मेलियावर माहाबतजंगास दिकत घ्यावयास जागा जाली याजकरितां हुजरून पातशाही दिवाण ठरला असेल त्याचे नावे परवाना व माहाबतजंगाचे नावे ताकीदपत्र घेऊन राघो नीलकंठ याजकडे पाठवणे जर दिवाण ठरला नसेल तरी माहाबतजंगासच वजिराचा हसबलहुकूम व जमदास याचे पत्र येसे घेऊन मारनिलेकडे पाठवणे [ नि.* ] जाणिजे छ ६ जमादिलाखर सु॥ सीत खमसैन मया व अलफ [ नि.* ] बहूत काये लिहिणे हे विनंती

पौ छ २१ रमजान

---

ले. १८८ } श्री { श. १६७७ फाल्गुन शुद्ध १०
सु. ११५६ जखर ९ } { इ. १७५६ मार्च ११

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव स्वामी गोसावी यांसि

पो बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष सरकारच्या फौजा त्या प्रांती नाहीं येसे वजिरानी पाहून अंतरवेदींतील अमलास फितूर करून सैद अस्कर अली व गैरे यास मनदा देऊन पाठविले त्याणी येऊन सकुराबादचे ठाणे घेतलें तेव्हा राजश्री गोविंद बलाल व हरी विठल यांस तिकडे जाणे प्राप्त जालें याची व त्याची लडाई होऊन त्याचे पारपत्य चागलेंच जाले ऐशास आमचा व वजिराचा स्नेह चालत आला असतां त्यांणी आमच्या माहालाची घालमेल करावी हे त्यास उचित नाहीं व तुम्हीं तेथे असतां अशा

गोष्टी व्हाव्या हेही योग्य नाहीं अतःपर तुम्ही वजिरास उत्तम प्रकारे सांगोन चालत आल्या श्नेहाची अभिवृधी होवे ते करणे [ नि.* ] सारांश हाच की सरकारचे अमलात दिकत न पडता सुरलीत चाले ते गोष्ट करणे तुम्ही तेथे असता ह्या गोष्टी सहसा होऊ न द्याव्या हेच तुमची वकिलीची शर्त आहे याउपरी लिहिल्याप्रो जलदीने अमलात येई ते करणे जाणिजे छ ९ जमादिलाखर सुा सीत खमसेन मया व अलफ [ नि.* ]ःबहूत काये लिहिणे हे विनंती

पौ छ ६ सवाल

---

ले. १८९ } श्री { श. १६७७ फाल्गुन वद्य १३
[उत्तरी] चैत्र वद्य १३ रवि. } पौ छ १ रजब { इ. १७५६ मार्च २८

श्रीमंत [मो. जा*] राो बापूसाहेब व ताो राो दादासाहेब स्वामीजीचे सेवेसी

सेवक चरणरज धर्मराव तमाजी व बाळाजी गोविंद कृतानेक साोे नमस्कार विनंती उपरी येथील कुशल चैत्र वदी १३ रविवार जाणून स्वामियानी स्वकुशल लेखन आज्ञा केली पाहिजे विशेष साहुकारी पत्रें आली जे जालोर निकामी जाहली जालोरेंत रामसिंगजीचा अमल जाहला सिंदे कूच दरकूच करून श्रीपुष्करास पावले काही येक दिवस पुष्करी राहून पुढे कूच करून ये रुखें येणार राणोजी भायेटें व नरसिंगराव हे उभयेतां वेगले वेगले होते ते या दिवसांत सामरेनिकट येकत्र जाहले येणेमुळे काही येक स्वस्थता भासली असे येकत्र व्हावयाचे कारणे न जाणिले व शमशेर बाहादर उजेनीनिकट पावले म्हणून वर्तमान साहुकारीं अले व उजेनीतून खरचानिमित्य बाहदर मजकुरानी लक्ष रुपये घेतले कूच दरकूच जनकोजी सिंद्यासमीप येणार याप्रो वार्ता विशेषात्कारे असे राजेश्री पेमासिंग गोगावत गढावर हेते शरीरेकडून रोगी हेते त्यास कालचे दोन प्रहरां रात्रीस काल पावले सर्वांस कारण काल यांचे प्रकारें लिहिला होता अकस्मात मृत्यू पावला मनुष्य बहूत थोर लौकिकी स्वामीकार्यी रत हेता भावी बलोतर प्रभूच्या मनास अले तैसे त्यानें केले या गोष्टीने लाहन थोर बहूत करून दिलगीर जाहले व अहेत रूपराम कठारा व हेमराज कटार हे दोघेही येऊन बदनपुऱ्यांत आपले धण्याचे बागांत उतरले त्यास श्रीजीची भेटी घेऊन येकादों दिवसां रूपराम तर टिका वगैरे घेऊन राो जनकोजी सिंद्याकडे जाहील व हेमराज येथेंच राहील याप्रो वार्ता असे करोलीवाला व सरदारसिंग नरूका पाहवे या उपरांत काही येक दिवस राहतात किंवा रजा बरजा रुकसत घेऊन स्वस्थानास जातात जे काहीं अमलात येहील तदनरूप विनंती केली जाहील साहेबाची अर्जी श्रीजीचे हजूर गुजरली तेणेकडून बहूत राजी राहले व दर जबाबही अर्जीचा साधून सेवेसी पाठविला असे अवलोकनेकडून कळू येहील राजे अहेत ज्या गोष्टीने राजी राहेत त्याप्रकारे राजी राषणे स्वामीस योग्य मागती दर जबाबी अर्जी निपट हितवादेकडून लिहून पाठविले पाहिजे की पत्रापत्रीं सिलसिला गर्म असल्या अलबत्तें काहींना काहीना समयोचित

कारणीक होईल यांत संदेह नाही चिरंजीव रा। बाल मुकुंदजी विशही प्रत्तिउतर लिहिले असे श्रीमंताची कृपा पूर्ण जाहल्याच लौकिकास येतील सर्वप्रकारें मनोधारणा सेवकेजनास्तव जरूर प्रतिउतर अतिसामतेचे इनायत केले पाहिजे व रा। सिंद्याकडील रा। रामाजी भाऊकडील पत्रें रवाना केली असेत प्रतिउतर अल्या सेवेसी पाठवनि बहूत काये लि॥ विस्तारेंकडून रा। रामचंद्र त्रिंबक विनंती करतील त्यावरून कळू येईल बहूत काये लिहिणे कृपालोभें प्रतिपाललें पा। हे विनंती

---

| | | |
|---|---|---|
| ले. १९०<br>रजब २७ | श्री<br>पै छ २१ रमजान | श. १६७८ चैत्र वद्य १४<br>इ. १७५६ एप्रिल २८ |

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव स्वामी गोसावी यांसि

पो। बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष बहूत दिवस तुमचे पत्र येऊन तिकडील वर्तमान कळत नाही तरी सविस्तर लिहिणे इकडील वर्तमान तरी रा। मुराररावा घोरपडे व सावनूरकर पठाण यास सावनुरात कोंडिले गावं जेर जाला नवाब सलाबतजंग वराडांत जात होते ते मजल दर मजल आमच्या मदतीस येऊन पावले त्यास घोरपडे व पठाण फारच तंग होऊन शरण आले सावनूरकर पठाणानी निमे मुळीक व अ [मो. जा.*] लक्ष रुपये दिल्हे घोरपडे यानी चाकर होऊन चाकरी करावी पुण्यास यावे याप्रो। तह जाला नवाब येथे आल्यावर यान्च्या व आमच्या भेटी येक दोन वेळा जाल्या नवाब आमच्या डेऱ्यास आले होते फारच श्नेह ममता धरितात अतःपर करनाटक प्रांतीचा खंडणीचा निर्गम करून सत्वरच देसी यावयाचा विचार होईल [नि.*] तिकडील सर्व वर्तमान जलद लिहीत जाणे छ २७ रजब हे विनंती

---

| | | |
|---|---|---|
| ले. १९१<br>मोहरम १९ | श्री | श. १६७८ आश्विन वद्य ६<br>इ. १७५६ आक्टोबर १४ |

राजाश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव स्वामी गोसावी यांसि

पोष्य बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे यानंतर वजीर बाहेर निघोन अंतरवेदींत जावे सरकारचा अमल उठवा [वा*] या उदेशे फौज जमा...तुम्हीं त्यास वरचेवरी स्मरण देऊन ऐसी गोष्टि होऊ न द्यावी ते न करिता ऐसे वजिरानी योजिले म्हणोन विदीत जाले तरी हे गोष्ट काही कार्याची नाही सरकारचे अमलास खलल करावी हे त्यास उचीत नाही तरी याउपरी केली मसलत मना करावी चिरंजीव राजश्री दादानीही

खानगी जाली तेही लोकरीच येतील पुढे त्याजपासून कितेक उमदे मनसुबे. व उमदी उमदी कामे करून घ्यावी हा मनोदन( य ) अमचा असता हे गोष्ट अराभिली तरी उतम नाही ज्यात सरकारचे अमलास उपद्रव न लागे ते गोष्ट करणें [नि.*] सरकारचे मुलकास तिलमात्र पेच न पडे ते जरूर करणे छ १९ मोहरम हे विनंती

पौ छ २७ रावल

---

ले. १९२ } श्री { श. १६७८ कार्तिक शुद्ध १२
सु. ११५७ सफर ९ } { इ. १७५६ नोव्हेंबर ३

राश्रश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व दामोदर माहादेव गो वासि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष विजेदुर्ग इंग्रेजानी बेइमानी करून ठेविला देत नाही असेच जाहाले होते त्यास आपले गुते उरकल्यावर किला देतो असे तोंडी बोलत व लिहीत गेले त्यास सरकारतर्फेने त्यासी विरुध न करितां त्याणी बेइमानी केली ते त्याचे पदरी घातली व येथील कितेक प्रकारे आच सोसून परिणाम लागणार नाही हा सर्व अर्थ त्याणी चितात आणून मातबर इंग्रेज हुजूर पाठऊन किला द्यावयाचा करार करून छ ३ सफरी किला सरकारात फते जाहाला हे संतोषाचे वर्तमान कलावे यास्तव लिहिले असे [ नि.* ] जाणिजे छ ९ सफर सुा सबा खमसैन मया व अलफ [नि.*] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा पौ छ २१ रावल

---

ले. १९३ } ॥ श्रीशंकर { श. १६७८ माघ शुद्ध ६
जवल ५ बुध. } { इ. १७५७ जानेवारी २६

श्रियासह चिरंजीव राजश्री नाना व तात्या यांसि

बापूजी माहादेव कृतानेक आसीर्वाद उपर येथील कुशळ ताा छ ५ माहे जमादिलवल बुधवार मुकाम दिली जाणून स्वानंदाछिव लिहीत जाणे विशेष तुमचीं पत्रें दोघांचे हातची दोन मथुरेस पावल्याची जासुदाबाार पावली वर्तमान सविस्तर विदित जालें तुम्हांमागून चिरंजीव राजश्री दादास रवाणा केलें देवदित खुशालचंद सोर सांगातेच होते श्रीकृपेने तेही पावले आसतील ते तुम्ही सर्व येकत्र जाल्यावर कोठे राहायाचा निस्चये ठहरला काये जाले तें लेहणे दिलीचे वर्तमान तर नवाब वजीर व खानखानां आपलाले संमुदायेसहीत शाह आबदालीस जाऊन भेटले...माणसास न... गर कसे म्ह ...त शाहवलीखा वजिराचे णी ... नादरशाहचे वेलेस महमदशा ...... कोणी आलमगीर सानी आहेत किल्यांत व...कुल बंदोबस्त आबदालीचा जाला मुंगीस ...हीं छत्र तख्त फर्श फरूश सायेबान आदिकरून जलूसाची तयारी करविली सिध-

जाली पाहावे कोण्या दिवसी किल्यांत दाखल होऊन तख्तीं बसतो व तदनंतर कार करितो हें पाहावें नजीबखां आज्ञेप्रमाणे पटपडगंजावर जाऊन उतरल रसदेच्या आणवायास जाहानखान पार होता तो आज आज्ञेप्रमाणे यमुना उतरून दक्षणतीरीं पटपडगंजाचे मुकाबल्याने कांही बारापुल्याजवळजवळ येऊन उतरला शाहचा मेहुणा सत्रा हजारा स्वारान[ सी* ] ... हून काल आला त्यासही आज्ञा जाली आहे की...देच्या...वर जाऊन उतर नजीब...हद...सनचंद हे जाहानखाना...ने...किफायेत करून...भेवायास प्रवर्त...बहूतकरून तों...शहर...ब जालें राहिल्यां...चे व लुटीचे भये...हने...धली आतां किशनचंद...भय...निर्माण जाले आहे या...[ वर्त ]मान तर कु[ ल टा* ]णी उठलीं येक मेरठेंत हजार पांचसें राऊत जमा जाला आहे ते बलकटींने आहेत सरांवेकर व सिरधनेकर अद्याप ठिकाणींच आहेत तिकडे फौजाही गेल्या नाहींत परंतु मुलकाची कांच खुलून गेली तेथें मेरठेत त्यांस भक्षायास नाहीं तहसील बंद येथे आम्हांस कवडी नाहीं पांच पांच फाके होतात वकालत तों राहिली येशा संकटांत किमर्थ राहिले म्हणाल तर चिरंजीव दादाने मोठ्या शहाणपणे हे माहाल मेलविले दोन वर्षें याजवरच योगक्षेम जाला व पुढेंही हेच उमेद राहिली न येजमानाकडील आश्रा न पातशाहकडील या दुराशेस्तव राहिलों त्यास याकूबअलीखानाचे विद्यमानाचे दोन तीन रकमा समाधा [ नाच्या* ] व दिलजमईच्या आल्या याकरतां ..... खान मजकुराचे विद्यमाने शाहवलीखानाची भेटी घेतली उठून ... मजोसी व खातरजमा केली व फार समाधा ...बोलला कीं वसवास खाऊन सर्व शाहजाहानाबाद गेली तुम्हीं आमच्या वचनावर राहिले तेणेकरून बहूत कामे जालीं कोणती म्हणाल तर तुमच्या धण्यापासिं तुमचा मुजरा जाला कीं सर्व गेले व हे राहिले या गोष्टीने आमची व शाहची फार खुशी जाली या गोष्टीने गोया तुम्हीं शहनशाहची व आपल्या खावंदाचा सलुकाचा डौल कायेम ठेविला व हे पातशाहत तर आमची मौरूसी आहे काहींक दिवस आम्हांपासून गेली होती ते ईश्वरें हकदाराचा हक पोंहचाविला आम्हीं उतर दिधले कीं तुम्हीं आमच्या जलालुदींपासी बालले होते कीं जें याकूबअलीखां बोलेल ते माझी जुवान जाणा शाहची जुबान जाणा व दोन तीन रकमा पैहम आल्या व खान मशारनिलेवर आमचा बलकी आमचे दों लक्षा फौजेचे सरदारांचा येतकाद यानी भांतभांतची निशां केली त्या...

---

ले. १९४ } श्रीराम { श. १६७८ फाल्गुन वद्य १
जखर १५ सोम. } { इ. १७५७ मार्च ६

सहश्राये चिरंजीव राजश्री नाना व तात्या यासि

प्रती दामोदर माहादेव कृतानेक आसीरवाद उपर येथील कुशल ता छ १५ सोमवार प[ हि* ]ली प्रहर रात्र माहे जमादिलाखर मुकाम कोंच येथास्थित जाणौन स्वकीये

लिहिणे विशेष कासिदाबरोबर पत्र पाठविले ते छ १२ पाऊन परम समाधान जाले लिहिले की तीर्थस्वरूपाचा पुणरजन्म जाला त्यासि श्रीचे रूपेण आपल्यास प्राण भेटला आज्ञापत्री लिहिण्यात येत नाही श्रीणे थोर रूपा केली ये... चिरंजीव गणपतराव यांसि आणूण आम्हाकडे पाठवले पाहिजे म्हणजे सर्व गोस्टीणे समाधान होईल चिरजीवकडील पत्र येऊन वर्तमान कलत नाही कासीद येथून पाठविले होते त्याजला मार्ग न फुटे म्हणऊन आनूपशहरावरून फिरोण आले येकिल्यात आले कीं बाबूराऊ व गैर शहरचा बदोबस्त करून राहिले आहेत तर हे गोस्ट खोटी त्या लेकरास हरप्रकारे आम्हाकडे पावते केले पाहिजे तुम्ही आपले वर्तमान सविस्तर लिहिले पाहिजे दिलीकडील वर्तमान काये आहे दुस्टाचा इरादा पुढे काये आहे कोणत्या मनसुब्यावर बसला आहे राजश्री समसर बाहदर काये करितात जाटाचा मनसुबा काये आहे हिमत को[णा]स येते कीं नाही इकडेही गडबड फार आहे [लो]क दहशत खातात आयेकिल्यात आले कीं पठाणाची फौज मथुरेस होऊन गेली हे वर्तमान सर्व विस्तारे लिहिणें तुम्ही आपले वर्तमान वरचेवर लिहीत जाणे तीर्थस्वरूपाकडील वर्तमान वरचेवर आणवीत जाणे भरतपुरी काये मनसुब्यावर बसले आहेत सर्व लिहिणे आमचे वर्तमान तर आज बीस रोज कोंचस खुरमशाह फकिराजवल बसलो परंतु तिलतुल्या काही उपयोगास येत नाही दिवसेदिवस आधिक आहे या प्रांती कोन्ही वैदही उतम नाही वडिलाची आज्ञा दक्षणची येईल तर उतम आहे फिरगी वेद्य मेलऊन उपाये केला जाईल दिलीत कोण कोण ब्राह्मण राहिले मेरठेकडील काये वर्तमान आहे हे लिहिणे पंचमी जालियावर कूच करून झासीस जाऊ कलले पा [नि.*] [हे आ]
सीवद पौ छ १९, जमादिलाखर

---

| ले. १९५<br>रजब ७ | श्री नकल<br>पौ छ १ साबान | श. १६७९ चैत्र शुद्ध ८<br>इ. १७५७ मार्च २८ |
|---|---|---|

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव गोसावी यासी

सो रघुनाथ बाजीराव नमस्कार उपरी येथील कुशळ जाणून स्वकीये लिा विशेष तुम्ही येक दोन पत्रे पा(पा) प्रविष्ट जालीं इमादुलमुलक या दिवसांत बहूतप्रकारे च्याहातात व ठाकूर सुरजमल यानीं पठाणासीं स्पर्धा लाऊन आपले ठाणियाचा बंदोबस्त करून आहे कुमकेस लवकर यावे हा हेत फारच धरितात याचा बयान तुम्ही विनंतीपत्रीं लिा तो आक्षरशः आवगत जाला यास आम्ही जलदीने फौजेचा जमाव करीत आविलंबें येतच आहो ठाकूर सुजानसिंग यानी जोरा धरून पठाणासी........ बलकाविली......दीने आपले जागा कायम आहे या गोष्टीचा आम्हास बहूतच संतोष त्यास आम्ही व जाट येसे व आणखी रजवाडे जे मिळतील ते मेलऊन पठाणासीं मुकाबला करावा हाच इरादा आहे त्यास इतका जमाव पडे तोंवर मासपक्ष

लागेल तो पावेतो तुम्ही जाटास उत्तेजन देऊन त्याची खातरजमा उतमप्रकारे करून राखणे सुजानसिंग कायावाचामनसा आम्हासी स्नेह धरितो व त्याशां आमलातही आणील व पुढे जोरा धरून पठाणासी जुझावयासी कायम राहील हा भरवसा आहे त्यासी थोडाकियाच दिवसांत ह्या गोष्टी आमलात येतील पठाणाने तूर्त येका करून दिलीतील व गैर लोक कोतांदेशाचे मेळऊन कलहास प्रवर्तला आहे याजकरितां त्याचें पारपत्य उतम प्रकारे करावे लागते मुकाबला करावयासी भारीपणे गेले पा याजकरितां आपली फौज रा अताजी माणकेश्वर चिरंजीव समशेर बाहादर व रा नारो शंकर हजूर बोलाविले आहेत ते येतील आणि भारी होऊन पठाणावरी चालोन येतो मुकाबला करून थंडा करितो तुम्ही गाजुदीखाचे व नजीबखां व गैर लाहाणमोठे सरदार दिलीतील व पठाणाबरोबरील व आबदालीची बातमी पै दरपै राखोन वरचेवर लिहीत जाणें खांसा स्वारी सांप्रत जैपूरचे तालोकियांत आलियां अनिरुधसिंग बलकवाडियास बोलाऊन राजेश्री मल्हारजी होळकर यांजकडील फौजेसीं कलह लाऊन राहिला आहे याजकरितां तूर्त त्याचे पारपत्य कर्तव्याचा विचार आहे दोनच्यार दिवसांत या कामाची रफेदफे होऊन त्या प्रांती येतों पठाणाच भारी मनसबा प्राप्त जाला त्याजमुळे रा जनकोजी सिंदे व रा दताजी सिंदे व रा मुधोजी भोंसले व रा येशवंतराव पोंवार व रा रायाजी पोवार व पाटणकर व गैर पतकें तीस पसतीस हजार फौज रवाना जाली आहे लवकर येतील सुजाउदौले बाहादर यांस व गंगापारचे रोहिले व वारचे रोहिले व गैर यांसी रजवाडेयांसी यावयाविषई पत्रें पाठविलीं आहेत सर्व आवघे जमा करितों आणि उतम प्रकारें पठाणाचें पारपत्य करावे हाच इरादा आहे जाणिजे छ ७ रजब बहूत काये लिा लेखन सीमा

---

| | | |
|---|---|---|
| ले. १९६<br>सु. ११५८ जवल १९ | श्री | श. १६७९ पौष वद्य ६<br>इ. १७५८ जानेवारी ३० |

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री मोरो विनायक कादार पा नासिक गोसावी यांसि

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार सुा समान खमसैन मया व अलफ राजश्री बापूजी माहादेव वकील याची घरे कसबे मजकुरी आहे त्यास मारनिलेचे घरावरी चौकीस ब[स*]वणे म्हणोन पेशजी आज्ञा होती त्यास हाली मारानिलेकडील कारभार सरकारांत विल्हेस लागला याजकरितां याचे घरची चौकी उठविली असे तरी तुमचे निसबतीची माणसे चौकीस असतील त्यास उठवणे आणि घर याचे हवाला करणें घरातील वस्तभाव जे असेल ते याचे हवाला करणें कदाचित काही तफरका वस्तभाव जाली असेल ते सोध करून ठिकाणी लाऊन याची यांस माघारी देणे [ नि.* ] जाणिजे छ १९ जावल [ नि.* ] आज्ञा प्रमाण [ च.* ] लेखन। सीमा [ पाटीवर* ] दार

---

ले. १९७ } श्री { श. १६७९, पौष वद्य ११
सु. ११५८ जवल २४ } { इ. १७५८ फेब्रुवारी ४

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव गोसावी यांसी

सेवक रघुनाथ बाजीराऊ नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहिणे विशेष तुम्ही विनंती केली कीं आपण येकेंद्र वर्तणूक केली याजमुले स्वामींनी सरकारची नजर वीस लक्ष रुपये मजवर टराविले त्याप्रा। मान्य केले आहेत याची करारमदाराची याद्री अलाहिदा आहे त्याप्रमाणे भरणा करून देऊ परंतु याउपरी आणखी काही जाजती मजवर न हावे ते करावे म्हणोन त्याजवरून हे पत्र तुम्हास सादर केले असे तरी सद-रहू वीस लक्षाचा मुद्तीवर [हु*]कूम भरणा सरकारात करणे यासिवाये जाजती आजार लागणार नाही येकनिष्टपणे चाकरी करून सुखरूप राहाणे अभये असे [नि.*] जाणिजे छ २४ जोवल सुा समान समसेन मया व अलफ [नि.*] बहूत काये लिहिणें [व.*] लेखन। सीमा [पाठीवर*] बार

---

ले. १९८ } श्री { श. १६८१ चैत्र वद्य १२
चैत्र वद्य १२ } नकल { इ. १७५९ एप्रिल २४

श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] दादासाहेब स्वामिचे शेवेसी

विनंती सेवक अंताजी माणकेस्वर कृतानेक सां नमस्कार [ विज्ञा ]पना सेव-काचे वर्तमान तागाईत चैत्र वद्य १२ द्वादसी [ मु ]क्काम करनाल यथास्थित असे विशेष स्वामींचे अज्ञापत्र चिरंजीव दाजीबा याणी फालगुण वद्य ९ नवमीचे पुण्याचे मुकामीचे पाठविले कापु (!) फालगु [न*] वद्ये ११ येकादसी श्रीकुरुक्षेत्रीचे [मुका]मीं पावले तेथे अज्ञा बहूत इतराजी करून विस्तारपूर्वक लिहिली की अद्याप येणे होत नाही येसियासि सेवकाचा अपराध काडीइत्का नाही सेवकास तीन अज्ञापत्रे सादर जाली कीं राजश्री दताजी सिंदे व रा। जनकोजी सिंदे ज्या प्रकारची गणती घेतील [ ते ]सी द्यावी व दिलीची बाजपूस व माहालाची बाजपूस वजिराकडील जमा वसूल बाकि हे फडशा करून येणे यांचप्रकारे सिंदे आम्हास तागादा करून सांगू लागले आम्ही मान्य केले की आजीच आमचा फडशा करून अज्ञा देणे त्याणी आपल्या कामाकाजामुले आम्हांस दिलीस निरोप न देता लाहोर प्रांते नेले नित्य दोन प्रहर रात्रपर्यंत निरोपास बसून पाहिले परंतु निरोप न देत च्यार कामे [ त्यांचे ] जिमेस त्याचा फडशा तरी जालियावाचून उगेच उठोन येता नये मग सरहदेस गेलो तेथे सदीपबेगाकडील इजाफियाचे काम विल्हेस लाविले मग शेतद्रु नदीपार गेलो तेथे [ आदिना ]बेगाची स्त्री व धर्मपुत्र आणून त्याजकडील मृत्य पावलियाचे मामलतीचे विल्हेस लाविले आला जाट याजकडील विल्हेस जंबूच्या राजियाचे विल्हेस

लाऊन साबाजी सिंदे लाहोरापलीकले पाचा हजारा फौजनसी रवाणे करून सारी कामे उलगडून घेऊन माघारे नदी सतळूंज उतरले ते दिवसी आम्हांस बोलाऊन आणून गणती घेतली गणतीच्या निस्बी नानाप्रकारच्या...जैशा त्याच्या चितास आल्या तैश्या घेतल्या वजिराकडील कारभारी समागमे होते व पुरुषोत्तमपंत वकील होते त्यांस दिलीच्या मिलकतीची खलचते येक मासपर्यंत केली मग त्यास निरोप दिल्हे त्याज-पासून सरकारच्या येवजाची जमा वसूल बाकि सर्व करून घेतली तेव्हा चैत्र वद्य ७ आम्हास स्वामीकडे रा। केले चिरंजीव तात्या दीड मास दिलीस आला त्याची भेट नाही येथून निरोप घेऊन आजी दर रोज पधरा कोसाच्या मजली करून नित्य आज करनालेस आलो येथून चौथे रोजी दिलीस जाऊन वजिराची भेट उभाउभी घेऊन चिरंजीवांस भेटून त्याच्या हाती त्यास देऊन आम्हीं तीन च्यार मुकाम मात्र दिलीत करून मागती कूच दरकूच बारा कोसाच्या मजली येक मुकाम न करिता करून सेव(वे)सी येतो सिंद्यानी कामाचा फडच्या न केला उगेच उठोन कैसे यावें याजकरिता इत्के अपराध सेवकापासून घडले आता कोठे गुंता येका दिवसाचा राहिला नाही दरकूच शेवेसी आलो शेवकापासी फौज भारी होती सिंद्याचे फौजचेच कमकसर होती त्याची कामकाज होणे होते म्हणोन वोढीत नेले गणतीची व दिलीच्या कारभाराचा फडच्या माहालाचा फडच्याच-न करीत असों ते थोर आपराध सर्व आमचेच खरे क्षेमा करणार स्वामी समर्थ आहेत गणतीचा फडशा त्यानी स्वार बहूत टाकून केला दिलीचे मिलकतीची वजिराकडील हिसेबाची सर्व माहाल अदी-करून केला त्याचा विस्तार राजश्री दत्ताजी सिंदे याणी शेवेसी लिहिला असेल अथवा मागून लिहितील त्याजवरून सर्व शृत होईल दुसरे स्वामिची अज्ञा कीं वजि-रापासून काही मेलविता ते सरकारी न लाविता आम्हांवर फौजेची सिबंदी वाढविता वगैरे इतराजी करून बहूत लिहिले, यैसियासि गणमुक्तेश्वरी स्वामिच्या पायावर हात ठेविला आहे व स्वामिनी मस्तिकी हात ठेविला आहे त्याउपर अतां स्वामीची भेट होईल आणि मग कचा हिसेब वजिरापासून पाचा रुपयाचा जागा अथवा पाच रुपये रोख अथवा येक वस्त्र जे असेल ते शेवेसी निवेदन{न} करीं [न*] त्यापैकीं येका रुपयाचे तफावत केला तरी स्वामिनीच आमचे मस्तकी हात ठेविला आहे आणि आम्हीं खोटे जालियांउपर स्वामीनीच आमचे पारपत्य करावे मग मुलाहिजा सर्वथा न करावा शेवेसी शृत होये मी दरकूच शेवेसी येतो या वेलेस स्वामीनी मजला अस्वासन दिल्हे आहे यात ग्वालेर आमची जागीर आहे तेथील येका रुपयाची कसर स्वामीस समजा-वयासि अंतर करू अथवा गंजबसोदे येथील अथवा वजिराकडील जे असेल तेथे येका रुपयाची प्रतरणा केली तरी मग स्वामीनीच आपले हाते आमचे पारपत्य जरूर करावे मग आमची विनंती सर्वथा मान्य न करावी वजिराकडील माहाल साहा मेरठ-सुधा आम्हांकडे आहेत वरकड झाडून नजीबखान याजकडे आहेत त्याच्या इजारा

वजिरापासून करून आपल्या सरकारच्या येवजास लाऊन नेहमी घेतला आहे त्याजवर वराताची नेमणूक करून दिल्ही पहिले अठ माहाल होते त्यापैकी बुढाणा स्वामी असता नजीबखानानी घेतला होता मागून वजिरानी शामली सोडून घेतली बाकी मेरठसुधा माहाल साहा आहेत मेरठ व जलालाबाद व सरावा सिरधना बर्णावा व कांधला येणेप्रमाणे साहा माहाल त्याजखेरीज कोण्ही सांगत असतील माहाल ते त्यांस द्यावे वजिराचा इजारा साल दरसाल कर्जात लाऊन घेतला हात भाग गुंतला म्हणोन केले व इजारियासिवाये गांवाचे गांव फिरोन जमाबंदी बांधली त्याजमुले इजारियासिवाये कसर अकारली तेही सरकारची जमा केली आहे वजिरापासून येक रुपयाची जागा अथवा येक रुपया व माहालची कसर जाहागिरीची कसर मामलतीची कसर कुल मी सेवेसी येऊन समजाऊन स्वामीस व श्रीमंत माहाराज [मो. जा.*] पंतप्रधान साहेब यांसि प्रसन्न करीन तरी स्वामीचा चाकर त्याजखेरीज माझी अबरू खावंद वाढवितील आणीक जे स्वामीची मर्जी असेल तेच करूं येका वखानसी घराबाहीर निघोन सरदारांचे कर्जही आणीक च्यार वर्षे बुडी मारून फेडीन परंतु माझे मुदई माझ्या मागे गोष्टी वाईट बोलतील त्या ध्यानास न आणाव्या मी येतो सर्व आपले कचे वर्तमान समजावितो त्यात श्रीमत माहाराज साहेब व स्वामी राजी जाले तरी उतम काडीइत्की कसर माझ्या समजाविल्यात सागितली तरी मग तेच क्षेणी खावदानी आमच्या मुदयासि सरफराज करून सेवकाचे पारपत्य करावे म्हणजे खावदानी इनसाफ केलासा जाला आता सेवकाच्या यावयाविसीं संवश जाला तरी दरकूच दो महिन्याची वाट आहे आठ दिवस दिलीचा मुकाम सवादो महिन्यात पुण्यास न पावलो तऱ्ही स्वामीचे मर्जीस येईल ते करावे मधे मी पायाजवल ये तोवर माझी गोष्ट माझ्या मुदयाची सर्वथा येकोन इतराजी [न*] करावी माझा चाकरीस व हिसेब आपण राजीच होतील परंतु आलो नाही तोवर भरोसा पुरत नाही जे जे आमच्या कामाचे कामावर उभे असतील तेही असो द्यावे स्वामिची सर्वाप्रकारे चहूकडून किफायेतच आहे येंदा हिंदोस्थानची कामे सारी अटोपली आहेत कांही वर्षात होणे नाहीत आखर अशाढ मासपर्यंत कोण्हसही निरोप न द्यावा श्रावण मासी जे करणे ते सर्व करणार स्वामी समर्थ आहेत शाहाजाद्याचा पक्षे शुजाउदौला यानी केला आपली फौज पैका देऊ [न*] पटणियासि दाखल केला वजिराची लिहिली पटणियासि गेली तेथे शाहाजादा खिपत खाऊन लढाईत सरला पटणेवाले वजिरास राजी आहेत सरदारानी तूर्त मसलत केली की हे लबाडी शुजाउदौला यानी केली क्रोडीचा सुभा खाऊन येक पैसा कोणास न देता दुसरी लबाडी हे शाहाजादियासि केली याजकरिता अयोध्या सोडवावी वजीरही समागमे न्यावा येसे नवे अरंभिले वजिराचे मर्जीस आले तरी चिरंजीव रा। तात्या फौज घेऊन वजिराबरोबरी जाईल नाही तरी चिरंजीव फौजसुधा सियास शामिल होतील चाकरी करतील स्वामींनी मस्तिकी हात ठेविला ते

वचन सवा दोन महिने पय(यं) [त*] पाहून तोवर सांभालावें मग खरा निघालो तरी राजची खोटा निघालो तरी गुंता नाही हे विनंती तुम्हांस न करावी लोकांत हासे भंड न करावे सविस्तर विनंती श्रीमंत माहाराज साहेबास काही लिहिली नाही स्वामींच्या पत्रावरी घालून विनंतीपत्र लिहिले आहे स्वामीस कचे वर्तमान माहाराज साहेबास शृवण करणार साहेब समर्थ आहेत चिरजीव दाजी चेकले मूल पावांजवल आहे कृपेत अंतर न दिसे ते साहेब करणार धणी आहेत शेवेसी शृत होये हे विज्ञापना

---

ले. १९९ } श्री { श. १६८१ चैत्र वद्य १४
सावाम २८ } { इ. १७५९ एप्रिल २६

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गणपतराव बापूजी गोसांवी यासिं

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणें विशेष तुम्हीं छ १९ रजबचीं विनंतीपत्रें इंद्रप्रस्थचे मुकामीहून पाठविलीं तीं पावलीं राजश्री दताजी सिंदे व राजश्री जनकोजी सिंदे याणी दिलीहून बारा चौदा कोसावरून साबाजी पाटलास लाहोरमुलतानचे नाचेव करून साहा हजार फौजेनसीं रवाना केले मागाहून आपण हलूहलू जातात तिकडील गुंतारुंता उरकोन पैसा हातास आलियावरी फिरतील म्हणौन व गोहरखान व अबदुल मजीदखान याज-कडील व बंगालियाकडील वर्तमान लिहिलें तें सविस्तर कललें येशियास या उपरीहि तिकडलि साद्यंत वर्तमान बारीक मोठे लिहिणें प्रस्तुत सिंदे कोठें आहेत कार्य कस-कसे जाहाले हे तपसीलवार लेहून पाठवणें लाहूराकडील मामलत किती ठरली पैक्याची निशा कोणे प्रकारे जाली तिकडून फिरले न फिरले पुढे बंगाल्याचे मनसुब्याचा डौल कसा धरितात तें तिकडील वर्तमान विस्तारे लिहिणे पातशाहा व वजीर याचा मनसुबा कायें आहे शाहाजादा बंगाल्याकडे गेला तो कोठें आहे फौज किती आहे काये मन-सुबा करितो ते लेहून पाठवणे [ नि.* ] जाणिजे छ २८ सावान [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.*] लेखन । सीमा पो छ १७ शवाल

---

ले. २०० } श्री { श. १६८२ चैत्र शुद्ध १
रजब २९ } { इ. १७६० मार्च १८

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव स्वामी गोसावी यांसि

सेवक सदासीव चिमणाजी नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष खासा स्वारी दरमजल हिंदुस्थान प्रांती जात आहे तर

तुम्ही पत्रदर्शनी स्वार होऊन हुजूर येणे कितेक गोष्टी मनसब्याच्या व किफायतीच्या विनंती करीत होता ते चाकरी करून दाखवावयाचा समय आता आहे यास्तव पत्र पावताच जलदीने आम्हासनीध येणे दिरंग न लावणे पेशजी दोन हजार स्वार ठेवावे व आणीक कितेक मनसब्याचे प्रकार बोलण्यांत आले होते ते ते समई कांही घडून न आले मधे आबदालींचा पेचही पडला प्रस्तुत रावताचे लचांड न करितां तुम्ही हुजूर येणें वरकड सर्व समक्षच आज्ञा करणे ते केली जाईल [नि. *]ता कृष्णरायास आज्ञा केली आहे लिहिल्यावर कलेल छ २९ रजब बहूत काये लिहिणे हे विनंती

---

लें. २०१ रजब २६ — श्री — श. १६८२ माघ वद्य १३ / इ. १७६१ मार्च ४

पुा राजश्री पुरुषोतम माहादेव गोसावी यांसि

उपरी चिरंजीव राजश्री भाऊ व जनकोजी सिंदे यांचे ठीक वर्तमान कलत नाहीं पांउणे दोन महिने युध्यांस जालें तुम्हांस ठीक कललें असेल आणि लिहीत नाहीं अपूर्व आहे तुम्हीं सरकारचे चाकर आहां काये मजकूर कोणीकडें गेले कसे जाहाले ते स्पष्ट उगऊन लिहिणे [नि.*] जाणिजे छ २६ रजब [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. २०२ साबान १५ — श्री — श. १६८२ फाल्गुन वद्य ३ / इ. १७६१ मार्च २३

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव गोसांवी यांसि

शेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणें विशेष तुम्हीं पत्र पाठविलें ते पावलें सविस्तर मजकूर विदीत जाला शाहची रकम व शाहवलीखान याचे पत्र गुलराज याजबरोा आले त्याची उत्तरे पाठविली असेत व येथून मीर अन[व*] रुल्लाखान व हुसेन महमदखान पाठविलें आहेत तहाचा येख्तियार सर्व राजश्री मल्हारजी होलकर यांजवर आहे जे ल्याहावयाचे ते तुम्हीं त्यास लिहीत जाणें ते तुम्हांस आज्ञा करितील त्याप्रो वर्तणूक करणें मीर अनवरुलाखान व हुसैन महमदखान पाठविले असेत हे व तुम्हीं शिष्टाचाराचा जाबसाल करणे द्वैत न दाखवणें सारांश त्याचा कर्तव्य पदार्थ कसा तो सर्व खुलासा काढून लिहीत जाणे प्रस्तूत सर्व अमीर कोठे व शाहा कोठे गाजुदीखान तेथें पावलेच असतील [नि.*] सर्व

लिहिणे जाणिजे छ १५ साबान सुा इहिदे सितैन मया अलफ [ नि.* ] बहूत काये लिहिणे [नि.*] हे विनंती

---

ले. २०३
साबान

श्री

श. १६८२ फाल्गुन
इ. १७६१ मार्च–एप्रिल

राजश्री पुरुशोतम माहादेव गोसावी यांसि

र्द अखण्डीत लक्ष्मीअलंकृत राजमान्य [ मो. जा.* ] श्रीो सखूबाई सिंदे दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणौन स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष बहूत [ दिवस* ] जाहाले तुम्हाकडोन पत्र येऊन वर्तमान कलो येत नवते तेणेकरून चित सापेक्षीत होते यैसियास मणिया जासुदासमागमे पत्र पाठविले ते पावले पाऊन बहूत समाधान जाहाले चिरजीव राजश्री बाबाचे वर्तमान लिा ते सर्व कलले पता येथास्थीत लाविला परतु फौजसिवाये येणे होते नाही म्हणौन लिा त्यावरून फौज पाठविली अहे-दुसरे राजश्री सुभेदार देशास श्रीच्या दर्शणास्तव अले आहेत त्याजला मागाहून पाठऊ यावर जासुदास तुम्हीं रुा पनास देविले त्यास याजला रो गोविंद विस्वासराऊ याजवर देविले असेत चिरजीव रो बाबा याचे हातचे पत्र जलदीने येई ते गोष्ट करणे फार विस्तारे लिहावे यैशे नाही रवाना छ......माहे शाभान बहूत काये लिहिणे [नि.*] हे विनंती

---

ले. २०४
चैत्र शुद्ध १

श्री
पौ छ ३० रमजान

श. १६८३ चैत्र शुद्ध १
इ. १७६१ एप्रिल ६

राजश्री पुरुषोतमपंत गोसावी यांसि

र्द सकलगुणाअलंकर्ण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये [मो. जा.*] प्रतिपूर्वक निंबाबाई व सखूबाई सिंदे दंडवत विनंती उपरी येथील कुशल ता चैत्र शुध्ध १ जाणून स्वकीये कुशल लेखन केले पाहिजे विशेष तुम्हीं पत्र छ १ शाबानचे पाठविलें तें येथें छ २५ शाबानी पावलें सुसमई पावोन परम अनंद जाला तें पत्री कोठवर ल्याहावें येथे वर्तमानाकरितां बहूत संकटीं होतों कितेक प्रकारची वर्तमानें येतात तेणेकडून देहभान उडाले होते कांही मणुष्येपण राहिलें नव्हते यैशात आपले पत्र येऊन पोहचले अमृतवृष्टि जाली केवल तुम्हीं ईश्वर होऊन अम्हांस जीवदान दिल्हे तुम्हीं प्रेत्न बहूत केला शरीरेंकडून क्षेमरूप असेत येव्हढी कृपा ईश्वरें मोठी केली भगवंतास आमची करुणा अली याउपरी आपण पुरती कृपा करावी हर प्रेत्न करून सुरक्षीत

घेऊन यावे म्हणिजे तुमचे देणें अक्षई होईल जखमाचें वर्तमान येकोन चित फार भयाभीत जालें आहे तरी त्याचे हातचे पत्र पाठवणे म्हणिजे काहीं समाधान होईल तो पावेतो चैन पडत नाहीं अमचा सर्वाचा प्राण तेथें अहे त्याची भेटी होईल तो दिवस धन्य आहे आंता संकटांतून काढणे तुमच्या स्वाधीन अहे तुमचा उपकार सहसा फिटणार नाहीं या समई ईश्वर तुम्हीं अहा वरचेवर वर्तमान येथे लिहीत जावें सर्व ध्यानमन तुमच्या पत्राकडे लागलें आहे दुसरी तिकडील तपसीलवार वर्तमाने लिहीत जावीं राजश्री बापूजीपंतास जखमा लागल्या अहेत त्याचें व अणखी आपल्या-कडील मातबर माणूस कोणे ठिकाणी कोण आहेत ते लिहिणें कासिदास अम्हीं रुा ४० चालीस दिल्हे आणखी कासीद वरचेवर रवाना करीत जावे त्याचा अजुरा अम्हीं देऊ [ नि.* ] बहूत काये लिहिणे हे विनती

---

ले. २०५ } श्री { श. १६८३ चैत्र शुद्ध १
साबान २९ } { इ. १७६१ एप्रिल ६

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री पुरुषोतम माहादेव गो यांसी

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष गाजुदीखान वजीर व ठाकूर सुरजमल यांस पत्रें पाठविली आहेत प्रविष्ट करून उतर पाठवणे आबदाली माघारा गेला असी वर्तमाने दिलीची जयनगरीची आली परंतु तुम्ही कांहीच न लिहिले आपूर्व आहे याउपरी सविस्तर दिलीत पातशाह कोण वजीर कोण आबदालीचे जावयाचे कारण काय ठाकरानी व गाजुदीखानानी काय मनसबा योजिला कसे करितात हे सर्वही लिहिणे मल्हारबा ग्वालेरीस फौजसुधा आहेत सर्व लाहानमोठा येख्तियार त्यांजवर आहे तुम्ही जे सुभेदार आज्ञा करतील त्याप्रो वर्तणूक करणे वजिरास ठाकरास थैल्या याच मजकूराच्या पाठविल्या असेत [ नि.* ] जाणिजे छ २९ साबान [ ब.* ] लेखन।
सीमा पैवस्तगी छ १९ रमजान

---

ले. २०६ } श्री { श. १६८३ चैत्र शुद्ध १ नंतर
} { इ. १७६१ एप्रिल ६ नंतर

पुा श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] पंत प्रधान स्वामींचे सेवेसी

विज्ञप्ति कीं नजीबखां सोनपतावर होता येथे वजीर व जाट यांचे चितात कीं दिलीस जाऊन दुसरा पातशाह करावा हे बातमी दिलीस गेलियावर जीनतमहलाने

नजीबखानास दिलीस बोलाऊन शेहरची व किलियाची बंदोबस्ती उतम प्रकारे केली अली गौहर वाराणसीस दाखल जाला मजल दरमजल दिलीस येतो समागमे फिरंगी अहेत हे वृत वजीरजाटाने अैकून खलश दूर करावा यास्तव नजीबखानाचे वकील मेघराज यासी बोलाऊन समाधान केले कीं वजीर सर्व प्रकारे पातशाहचे चाकरीस हजर अहे याजकडून नायेब तोफखानियासी व गुसलखानियास राजे नागरमल आम्हीं ठैराविले अहेत हे तुम्ही मान्य करा अम्ही शपथपूर्वक अतर न करूं याप्रा समाधान करून सलूखास्तव बिदा केले व नजीबखानासीही सलूख करून घ्यावा या विचारात अहेत होईल वर्तमान ते सो विनंती लिहू रूपा केली पाहिजे हे विज्ञप्ति

---

ले. २०७ } श्री { श. १६८३ चैत्र अखेर<br>इ. १७६१ मे आरंभ

श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विज्ञाप्ति की रा गंगाधर येशवंत यानी शुजाउद्दौलाच्या वकिलासी जाबसाल केला की आम्हीं कांही मुलूक जाटाचे हवाला करीत नाही आमचा आम्ही घेऊ तुम्हीं आमचा मुलक सोडून देणे त्यावरून शुजाउद्दौलाचे वाकिलानी शुजाउद्दौलास लिहिले त्यावरून त्यानी मुलूक सोडून दिल्हा ठाणी आपली बोलाऊन घेतली वजीर व जाट व रा गंगाधर येशवंत येसे मिळोन आगरियाचा किला घ्यावयासी जातात येसा बखेडा जाला आहे सेवसी श्रुत व्हावे म्हणून विनंती लिहिली असे [नि.*] शुजाउद्दौला अबदालीपासून बिदा जाला तेव्हा शाहवलीखानाने तीा बापूजी माहादेव याजदेखतां रोहिले व पठाणांस व अयुधेकरास ताकीद केली की अम्हासी व श्रीमतांसी सलूख जाला तुम्ही त्यासी व त्याचे मुलकासी खलश न करणे यातच तुमचे बरे अहे म्हणून ताकीद करून बिदा केले त्यास शुजाउद्दौला तो अपले देशास जातेसमईच कडाकुरा वगैरे स्थले सोडून ठाणी खाली करून गंगापार गेला याप्रो अयुधेकराचे वकिलानी सांगितले ते सो विनती लिहिली असे पठाणरोहिलियास त्याचे मुलकाचे माफीची पत्रे व तसली स्वामीकडील पावलियावर ते खलश करणार नाही याप्रो त्याचे वकील अम्हासी बोलतात सलाह असालिया समाधानपत्रे पाठविणार स्वामी समर्थ अहेत येविशई येथे रा गंगाधर येशवत वगैरे अहेत यासही सांगितले अहे पुढे होईल ते विनंती लिहू

---

ले. २०८ } श्री { श. १६८३ चैत्र वद्य ३०
रमजान २८ सुमार } { इ. १७६१ मे ४

श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विज्ञाप्ति कीं छ २८ रमजानी ठाकूर सुरजमल यानी आपली फौज दोन हजार व प्यादे दोन हजार येसे आगरियाचे किल्यावर पाठविले की दगा करून घेणे त्यावरून फौज जाऊन शहरातून किलेदारास सांगून पाठविले की आम्ही आंतरवेदांत पार जातो उतरावयासी नावा देणे त्याजवरून किल्याखाळून मार्ग होता दरवाजियापासून जमाव भारी करून जात होते दरवाजियात धसू लागले तेथेही प्यादे होते तरवारी तरवार जाली सेदोनसे माणूस मारले गले किलेदाराने दरवाजा बंद केला युध्य होऊ लागले जाटाचे सरदाराने जुमा महजद येथे मोर्चा कायेम करून उभयपक्षी गोले चालू लागले युध्य होत आहे किलेदार भुभुक्षीत व बेसरजाम व थ्यारसे माणसानिसी जुजतो पातशाहसिवाय देणार नाही म्हणतो रमजानचे ईदेस अगरियांत अली गौहरचे नावे..........खुतबा मुलाणियासि पढून दिधला शरास तसली करून ठेविले व काही खर्चासही दिधले होते आता येथे आम्हीं कोणास सागावे सर्व जाटच अहेत श्रुत होये

---

ले. २०९ } श्री { श. १६८३ वैशाख शुद्ध २
सु. ११६१ रमजान ३० } { इ. १७६१ मे ६

पुा राजश्री पुरुषोत्तम माहादेव गोसावी यांसि

उपरी श्रीमत राजश्री भाऊसाहेब पाणिपताजवल गाव आहे तेथे गुप्त आहे प्राणे-जीवे सुखरूप आहेत त्याचे हस्ता[क्षर] पत्र येईल तेच पाठऊन देतो म्हणोन लिहिले ते कललें अैशास तुम्हीं वकील बदे आवाई मनोरंजन(क) खबरा ल्याहाव्या हा तुमचा दडक परंतु तहकीक पतेवार वर्तमान लिहिणे सोध चागला करणें [ नि.* ] लटके सहसा न लिहिणे जाणिजे छ ३० रमजान [ नि.* ] सुा इहिदे सितैन मया अलफ [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. २१० } श्री { श. १६८३ वैशाख शुद्ध २
सु. ११६१ रमजान ३० } { इ. १७६१ मे ६

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री पुरुषोत्तम माहादेव स्वामी गोसावी यांसि

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जाणे विशेष तुम्हीं विनतीपत्र छ २८ साबानचे पाठविले ते छ २१ र[म*]

जानी पावलें अबदाली दरकूच सरहद्देपलीकडे गेला लाहोरास पावला असेल आपले मुलकास जातो सुज्याअतदौला आपले सुभ्यात गेले हाफिज रहमतखान व दुदेखान {व} गंगापार गेले अहमदखा बंगस फरोकाबादेस गला नजीबखान सुक्रतालास जावयास पंधरा सतरा कोस गेला गाजुदीखान दिलीस जावयांस तयारी करितात म्हणोन लिहिले ते कलले या उपरीही तेथील वर्तमान वरचेवरी लिहीत जाणे याकूब अलीखान व राजश्री बापूजी माहादेव यास शाहा व शाहावलीखान याणी स्वामीकडे रा केले अविलबेच येतील म्हणोन तर उतम आहे तुम्हीं राजश्री मल्हारजी होलकर यांस भेटून सविस्तर मजकूर त्यास सागून ते सागतील त्याप्रो वर्तणूक करणें चिरंजीव राजश्री भाऊ व जनकोजी सिंदे याचा सोध करून तहकीक वर्तमान लिहिणें जाणिजे छ ३० रमजान सुा इहिदे सितैन मया अलफ [ नि.* ] बहूत काये लिहिणें [ ब.* ] लेखन । सीमा

---

ले. २११ } श्री { श. १६८३ वैशाख शुद्ध २
रमजान ३० } { इ. १७६१ मे ६

राजश्री जनकोजी सिंदे गोसावी यासी

ई सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य [ मो. जा.* ] श्रो बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेप तुम्हीं स्वस्तिक्षेम आला हे श्रवण होऊन जो आनंद जाहाला तो पत्री कोठवर ल्याहावा परंतु तुम्ही कांहीच न लिहिले आपूर्व आहे याउपरी सविस्तर संतोपवृत लिहीत जावे तुम्ही येदा छावणसि देसी यावे दसरा होताच फौज ठेऊन हिंदुस्थानात जावे राजश्री मल्हारजी होलकर हिंदुस्थानांत छावणीस राहतील रा छ ३० रमजान [नि.*] बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद [ ब.* ] लेखन । सीमा

[ पाठीवर डाव्या हाताच्या कोपऱ्यांत बावापेचा मुतालिकी शिक्का* ]

---

ले. २१२ } श्री { श. १६८३ वैशाख वद्य १
} { इ. १७६१ मे १९

पुा श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विज्ञापि ऐसी जे रा गंगाधर येशवंत व गैर अम्हास म्हणतात की तुम्ही दिलीस जाऊन याकूब अलीखानाचे समाधान करून समागमे घेऊन राजश्री सुभेदारापासी

जाणे येसे म्हणतात त्यास आम्ही स्वामीकार्यासाठी दिलीस जाऊन याकूब अली-खानाचे समाधान हरप्रकारे करून त्यास इंदूरास रा सुभेदारापासी घेऊन जाऊन व त्याचे विचारे स्वामीचे दर्शनास येऊ परतु बखेडा मोठा कजियावर कजिये नित्य उभे टाकतात याजमुले अटकाव जाला तर न कले पूर्वी स्वामीचे सो विनंती लिहिली असे त्यास नवाब याकूब अलीखानाची तसलीपत्रे लिहून पाठवावी की दिलगरमीने सो येऊन हजर होये अबदालीचा व स्वामीचा येकोपा पुर्ता जालियासी सर्व मधून काढावयाची तद्बीर बनू सकेल यास्तव वारंवार विनंती लिहिली असे रुपा करणार स्वामी समर्थ अहेत [ नि.* ] रुपा केली पाहिजे हे विज्ञप्ति

---

ले. २१३ } श्री { श. १६८३ वैशाख वद्य १
इ. १७६१ मे १९

पुा श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विज्ञापि येसी जे याकूब अलीखां दिलीस गेला [ नि.* ] विज्ञाप्ति येसी जे याकूब अलीखा दिलीहून येथे आला व तीर्थस्वरूप रा बापूजी माहादेव येसे स्वामीकडे येयास आले त्यास येथील मंडळी ठाकूर व गैर सर्वांचे मनोद्ये की येथेच कामाकाजाचा बंदोबस्त करा... वा यास्तव याकूब अलीखां यथे येक महिना राहिला परतु या मंडळीची व त्याची मर्जी न मिले स्वामीकडेही येऊ न देत यास्तव बेजार होऊन उठोन दिलीस गेला सो कळावे वजिराचे व जाटाचे मानस की पातशाह दुसरा करावा नजिबखानाचे मानस की पातशाह आली गौहरच आहे येसी आड पडली आहे रा गंगाधर येशवत व गैरे आम्हास म्हणतात कीं तुम्ही दिलीस जाऊन याकूब आलीखानास घेऊन राजश्री सुभेदारापासी जाणे त्यावरून आम्ही दिलीस स्वामीकार्यासाठी जाऊन याकूब आली-खानाचे समाधान बहूता प्रकारे करून त्यास समागमे घेऊन इंदूरास राजश्री सुभेदाराची भेटी घेऊन मग त्याचे अज्ञेप्रो त्यास घेऊन सो येऊं मागाहून होईल वृत ते सो विनंती लिहू.

---

ले. २१४ } श्री { श. १६८३ वैशाख वद्य ३
सवाल १५ } { इ. १७६१ मे २१

विज्ञापि ता छ १५ सवाल आज्ञापत्रे समस्तास आली त्यावरून वृत कलले की शाह खुद जेहलम नदीवर पोहचे जैनखा नामे सरदार दाहा हजार फौज देऊन सरहंदमधे ठेविला सादहातखां आफरीदी व आणिक दोन सरदार आपले ह्वाहि-

यांत ठेविले व विलन्दखा लाहोरात ठेविला शाह पसदखानासही रावी कर्यतीस पाठविले की तेथ पोहचून मुलकाची बदोबस्ती करीत आणि फौजही जमा करावी ज्याहन-खानास जिले पिसेर व काबल येथे रवाना केले आणि आपण खुद दोन इरादे राखितो कीं जिहलेमचे जिल्यांत छावणी करून......गुजराणी करावी दुसरे की आटकपार उतरून सदारास जावे येसे आहे मागाहून होईल वर्तमान ते विनती करू

वजीर व ठाकूर सुरजमल श्रीमथुरेहून छ १५ सवाली येमुनापार उतरले येक दो रोजात कोलजलेस्वरास पावतील रा गंगाधर येशवंतही समागम आहेत नजिस्तखान हाफीज रहमत व दुदेखा व सरदारखा श्रीगंगापारीहून वरचेवर पत्रे पाठवितात की अम्ही सर्व इतफाक करून कोलस येऊन भेटतो जो माफीक मर्जी तुमची नजीबखा मानितील तर सलूक व सफा करून देऊ न माने तरी इतफाके करून त्यास उठऊन देऊन तुमचा अमल दिलीत करून देऊ याद पोहचे कोलचे जे होईल ते विनती केली जाईल

---

ले. २१५<br>सवाल १७ नंतर } श्री { श. १६८३ वैशाख वद्य ४<br>इ. १७६१ मे २३

विज्ञापि येसी की गाजुदीखां वजीर व ठाकूर सुरजमल व गंगाधर येशवंत येसे कूच करून छ १७ सवाली येमुनापार उतरून आंतरवेदीत कोलजलेस्वर येथे चालले जातात जाणार श्रीगंगापारीहून हाफिज रहमतखां व दुदेखां व आहमदखां ये [ से ] तिकडून भेटीस येणार मग मनसुबा करून दिलीवालियासी युध्य करावे अथवा सलूख करावा येसी तजवीजेत आसेत होईल वर्तमान ते सो विनंती लिहू

विज्ञापि की आली गौहर पटणियाहून कूच करून आलीकडे तीन मजला आला त्याउपरी श्रीवाराणसीजवळ आला म्हणून वार्ता आहे तथ्य वृत येईल ते लिहू व अग-रियाचे किल्यास ठाकूर सुरजमलानी आपली फौज पाठऊन मोर्चे लाविले आहेत जुंज होत आहे अद्यापि किला हती लागला नाही श्रीइछा प्रमाण नजीबखान दिलीत बंदोबस्त करून राहिला आहे शाह लाहोरापलीकडे चिनाब नदीवर पडला अहे अटके-कडे झलिम नदीवर अहे

---

ले. २१६ श्री श. १६८३ वैशाख १ | इ. १७६१ मे १

पु॥ श्रीमंत राजश्री [ मो. ना.* ] पंतप्रधान स्वामींचे सेवेसी

विज्ञापि ऐसी जे कोलेस अलियावर हाफिज रह[ म ]तखां व दुंदेखां व गैर रोहिले लष्कराचे इशारियाओ श्रीगंगेवर सोनेपासी आले अहेत त्यांजला कौलावर कायेम राहावयासी येथून वजीर गाजुदीखानानं त्याकडे पाठविले ते जाऊन येथून विना कोलावर वतने वहेत पुढे त्यांचे अन्न पकडे अलियावर लाम भेटावयासी जातील तूर्त श्री गंगातीरास हाफिज रहमत येतान शुकराबाद व सकीट दोन जागा जफ्त केल्या अर्णाक नाहाल येथें आगांतर ठाणी रोहिलियानी बसविली नवती असा हे मंडळी कोलस अलियावर ठाणी तमाम उठवून टाकिले यास्तव सर्व ठायांतान खलश जाला [ आ ]हे नजीबखां दिलीत अहे व दिलीपासी येमु[ ना ] इतरून पटपरगंजावर फौजेचा जमाव क[ रून ] राहिला अहे हाफिज रहमत वगैरे रोहिले श्रीगं [ अपूर्ण* ]

---

ले. २१७ श्री श. १६८३ ज्येष्ठ | इ. १७६१ जून

पु॥ श्रीमंत राजश्री…साहेब स्वामीचे सेवेसी

विज्ञापि ऐसी जे पूर्वी सविस्तर वृत…अढलले ते वरचेवर सो विनंती लिहिली हाली…रेहून ठाकूर सुरजमलापासी अलो येथे यांची…वजिराची भेट घेतली यास मावेत घेऊन…मनोदये घेतला त्यास त्यानी की…सांगितल्या त्याचा विस्तार…ती करू तात्पर्य शृत व्हा…नी दिलीस जाऊन नजीब…चाल सोडून घेऊन पुढे…सर्वानी येकोपा करून…पासून बचाव क…खानाने येकामागे ये…न गाजुदीखानास…सी सख्य जाले व केले शाह… याची नाही याग्रा कितीक…समस्तास निरनिराले दबाऊन व माये…जागाजागाहून उठून दिधले जाटानी व…खानानी जो विचार अरंभिला …ऊन पावला यास्तव यानी… सुजातदौले यासी लिहून पत्रापत्री येकोपा अहेच अधिक्य करून त्याचा वकील शाहकडे जावयास रजा कुलीखान दिलीस आला त्याजबराबर नजीबखानाकडून मेघराज व याकूब आलीखानाकडून अत्माराम पाठविले जाटाचा वकील तेथे अहेच इकडे माधोसिंगास नजीबखानानी नारनोल व गैरेकडे बोलाविले अहे त्यासी कौलकरार करून बादबरसात येका करून येक जागा होणार तूर्त येक जागा होणे राहिले यास्तव हा विचार केला अहे की शाहसी सर्वानी मिलोन करोड रुपे देऊ केले ते आपलाले ठिकाणातून देणे कलतच अहे परंतु बंगाला व कडा-

कुरा व मेरठ व गैरे मिलोन रुये द्यावे हे ठैराऊन वकील पाठविले ते रवाना जाले दिलीहून पावसाला दिवस आहे याजकरिता येका महिनिया पोहचतील रुपायासि हामी कोण व इतबार कोणाचा यास्तव जाटाचे गळा पडतात हाही त्यांत मिलोनच आहे परंतु अम्हाप्रति असे म्हणतात की तुम्ही श्रीमंत स्वामीचे कार्यांचा बदोबस्त व अबदालीसी सख्य करून अलेस अता येता जातां आमचा रगडा दोघे मिलोन करणार की काये हे बोलल्यावर आम्ही त्याचे समाधान केले व त्याचा वकील आबदालीपासी अहे तेथेही त्यास लागू न दिधले व येकोपाच जाणविला येथे त्या गोष्टीचा दाखला देऊन यासि पुर्ते मायेत घेतले तेव्हा यानी या गोष्टी सागून सेवकासी वचन प्रमाण केले की अमचा व श्रीमंताचा येकोपा राखावा व अम्ही येथे चाकरी[स*] वीस पंचवीस हजार स्वारप्यादयानिसी हाजिर आहों जोंवर हा विचार हे सर्व करितात तोवर तुम्ही आपली फौज घेऊन येऊन आम्हास शामील होणे हे गोष्ट म्हटल्यावर आम्ही उतर दिधले की..........दे वगैरे जवळ अहेत ते घेऊन येऊ परंतु त्याचा खर्च कोण चालविणार तेव्हा उदंड रदबदल जाली परतु सेवट इत्केच ठैरले की वीस हजार फौजेने चाकरीस हाजर होऊ हाच पैसा दिधला जाणून फौज अणून या समई दिली घ्यावी नजीबखानाचे कुमकेस अयुधेकर येईल ह(त)र येकास तुम्ही व अम्ही येकास साभाळून घेऊ तेव्हा आम्ही उतर दिल्हे की जैसें श्रीमंत भाऊसाहेबाचे समई रिफाकत दिधली तैसेच तुमचे मनास अले तर तेव्हा हे फौज निरालीच जुजून सर्वांस मारील असे नाही ( आम्ही ?) खोलून बालिलो तेव्हा शपथ वाहून कौलकरार केला की असे करणार नाही व श्रीमंत भाऊसाहेबाचे समई जो प्रकार जाला त्याचा विस्तार सांगितला तो हजूर येऊन विनंती .... पेच दरपेच आहे तो बोलले लिहिता...... गोष्ट यांजला पुर्ते मायेत घेतले अहे त्या मंडलीत महिना दोन महिने न मिलेत असे केले अहे व लाहोरी तीर्थस्वरूप रा। बापूजी माहादेव यासि लिहून शाहवलीखानास आधिकोतर मायेत घेऊन यांची गोष्ट पेश न जाये तो विचार करावा म्हणोन लिहिले अहे ते तेथल्या प्रसंगाप्रमाणे बोलतलि व स्वामीचे कृपेने त्याची गोष्ट पेश जाऊ पावणार नाही श्री कृपा करो आम्हीही ह्या गोष्टीचा येक विचार त्यास लिहिला आहे त्यांत तात्पर्य इत्काच की साहुकारी निशा घ्यावी व जायेदाद दाखवावी याचा तपसील लिहिला अहे तो हजूर येऊन विनंती करू तूर्त तेथूनही श्रीकृपेने तोडजोड होईल येथे रा। केदारजी सिंदे यास याचेमताप्रमाणे येथे अणावे व यासि त्यास शामील करून दिलीहून नजीबखानास काढावे हे उतम आहे यास्तव आम्ही रा। केदारजी सिंदे याजकडे जैपूर प्रांती जाऊन त्यांस समजाऊन याचे अनुमते लाऊन घेऊन इकडे येक दोन कूच करऊ जर फौज चागली व दाहा पंधरा हजार फौजेसी जुजावया योग्य असली तर खामखा दिलीकडे यावयासि सांगू मग मानतील न मा[न*]तील हे त्याची इछा परतु विचाराचे धाटेने हाही समय फिरोन येणार नाही यास्तव स्वामींनीही कृपा करून त्यांस

लिहावे की कलाणे समय सापाचाच्या विचार सांगतील तो मनास आणून आपले वजन भारी पडे ते करणे म्हणोन ज्यास लिहिणार स्वामी समर्थ आहेत पुढे आमलात येईल ते विनंती लिहू.

---

ले. २१८ } श्री { श. १६८३ ज्येष्ठ शुद्ध २
सवाल २९ } { इ. १७६१ जून ४

श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता। छ २९ माहे सवाल मु॥ फौज प्रांत अंतर्वेद स्वामींच्या कृपावलोकने करून येथास्थीत असे विशेष इकडील वर्तमान पूर्वी पत्रे छ ११ सवालची व छ १७ सवालची मथुरेच्या मुकामीहून सो विनंती लिहिली नबाब याकूब अलीखानाचे दिलीहून मथुरेस येऊन सो यावयाचे व येथून फिरोन दिलीस जावयाचे व सुजातदौलाकडील जाबसाल कदाकुरा वगैरे बोलिल्याचे व नजीबखानास दिलीत पातशाहने वजिराचे वसवासामुळे ठेविले बंदोबस्त करून आहेत व ठाकूर सुरजमल व गाजुद्दीखान वजीर व राजश्री गंगाधर येशवंत व रा। चितो कृष्ण व गैर सर्व पंचाइतने वर्तमान व हाफिज रहमत खा व दुंदेखां व अहमदखां याचा सुरजमल व वजिराचे येकोपियाचे भरवसियावर अंतरवेदीत उतरणार व शाह अबदाली जेहलम नदीवर पोहचला येसी विस्तारे सो विनंतीपत्रे पाठविली आहेत त्यावरून सर्व श्रुत जालेच असेल हाली वर्तमान छ १८ माहे सवाली ठाकूर सुरजमल व वजीर व राजश्री गंगाधर येशवंत येसे सर्व मंडळी श्रीमथुरेहून कूच करून छ २० रोजी मंगलवारी कोलस दाखल जाले वरकड वृत पुर्वणी पत्रावरून श्रुत होईल [नि.*] कृपा करून उत्तरी सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत हे विज्ञप्ति

---

ले. २१९ } श्रीगजानन { श. १६८३ ज्येष्ठ शुद्ध १२
ज्येष्ठ शुद्ध १२ } पेवस्तगी छ ९ जिल्हेज मुा दिली { इ. १७६१ जून १४

तीर्थस्वरूप राजश्री [ मो. जा.* ] नानासाहेब वडिलाचे सेवेसी

बालके दिवाकराने कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल जेष्ठ शुध्द १२ मुकाम श्री टोंक गंगातीर राजश्री नाना फडणीस यांजपासी वडिलाचे आसीर्वादे येथास्त्तीत आसे यानंतर बहूत दिवस वडिलांकडील आ[सी]र्वाद पत्र येऊन वर्तमान कलत नव्हते त्यास छ ३० रमजानचे मथुरेचे मुकामीहून आले ते पावोन परम हर्ष

जाला श्रीमंतास विनंतीपत्रे लिहिली होती ते पाहून वर्तमान सर्व कलले राजश्री नानानी पुण्यास पत्रे पाठविली आहेत उतरे आल्यावर रवाना होतील आम्ही श्रीमत स्वामीचे लश्करात आलो येथे राजश्री नानाची भेटी जाली आपण कितेक मजकूर यासि बोलले होतेत ते सर्व सागितले श्रीमतास विनंती करावी त्यास येथील मर्जी जिनसवार देखली त्याचा तपसील काये-लिहावा घटकेंत येक घटकेत येक स्मरण राहात नाही देहभान नाही थोर थोर माणसाची आबरू जावयासि विलंब लागत नाही होलदिल तीर्थस्वरूप राजश्री [ मो. जा.* ] दादाप्रमाणे आवस्ता जाली आहे शरीरांत काही नाही आस्तीच्यर्म मात्र आहे कोणेसमई काये होईल हा भरवसा नाही स्त्रीपुरुषासी कलह लागला आहे माणूसमात्र दिक्क थोर थोर मुतसदी जागा जागा जाऊन बसले आहेत राजश्री बाबूराव फडणीस बलालेस्वर गणपतीचे स्थल आहे तेथे कुटुंबसहवर्तमान गेले आहेत राजश्री त्रिबकराव मामा कोंकणात गेले आहेत नाना येथे राहिले आहेत सर्व दिक श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] दा [ दा* ] साहेब वडगाव म्हणून जागा पुण्याहून दोन कोस आहे तेथे आनुष्ठान करीत आहेत याप्रमाणे आवस्ता आहे पुढे काही मनसुब्याचे चिन्ह उतम दिसत नाही निजाम आली-खान फौजा ठेवितो सलाबतजग व निजाम आली येक जाले स्वारप्यादा पंचवीस हजार आहे बिघाड करावयाचे मानस आहे येथे त्याचे पारपत्य होऊन स्वदेशसंरक्षण करणे दुर्घट दिसते तेथे दुरील मनसुबे व बदोबस्त कलतच आहे अैसा मजकूर देखला यास्तव नानानी काही मजकूर न बोलले न कले कोणे समई काये बोलतील गोष्ट चवघास कललिया थोराथोराचा पेच पुण्यास गेलियावर श्रीमत राजश्री [मो. जा.*] दादाजवल मजकूर सर्व बोलोन मग त्या ग्रहस्तास पत्र घेऊन पाठवावेसे आहे तेथेही कायेममिजाजी नाही परंतु या मर्जीहून कांही आंतर आहे श्रीमंताचे मुकाम येथे वसि येकवीस होते वैशाख वद्य येकादसी शनवारी कूच करून पुण्यास गेले तेथे उभैथा श्रीमताची भेट जालियावर काये मनसुबा ठैरतो दोघाच्या दोन मर्ज्या त्या येक कैस्या होतील ते वर्तमान आलियावर सेवेसी विनंती लिहूं आपण राजश्री नानाची कृपा संपादून घेतली हे मोठी गोष्ट जाली बहूत कृपा करि-तात वारंवार आपलें स्मरण करितात श्रीमताची भेट येथे जाली पुढे श्रीमतासमागमे जावे तो मर्जीचा प्रकार अैसा देखोन चितास भये जाले व समागमे जावें तों आपला कारभार निराश्रित उगेच खराब कर्जदार होत फिरावे पुण्यास जावें तेथे सखारा[म*] पंत आंतःकर्णपूर्वक मेहरबान ते पुरी पडू देत नाही त्यास प्रस्तुत येक आश्रये ईस्वराचा किंवा राजश्री नाना फडणीस हे मनःपूर्वक कृपा करितात याचा आश्रये दुसरा नाही तीर्थस्वरूप राजश्री कैलासवासी रामच्यंद्रबावा गेल्यापासून निराश्रित होतो ईस्वरे हे कृपा केली यांचे पायासी निष्टा धरून श्रीगोदाश्नान करून यांजपासी बसलो आहों हे पुण्यास जातील तेव्हा समागमे जाऊं यांचा विचार येथे च्यार महिने राहावयाचा

दिसतो परंतु येव्यमान राहू देणार नाहीत आज्ञा देत नव्हते येका महिन्याची मोठे चले आज्ञा घेऊन गाहिले महिना जाल्यावर श्रीमंताचे पत्र येईल पुढे विचार होईल तो खरा दोन वर्षे कर्ज नाना व खराव होता जीव येजार जाला यास्तव जावयास चित्त न जाले नाना मनापासून कृपा करितात हेच खावदाचे जागा आहेत श्रीगंगास्नान घडते मातुश्री व सर्व मंडळी नाशकांत सुखरूप आहेत घरचे वर्तमान लिहिना पुरवत नाही श्री आबरू रक्षो वडिलास लिहावें तर आपणही काये करतील असो इकडील चिंता न करावी ईश्वर कृपावाददाने निर्वाह करीतच आहे वडिली येकदा देशास यावें मातोश्रीची सर्वांची भेट घ्यावी घरचा विचार सर्व मनन करावा सावकाराची कर्ज लाखो रुपये व्याजे मनास मानती व्याजाने घर बुडते असे करतां च्यार वर्षे होत आली त्यात वडिली हजार मनसुबे एकीकडे ठेऊन येकदा घरी यावें व सर्व मजकूर ध्यानास आणावा राजश्री धोंडाबा नाईकही इकडे आहेत त्याचा मजकूर कितीक आम्ही ठेगविला आहे तो सर्व समक्ष विनंती करूं त्याची तोडमोड सर्व ध्यानास आणून येक वाट करावी लोकांचे कर्जापासून मुक्त व्हावें पुढे ईश्वरास जेसे चालविणे तसे चालवील नाहीतर येखादे स्थली स्नान संध्या करीत बसले तरी बरे परतु लोकाचे रिणापासून सर्वस्व देऊन मुक्त व्हावें यांत येहलोक परलोक सर्व उत्तम आहे वडिलाचे ध्यानास कदाचीत येईल की देशास काये मेलऊन घेऊन जावे तर लोकाची व्याजे वर्षात पन्नास साठ हजारपर्यंत होत्यात हे वारली म्हणजे याहून दुसरे विशेष काये व आपण या आफतींतून वांचलेत हे करोडाची प्राप्त जाली आपण कासीस जाणार म्हणून येकिले यास्तव विनंती लिहिली आहे आतां हजार कामे येकीकडे ठेऊन घरास यावें यास हेगई कराल तर श्रीची व मातोश्रीचे पायांची शपथ असे सत्वर यावें नाहीतर मजला येतादीकडे उठून जावें लागेल आपल्या चित्तांत येईल की इकडेही कजाके व तिकडेही जाऊन दिकतींत पडावे तर इकडे आल्यावर वडिलांस काही दीक होऊं देणार नाही वडील खावंद ज[वं]लमात्र आसावें सर्व कामकाज होईल चिंता तिलतुल्य न करावी यावयास आलस जालिया व्याजाने घर बुडते यास्तव शपथपूर्वक इकडे यावयासि विलंब न करणे येथे आलियावर आपल्यास सर्वप्रकारे मुरबी राजश्री नाना आहेत व धणी इकडे आहेत जे मजकूर आसतील ते होऊं सकतील येथून आलियाने पक्की गोष्ट होईल दरबारची मर्जी ध्यानास येईल तिकडे सर्व शत्रूची मजलीश पुरी पडू देणार नाही कागदापत्री काम सुचे नाही विना नेमणूक भक्षावयाची विपत्य इतके करून तिकडे राहून सार्थक नाही यास्तव इकडे यावे घरचेंही कामकाज होईल व दरबारचेही होईल मातोश्रीचे शरीर दिवसेंदिवस आशक्त होते शरीराचा भरवसा नाही यास्तव हजार तीर्थ व लक्ष कामे हेच की येकदा येऊन भेट घ्यावी विशेष विनंती लिहिली यास्तव रागास न यावें लाच्यार जाणून लिहिले आसे दोन आजुरदार येक नाशकाहून व येक आवरंगाबादे-

हून {न} पाठविले व दोन पत्रे सरकारचे जोडी समागमे पाठविली त्यात साकल्य विनंती लिहिले आहे वडील लिहितात की पत्र येत नाही याजवरून दिसते की पत्रे पावली नाही याचे कारण काये न कले वेदमूर्ती राजश्री धोंड दिक्षीत व बाल दिक्षीत व गोविंदपंत सुखरूप आले राजश्री बाबा व आनदरा[व*] यांचे व कृष्णभट पुराणीकाचे वर्त[मान*] काये ते लिहिले पाहिजे राजश्री बाबाची आहिरनि [श*] चिंता लागली आहे चितात च्यईन पडत नाही ईस्वर सलामत राखो तिकडील साकल्य वर्तमान लिहून पाठवावे मी आपला इकडे यावयाचा विचार केवल नसलाच तर लिहून पाठवावे तऱ्ही सेवेसी येईन समक्ष आलियावर सर्व विनंती केल्यावर वडिलाचे चित्तेही इकडे यावेसे होईल राजश्री नानानी पत्र लिहिले आहे त्याज [व*] रून सर्व कलेल रा नानाचे आमचे विचारे सुज्या-उद्दवलाकडील वकिली आपले नावे करून घ्यावसि ठेराविले आहे पुण्यात गेल्या-वर याचा उद्योग होईल तिकडे आपले कामकाज सिंगरूड वगैरेचे आहे हे काम श्रीकृपेनें जालियावर त्याचे आर्जव जाल्यास कितीक कामे होतील यास्तव हा मजकूर ठेराविला आहे याचा उद्योग करावा किंवा नाही हे साकल्य लिहिले पाहिजे विशेष काये लिहिणे च्यरणदरशनाचा लाभ सत्वर यावा कृपा केली पाहिजे हे विज्ञापना राजश्री शंकराजी सखदेव पागासहवर्तमान देशात आले घोडी लहान मोठी तीत बतीस आहेत तेही केव{व{ल मरायात बसली आहेत बहून रागड हेराण आहेत घरी खर्चायास नाही त्यांत हे घोडी आली आहेत राजश्री नारोशंकर याजकडे घोडी चाकरीस ठेवायाची तजवीज केली आहे सरकार निलेकडील पागा काढून दुसरा शाहाणा माणूस समागमे देऊन पाठविलो शंकराजी पंतानेच वर्षात चाकरी बहूत केली कर्जदार जाले यास्तव पागा टाकिनात हे विनंती

चिरंजीव राजश्री गणपतरावजीस आसीर्वाद तुमचे हस्ताक्षर पत्र कधीही न ये परी सर्व श्रमी हे गोष्ट आपूर्व आहे आता पत्र पाठवण्यासि आलस न करणे तीर्थरूपा-समागमे सत्वर घरास येणे हेगई न करणे भेट होईल तो सुदीन हे आनेक आसीर्वाद

राजश्री बालाबा स्वामीस सां नमस्कार तुमचे पत्र कधी येऊन वर्तमान कलत नाहीत येसे न करणे सदोदीत पत्रद्वारे साकल्य वर्तमान लिहीत जाणे तीर्थरूपा-सत्वर येणे इकडे होये ते करणे व तुम्हीही जरूर येणे भेट होईल तो सुदीन हे विनंती

सर्व मटलीस सां नमस्कार अशिष्ट करणे

# परिशिष्ट १ : मितिशुद्धि

राजवाडे खंड ६ मध्यें हिंगणे घराण्यातील कांहीं कागद प्रसिद्ध झाले आहेत. पैकीं ज्यांवर कै. राजवाड्यांनीं कालनिर्देश केले नाहींत किंवा केले पण जे आज मला चुकीचे वाटतात त्यांचे क्रमांक व त्यांविषयीं माझे कालनिश्चय यांचें कोष्टक येथें देत आहे. याशिवाय कांहीं पत्रें अशीं आहेत कीं, त्यांचा काल दामोदर महादेव हिंगणे याच्या मृत्यूपूर्वीचा, निदान मृत्यूची वार्ता सर्वत्र कळण्यापूर्वीचा असला पाहिजे. त्याचा मृत्यू तारीख ६ मार्च १७५७ इसवीनंतर थोडकेच दिवसांत झाला असावा. राजवाडे खंड १ ले. ६३ या पत्राचा काल अंतर्गत पुराव्यावरून ता. ३ एप्रिल १७५७ हा निश्चित ठरतो. त्यांत दामोदर महादेवाचा काशीस काल झाल्याचा उल्लेख आहे. ही बातमी प्रथम औरंगाबादच्या सराफ्यांत आली. तेथून २ एप्रिल रोजीं पुण्यास पोंचली. औरंगाबादेहून पुण्यास पांच दिवसांत टपाल येई असें धरलें तर ही बातमी औरंगाबादेस ता. २७।२८ मार्चला तरी आली असली पाहिजे. या खंडांतील ता. ६ मार्च १७५७ च्या पत्रांत दामोदर महादेव आजारी होऊन काशीच्या ईशान्येस सुमारें ५० मैलांवर असलेल्या कोंच गांवीं आल्याचें नमूद आहे. तेव्हां ६ मार्च नंतर तो फार तर एखादा आठवडाच जिवंत असेल. तात्पर्य दामोदर महादेवाच्या नांवानें गेलेलीं सर्व पत्रें इ. १७५७ एप्रिल 'पूर्वींच्या कालांत घातलीं पाहिजेत. अशा पत्रांचे राजवाडे खंड ६ मधील क्रमांक ३७१, ३७२, ३७५ (१७५४?), ३९५(१७५३?), ३९६, ४६४, ४६७–४६९; ४७८, ४८२, ४८३, ४८८, ४९० ( १७५५ जुलै ), ९१, ५११, ५२७, ५३१, ५४७, ५४८, ५७४, ५७५ हे आहेत.

| त्र ांक | पत्रांतील कालनिर्देश | हिंदू मिति | इंग्रजी तारीख |
|---|---|---|---|
| ६ | सव्वाल २९ | श. १६६० माघ शुद्ध १ | इ. १७३९ जानेवारी २९ |
| ९ | जिल्काद १९ | श. १६६० माघ वद्य ६ | इ. १७३९ फेब्रु १८ |
| | सफर ९ | श. १६५८ ज्येष्ठ शुद्ध ११ | इ. १७३६ जून ८ |
| | सफर २३ | श. १६५८ ज्येष्ठ वद्य १० | इ. १७३६ जून २२ |
| | सफर २६ | श. १६५८ ज्येष्ठ वद्य १३ | इ. १७३६ जून २५ |
| | रखर ६ | श. १६५८ श्रावण शुद्ध ८ | इ. १७३६ आगस्ट ३ |
| | | श. १६७६ | इ. १७५४–५५ |
| | जब १० | श. १६७० आषाढ वद्य ११ | इ. १७४८ जून २६ |
| | ल्काद १२ | श. १६६४ पौष शुद्ध १४ | इ. १७४२ डिसेंबर २९ |
| | व्वाल १३ | श. १६६० पौष शुद्ध १५ पूर्वी | इ. १७३९ जानेवारी १२ पू |
| | | श. १६६३ चैत्र शुद्ध ११ | इ. १७४१ मार्च १६ |

| पत्र क्रमांक | पत्रांतील कालनिर्देश | हिंदू मिति | इंग्रजी तारीख |
|---|---|---|---|
| १७० | रवल १३ | श. १६६५ वैशाख शुद्ध १५ | इ. १७४३ एप्रिल २७ |
| १९३ | रवल १ | श. १६७१ माघ शुद्ध ३ | इ. १७५० जानेवारी २९ |
| १९९ | | श. १६७३ मार्गशीर्ष शुद्ध ६ | इ. १७५१ नोव्हेंबर १३ |
| २०० | | श. १६७३ २री तिमाही आरंभ | इ. १७५१ २ री तिमाही अखेर |
| २०७ | जिल्काद ७ | श. १६७३ आश्विन शुद्ध ८ | इ. १७५१ सप्टेंबर १७ |
| २०८ | दीपावली | श. १६७३ कार्तिक शुद्ध १ नंतर | इ. १७५१ आक्टोबर ९ नंतर |
| २०९ | पौ जिल्हेज १ | श. १६७३ कार्तिक शुद्ध २ | इ. १७५१ आक्टोबर १० |
| २१४ | जिल्हेज २२ | श. १६७५ आश्विन वद्य ८ | इ. १७५३ आक्टोबर २० |
| २१५ | मोहरम २९ सोम | श. १६७५ मार्गशीर्ष शुद्ध १ रवि | इ. १७५३ नोव्हेंबर २५ |
| २३३ | जिल्हेज २७ | श. १६७५ आश्विन वद्य १४ | इ. १७५३ आक्टोबर २५ |
| २४४ | रखर १२ | श. १६७४–७७ | इ. १७५३–५५ |
| २५० | जखर ६ | श. १६७३ वैशाख शुद्ध ८ | इ. १७५१ एप्रिल २२ |
| २८४ | साबान २१ | श. १६७३ आषाढ वद्य ७ | इ. १७५१ जुलै ४ |
| २८५ | रमजान १८ शुक्र | श. १६७२ श्रावण वद्य ४<br>श. १६७५ आषाढ वद्य ५ | इ. १७५० आगस्ट १०<br>इ. १७५३ जुलै २० |
| २८८ | सफर १६ | श. १६७६ मार्गशीर्ष वद्य २ | इ. १७५४ डिसेंबर १ |
| २८९ | सफर २९ | श. १६७६ पौष शुद्ध १ | इ. १७५४ डिसेंबर १४ |
| २९१ | पौ रखर १ | श. १६७२ फाल्गुन शुद्ध ३ | इ. १७५१ फेब्रुवारी १७ |
| २९७ | | श. १६७५ कार्तिक शुद्ध ८ | इ. १७५३ नोव्हेंबर ३ |
| ३२४ | पौ सफर २४ | श. १६७३ पौष वद्य ११ | इ. १७५२ जानेवारी १ |
| ३४१ | पौ साबान ३० | श. १६७० श्रावण वद्य १२ | इ. १७४८ आगस्ट ९ |
| ३५७ | | श. १६७३ पावसाळा | इ. १७५१ पावसाळा |
| ३६२ | कार्तिक वद्य ९ बुध | श. १६७३ कार्तिक वद्य ९ | इ. १७५१ आक्टोबर ३१ |
| ३७३ | मोहरम २१ | श. १६७२ मार्गशीर्ष वद्य ८ | इ. १७५० डिसेंबर १० |
| ३७४ | पौ रवल १० | श. १६७६ पौष शुद्ध ११ | इ. १७५४ डिसेंबर १० |
| ३७५ | | [श. १६७६] ३ री तिमाही | इ. १७५४ चौथी तिमाही |
| ३७९ | पौ शाबान १३ | श. १६७९ वैशाख शुद्ध १३ | इ. १७५७ मे २ |
| ३८२ | साबान ११ | श. १६८३ फाल्गुन शुद्ध १३ | इ. १७६२ मार्च ८ |
| ३८३ | साबान १६ | श. १६७६ ज्येष्ठ वद्य ३ | इ. १७५४ जून ८ |
| ३९९ | रवल ९ | श. १६७६ पौष शुद्ध १० | इ. १७५४ डिसेंबर २४ |
| ४०० | जखर २३ | श. १६८३ पौष वद्य १० | इ. १७६२ जानेवारी १९ |

| पत्र क्रमांक | पत्रांतील कालनिर्देश | हिंदू मिति | इंग्रजी तारीख |
| --- | --- | --- | --- |
| ४०१ | रजब १९ | श. १६७९ चैत्र वद्य ५ | इ. १७५७ एप्रिल ९ |
| ४६२ | जिल्हेज २५ | श. १६७३ कार्तिक वद्य १२ | इ. १७५१ नोव्हेंबर ३ |
| ४६३ | पौ साबान २९ | श. १६७० भाद्रपद शुद्ध १ | इ. १७४८ आगस्ट १३ |
| ४६५ | साबान १ | श. १६८३ फाल्गुन शुद्ध २ | इ. १७६१ फेब्रुवारी २६ |
| ४७२ | | श. १६८३ आषाढ शुद्ध ३ नंतर | इ. १७६१ जुलै ६ नंतर |
| ४७३ | | श. १६७६ ज्येष्ठ शुद्ध ३ पूर्वी | इ. १७५४ मे २५ पूर्वी |
| ४७५ | | श. १६८६ नंतर | इ. १७६५ नंतर |
| ४७६ | | श. १६७० ज्येष्ठ-आषाढ | इ. १७४८ जून |
| ४७९ | जिल्काद २६ | श. १६८० आषाढ वद्य १३ | इ. १७५८ आगस्ट १ |
| ४८० | | श. १६८३ फाल्गुन शुद्ध १३ पूर्वी | इ. १७६२ मार्च ८ पूर्वी |
| ४८१ | | श. १६७६-७७ | इ. १७५५ |
| ४८५ | रजब २७ | श. १६७६ वैशाख वद्य १४ | इ. १७५४ मे २१ |
| ४८६ | रमजान १० | श. १६७४ आषाढ शुद्ध ११ | इ. १७५२ जुलै ११ |
| ४८७ | सफर १२ | श. १६७६ मार्गशीर्ष शुद्ध १३ | इ. १७५४ नोव्हेंबर १७ |
| ४८९ | मोहरम ७ | श. १६७३ मार्गशीर्ष शुद्ध ८ | इ. १७५१ नोव्हेंबर १५ |
| ४९५ | सफर १२ | श. १६७६ मार्गशीर्ष शुद्ध १३ | इ. १७५४ नोव्हेंबर २७ |
| ४९६ | रखर ८ | श. १६७६ माघ शुद्ध ९ | इ. १७५५ जानेवारी २१ |
| ४९७ | जखर १ | श. १६७४ वैशाख शुद्ध २ | इ. १७५२ एप्रिल ५ |
| ४९८ | | श. १६८३ अखेर | इ. १७६२ आरंभ |
| ४९९ | | श. १६८३ अखेर | इ. १७६२ आरंभ |
| ५०२ | | श. १६७३ पावसाळा | इ. १७५१ पावसाळा |
| ५०९ | | श. १६८३ | इ. १७६२ |
| ५१० | साबान २२ | श. १६७३ आषाढ वद्य ८ | इ. १७५१ जुलै ५ |
| ५१२ | रबल १० | श. १६७६ पौष शुद्ध ११ | इ. १७५४ डिसेंबर २५ |
| ५१४ | मोहरम ९ | श. १६७५ कार्तिक शुद्ध १० | इ. १७५३ नोव्हेंबर ५ |
| ५२१ | मोहरम ७ | श. १६७५ कार्तिक शुद्ध ८ | इ. १७५३ नोव्हेंबर ३ |
| ५२४ | | श. १६७५ नंतर | इ. १७५३ नंतर |
| ५२८ | रजब १० | श. १६७० आषाढ शुद्ध ११ | इ. १७४८ जून २६ |
| ५२९ | जिल्काद १७ | श. १६७६ भाद्रपद वद्य ४ | इ. १७५४ सप्टेंबर ५ |
| ५३० | | श. १६७९ चैत्रपूर्वी | इ. १७५७ मार्च २ |
| ५३२ | पौ रखर ३० | श. १६७३ चैत्र शुद्ध २ | |

| पत्र क्रमांक | पत्रांतील कालनिर्देश | हिंदू मिति | इंग्रजी तारीख |
|---|---|---|---|
| ५३३ | पौ रखर ३० | श. १६७३ चैत्र शुद्ध २ | इ. १७५१ मार्च १८ |
| ५३४ | रखर २० | श. १६७२ फाल्गुन वद्य ७ | इ. १७५१ मार्च ८ |
| ५३५ | रखर २९ | श. १६७३ चैत्र शुद्ध १ | इ. १७५१ मार्च १७ |
| ५३७ | | श. १६७२ | इ. १७५० |
| ५४१ | जखर १५ | श. १६७६ चैत्र वद्य २ | इ. १७५४ एप्रिल ९ |
| ५४२ | पौ रखर २६ | श. १६७२ फाल्गुन वद्य १३ | इ. १७५१ मार्च १४ |
| ५४४ | सव्वाल २३ | श. १६७३ भाद्रपद वद्य १० | इ. १७५१ सप्टेंबर ३ |
| ५४५ | पौ सफर ८ | श. १६७३ पौष शुद्ध १० | इ. १७५१ डिसेंबर १६ |
| ५५६ | रवल ६ | श. १६७२ माघ शुद्ध ८ | इ. १७५१ जानेवारी २३ |
| ५५७ | रवल २२ | श. १६७६ पौष वद्य ९ | इ. १७५५ जानेवारी ६ |
| ५५८ | रवल ७ | श. १६७६ पौष शुद्ध ८ | इ. १७५४ डिसेंबर २२ |
| ५५९ | सव्वाल ३ | श. १६७६ श्रावण शुद्ध ५ | इ. १७५४ जुलै २४ |
| ५६१ | मोहरम २५ | श. १६७५ कार्तिक वद्य ११ | इ. १७५३ नोव्हेंबर २१ |
| ५६३ | रखर १५ | श. १६८३ कार्तिक वद्य १ | इ. १७६१ नोव्हेंबर १३ |
| ५६६ | रखर ७. | श. १६७५ माघ शुद्ध ८ | इ. १७५४ जानेवारी ३१ |
| ५६७ | | श. १६६६–६७ | इ. १७४५ |
| ५६८ | | श. १६७५–७६ | इ. १७५४–५५ |
| ५७१ | मोहरम ७ | श. १६७३ मार्गशीर्ष शुद्ध ८ | इ. १७५१ नोव्हेंबर १५ |
| ५७६ | मोहरम १० | श. १६७३ मार्गशीर्ष शुद्ध ११ | इ. १७५१ नोव्हेंबर १८ |
| ५७७ | साबान १३ | श. १६७९ वैशाख शुद्ध १३ | इ. १७५७ मे २ |
| ५७९ | श्रावण शुद्ध ११ | श. १६७७ श्रावण शुद्ध ११ | इ. १७५५ आगस्ट १७ |
| ५८० | | श. १६७२ पौष मध्य | इ. १७५१ आरंभ |
| ५८१ | श्रावण वद्य १२ | श. १६७० श्रावण वद्य १२ | इ. १७४८ आगस्ट ९ |

# परिशिष्ट २ : मृत्युतिथि

प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें मी ज्या मृत्युतिथि एकत्र केल्या त्यांपैकीं इ. १७६१ अखेरपर्यंतच्या येथें देत आहे. यांतील प्रत्येक तिथि अगदीं पक्की आहे असें सध्याच समजूं नये. मला प्रत्येकीचा मूळ आधार पहावयास सापडलेला नाहीं व त्यावरून काढलेली इंग्रजी तारीख मूळ निर्देशाशीं मिळती आहे कीं नाहीं हेंही तपासतां आलें नाहीं आणि याचमुळें त्यांचे आधार दिलेले नाहींत. हिंगणे दफ्तराच्या पुढील खंडांत या कालांतल्या पण यांत न दिलेल्या, यांत दिलेल्या पण तपासणीनें दुरुस्त कराव्या लागलेल्या व उत्तर पेशवाईतील आवश्यक असलेल्या अशा सर्व मृत्युतिथि देण्याचा प्रयत्न करीन. यांत आलेल्या मृत्युतिथींकडे थोडें लक्ष दिलें तर असें आढळेल कीं, यांतील बहुतेक तिथि उत्तर हिंदुस्थानशीं संबंध आलेल्यांच्या आहेत. उत्तरीय कागदपत्रांचा अभ्यास करतांना त्या जमविलेल्या असल्यानें असें होणें नैसर्गिक आहे. बाजीराव बल्लाळाच्या कारकिर्दीतील कांहीं मित्या कै. दत्तोपंत आपटे यांनीं तयार केलेल्या बाजीराव शकावलींतून घेतल्या आहेत.

अजितसिंग (जोधपूर) इ. १७२४ जून २३
अन्वरुद्दीन (कर्नाटकचा नबाब) इ. १७४९ जुलै २३
अभयसिंग (जोधपूर) इ. १७४९ जून १९, २१
अमीनखान वजीर इ. १७२१ जानेवारी १७
अमीरखान इ. १७४६ डिसेंबर २५
अयामल (राजामल, मलजी) इ. १७४३ फेब्रुवारी ८, ९
अलीवर्दीखान इ. १७५६ एप्रिल १०
असदयार इ. १७४५ एप्रिल १५
आकिबत महमूद इ. १७५४ जून २८
आदिना बेग इ. १७५८ नवंबर १५
आलम अलीखान इ. १७२० जुलै ३१
आलमगीर १ ला (औरंगजेब) इ. १७०७ फेब्रुवारी २१
आलमगीर सानी इ. १७५९ नोव्हेंबर २९, ३०
आसफजाह (१ ला निजामुल्मुल्क) इ. १७४८ मे २२
आंग्रे सेखोजी इ. १७३३ आगस्ट २८
इन्तिजामुद्दौला इ. १७५९ नोव्हेंबर २६, २९
ईश्वरसिंग इ. १७५० डिसेंबर १२
कमरुद्दीन (वजीर) इ. १७४८ मार्च ११
कायमजंग बंगश इ. १७४९ नोव्हेंबर १२
कुवर बहादुर इ. १७३६ मे ३
केशवदास (अयामल-पुत्र) इ. १७५० आगस्ट
खान डौरान इ. १७३९ फेब्रुवारी १३
गाझीउद्दीन (थोरला) इ. १७५२ आक्टोबर १६
गायकवाड पिलाजी इ. १७३२ [illegible] २२
[illegible] इ. १७[illegible]
[illegible] इ. १७[illegible]

